ता. ११-१२-१९५३ रोजीं श्रीमंत प्रतापशेठजी यांच्या वाढदिवशीं घेतलेला फोटो.



डावीकडून उजवीकडे-१. प्रो. बर्च. २. सौ. बर्च, ३. सौ. बनारसीदेवी. ४. श्री. सौ. भागीरथीबाईसाहेब.
५. कुमारी पुष्पा. ६. कुमार पीटर बर्च. ७. श्रीमंत प्रतापशेठजी.
८. श्रीमान् मगनलाल मोतीलाल शेठ. ९. कुमारी सावित्री.

# श्रीमंत प्रतापशेठ अमृत महोत्सव

# गौरव ग्रंथ

खंड १, २ व ३.

## खंड पहिला

संपादक
**माधव रामचंद्र ओक**, एम्. ए
अध्यापक
तत्त्वज्ञान मंदिर, अमळनेर

# प्रस्तावना

परमेश्वरकृपेने श्रीमत प्रतापशेठ याचे वयास तारीख ११ डिसेंबर १९५४ रोजी ७५ वर्षे पूर्ण झाली, याबद्दल त्यान्या सर्व मित्रास व चहात्यास फार आनद झाला या वाढदिवशी त्याचा अमृत-महोत्सव साजरा करून त्यास एक गौरव ग्रथ अर्पण करावा असे या मडळींनी योजिले, व त्याकरिता गेल्या वर्षी तारीख ११ डिसेंबर १९५३ रोजी इष्टमित्राची एक सभा बोलावून त्यात एक अमृत-महोत्सव समिति, एक कार्यकारी समिति व एक गौरव-ग्रथ सपादक-मडळ नियुक्त केले, व गौरव-ग्रथाच्या मुख्य सपादकाचे काम मजवर सोपविले

एवढ्या महत्त्वान्या गौरव-ग्रथाचे सपादन करावयाचे काम किती जबाबदारीचे व अवघड आहे याची मला पूर्ण जाणीव होती, परंतु अनेक सन्मित्राचा आग्रह, व विशेषत श्रीमत प्रतापशेठजीचेबद्दल मला वाटणारा आदर, यामुळेच हे काम मी स्वीकारले ते शक्य तितके चागल्या प्रकारे पार पाडण्यात सपादक-मडळान्या सर्व सदस्यानी मला हरप्रकार मन पूर्वक सहाय्य केले त्यामुळेच हा गौरव-ग्रथ या स्वरूपात तयार होऊ शकला या त्यान्या हार्दिक सहाय्याबद्दल सपादक-मडळाच्या सर्वच सहकान्याचा मी फार आभारी आहे

गौरव-ग्रथात प्रसिद्ध करावयाचे श्रीमत प्रतापशेठ याचे चरित्रहि मीच लिहावे अशी श्री शेठजींनी आज्ञा केली, व चरित्रलेखनाला आवश्यक असलेली सर्व माहितीहि त्यानी स्वत स्वमुखाने सागितली तसेच, त्यात घालावयाची त्यान्या जन्मस्थानाची व आसपासन्या स्थळाची चित्रेहि, त्याकरिता मुद्दाम मला आपल्याबरोबर मारवाडात घेऊन जाऊन, काढवून दिली याप्रमाणे चरित्रातील माहिती व त्यात घातलेली मारवाडातील चित्रे पुरविल्याबद्दल श्रीमत प्रतापशेठजींचा मी अत्यत आभारी आहे

त्याचप्रमाणे हा गौरव-ग्रथ शक्य तितका भारदस्त व सुदर करण्यास अनेक श्रेष्ठ व्यक्तीचे व सज्जन सुहृदाचे सहकार्य मला लाभले त्याबद्दल येथे थोडक्यात उल्लेख करून त्या सर्वांबद्दल मला वाटणारी कृतज्ञता व्यक्त करणे माझे कर्तव्यच आहे

आमन्या विनतीस मान देऊन गौरव-ग्रथात प्रसिद्ध करण्याकरिता—
अनेक श्रेष्ठ व्यक्तींनी आपले शुभसदेश पाठविले,
अनेक विद्वान लेखकानी विविध विषयावर लेख पाठविले,
श्रीमत प्रतापशेठजीन्या जीवनातील आपापल्या आठवणी पाठविल्या,
श्री क्षीरसागर व श्री मगनशेठ यानी युरोपन्या प्रवासातील फोटो पाठविले,
श्री पाडुतात्यानी आपल्या सग्रहातील बद्रीनारायणान्या यात्रेतील फोटो दिला,
सस्था-चालकानी व व्यवस्थापकानी सस्थाची इतिवृत्ते पाठविली,
या बहुमोल सामुग्रीबद्दल मी या सर्व सज्जनाचा फार आभारी आहे

श्रीमत प्रतापशेठ यान्या चरित्रात आरभी व शेवटी घालण्यास अर्थपूर्ण वा सुदर सस्कृत सुभाषिते, व प्रकरणान्या विषयाना अनुरूप असे श्लोक परिश्रमपूर्वक शोधून वा रचून दिल्याबद्दल प आत्मारामशास्त्री जेरे याचे जेवढे आभार मानावे तेवढे कमीच होतील त्याबद्दल मी फक्त कृतज्ञता व्यक्त करतो

संयुक्त कार्यवाह श्री. मगनशेठ व श्री. गं. म. वाड याच्यावर साहजिकच अमृत-महोत्सवाची तयारी करण्याची सर्व जबाबदारी पडली. त्यांतल्या त्यांत श्री. मगनशेठ यांनीं बाहेर हिंडून करावयाची कामे आपलेकडे घेतलीं, व अमळनेरला करावयाचीं सर्व कामे श्री. वाड यांचेकडे आलीं. गौरव-ग्रंथाकरितां लेख व चित्रे मागविणे, श्रेष्ठ व्यक्तींचेकडून आलेले संदेश, व संस्थांची इतिवृत्ते जमविणे, मुद्रणस्थळ ठरविणे, वगैरे अनेक महत्त्वाची कामे श्री. वाड यांनी अत्यत उत्साहाने, कळकळीने व तत्परतेने करून संपादकाच्या कामांत मला फारच सहाय्य केले, याबद्दल श्री मगनशेठ व श्री. वाड या दोघांहि कार्यवाहांचा मी फार आभारी आहे

श्री. भाऊसाहेब देव व श्री. बाबासाहेब भालेराव या दोघांनी, मजवर लोभ ठेवून, वडील माणसांच्या आपुलकीने मला वेळोवेळी जे प्रोत्साहन दिले, व मार्गदर्शन करून सर्व प्रकारे सहाय्य केले, त्याबद्दल मी आदरपूर्वक कृतज्ञता व्यक्त करतो.

गौरव-ग्रंथात मराठी, इंग्रजी, संस्कृत, हिंदी व गुजराथी या पांच भाषांत लेख आले आहेत. इतक्या विविध भाषांतील लेखांची प्रुफे तपासणे, कांही लेखकांच्या दुर्बोध हस्ताक्षरावरून त्यांच्या उच्च विचारांचा ठाव घेऊन त्यांच्या लिखाणाचा अर्थ लावणे, हे काम अतिशय जोखमीचे व जिकीरीचे असते. परंतु या कामांत नित्य सराव असलेले माझे मित्र श्री. विष्णुपंत खांडेकर व 'वाङ्मयशोभा' मासिकाचे संपादक श्री. मनोहरपंत केळकर व त्यांचे सहकारी, यांनी रात्र रात्र जागून फारच मेहनत घेतली व मला सहाय्य केले, याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे

शिवाय, संस्कृत लेख तपासण्यांत 'नवभारत'चे संपादक श्री. बेडेकर, इंग्रजी लेखावरून नजर फिरविण्यांत श्री. वाडेकर, व गुजराथी लेख तपासून देण्यांत प्रताप मिलचे सेक्रेटरी श्री त्रिवेदी, या मित्रांनी आपलेपणाने सहाय्य केले त्याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहे.

इतकेहि करून कांही मुद्रणदोष राहिले असतील, पण त्याला उपाय नाहीं त्याबद्दल सहृदय वाचकांनीं क्षमा करावी हीच विनंती.

पुण्याच्या चित्रशाळा प्रकाशनाचे मॅनेजर श्री. दा. पां. रानडे व त्यांचे सहकारी यांनी गौरव-ग्रंथाचे छपाईचे व बांधणीचे काम फार सुबक करून दिले, याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यांत मला आनंद होत आहे

तसेच, तिसऱ्या भागाची इंग्रजी छपाई सुबक करून दिल्याबद्दल पुण्याच्या 'संगम' प्रेसचे चालक पटवर्धन बंधु व त्यांचे सहकारी यांचाहि गौरव करणे योग्य आहे.

श्रीमंत प्रतापशेठ यांच्या चारित्र्याची मुद्रणप्रत सुवाच्य अक्षरांत मोठ्या आवडीने व तत्परतेने करून देण्यांत आमच्या मुली चि. काशी, माणिक व शशिकला या तिघींचीहि मला फारच मदत झाली, याबद्दल त्यांना प्रेमपूर्वक आशीर्वाद.

परमेश्वराने हा आनंदाचा दिवस दाखविला याबद्दल सर्वांचेतर्फे कृतज्ञता व्यक्त करून, श्रीमंत प्रतापशेठ यांस त्याने उदंड आयुष्य, आरोग्य व आनद द्यावा, अशी परमेश्वराची प्रार्थना करून ही प्रस्तावना मी पुरी करतो.

तत्त्वज्ञानमंदिर,<br>अमळनेर.<br>ता ११ डिसेंबर १९५४.

माधव रामचंद्र ओक,<br>संपादक.

# श्रीमंत प्रतापशेठजी अमृत-महोत्सव समिति

## अध्यक्ष

श्री ग वा ऊर्फ दादासाहेब मावलकर, अहमदाबाद

## उपाध्यक्ष

१ श्री रा रा देवकीनदन नारायण, जलगांव
२ श्री रा रा स का पाटील, मुबई
३ श्री रा रा शालिग्राम रामचद्र भारतीया, धुळे
४ श्री रा रा राजमल लखीचद शेठ, जामनेर
५ श्री रा रा हरि विनायक पाटसकर, चालिसगाव
६ श्री रा रा राधाकृष्णजी बजाज, वर्धा
७ श्री रा रा रावबहादुर डॉ रा व्य मोने, अमलनेर

## कार्यकारी मंडल

१ श्री रा रा म गो भालेराव अमलनेर ( कार्याध्यक्ष )
२ श्री रा. रा मगनलाल नगीनदास, चोपडे } ( सयुक्त
३ श्री रा रा ग म वाड, अमलनेर } कार्यवाह )
४ श्री रा मगनलाल मोतीलाल सेठ, धुळे.
५ श्री रा रा गगाराम सुकदेव सेठ, अमलनेर
६ श्री रा रा वसतीलाल केशवलाल पटवा, कानपुर
७ श्री रा रा राजाराम दलाल, कानपुर
८ श्री रा रा प्रा वासुदेव पुरुषोत्तम दामले, अमलनेर
९ श्री रा रा नागरदास वाघजी सेठ, अमलनेर
१० श्री रा रा पासुभाई शिवजी सेठ, अमलनेर
११ श्री रा रा भिकाजी रामचद्र सेठ, अमलनेर
१२ श्री रा रा जमसेठजी सेठ तबोळी, अमलनेर
१३ श्री रा रा मणिभाई मोतीभाई अमीन, धुळे
१४ श्री रा रा प्रा माधव रामचद्र ओक, अमलनेर
१५ श्री रा रा नटवरसिंह बॉसिया, अमलनेर
१६ श्री रा रा डॉ ना भि परुळेकर, पुणे
१७ श्री रा रा त्रिभुवनदास वल्लभदास सेठ, येवला

१८ श्री. रा रा ह् रा कोलते, अमलनेर
१९ श्री रा रा चिंतामण नीलकठ पाटणकर, नाशिक
२० श्री रा रा वि वा नेने, धुळे
२१ श्री रा रा फुलचद् सेठ पहाडे, अमलनेर
२२ श्री रा रा नानालाल त्र्यबकराम त्रिवेदी, अमलनेर
२३ श्री रा रा श्रीनिवास पढरीनाथ नादेडकर, अमलनेर
२४ श्री रा रा, छगनलाल नानकराम सेठ, चोपडे
२५ श्री रा रा डॉ विश्राम हरि पाटील, शहादे
२६ श्री रा रा नदलाल लक्ष्मीनारायण सेठ, अमलनेर
२७ श्री रा रा गोवर्धनदास भिकारीदास सेठ, चोपडे
२८ श्री रा रा हरि यादव मिशाळ, अमलनेर
२९ श्री रा रा वसतीलाल भवरलाल पटेल, धुळे
३० सौ सीताबाई म्हसकर, अमलनेर
३१ सौ मालतीबाई फाटक, अमलनेर
३२ श्री रा रा हुकमीचद चोथमल सेठ, भुसावळ.
३३ श्री रा रा रामकुवरजी ज्वालादत्त, मुबई
३४ श्री रा रा हिदायतुल्ला खान, अमलनेर
३५ श्री रा रा य गो हरताळकर, चोपडें
३६ श्री रा रा रामचद्र त्र्यबक देव, अमलनेर
३७ श्री रा रा त्र्यबक गोपाल मुठे, अमलनेर
३८ श्री रा रा एम् व्ही फाटक, अमलनेर
३९ श्री रा रा पी. एम ओक, अमलनेर
४० श्री रा रा खेतमल कोठारी, अमलनेर
४१ श्री रा रा शकर सीताराम शिंपी, अमलनेर
४२ श्री रा रा वसत गोपाल भागवत, अमलनेर
४३ श्री रा रा टी टी भाडारकर, अमलनेर
४४ श्री रा रा पी बी भरुचा, अमलनेर
४५ श्री रा रा मल्हारराव चिकाटे, अमलनेर
४६ श्री रा रा बन्सीलाल उदेराम सेठ, धुळे
४७ श्री रा रा एम् के ओझा, अमलनेर
४८ श्री रा रा व्ही जी झणझणे, अमलनेर
४९ श्री रा रा मो श देव, धुळे
५० श्री रा रा व्ही व्ही थत्ते, धुळे

५१ श्री रा रा एन् पी रायकर, धुळे
५२ श्री रा रा आर जी टिपणीस, मुबई

या समितीस अधिक स्वीकृत सभासद करून घेण्याचा अधिकार आहे

## श्रीमंत प्रतापशेठजी गौरव-ग्रंथ

### संपादक मंडल

१ श्री रा रा माधव रामचद्र ओक, अमलनेर ( कार्याध्यक्ष )
२ श्री रा रा पडित श्रीपाद दामोदर सातवळेकर
३ श्री रा रा घनःश्यामदास मलकानी, अमलनेर
४ श्री रा रा म वि फाटक, अमलनेर
५ श्री रा रा आत्माराम शास्त्री जेरे, अमलनेर
६ श्री रा रा श्रीराम माधव चिंगले, अमलनेर
७ श्री रा रा नानालाल त्र्यबकराम त्रिवेदी, अमलनेर
८ श्री रा रा श्रीनिवास पढरीनाथ नादेडकर, अमलनेर
९ श्री रा रा मगनलाल मोतीलाल सेठ, धुळे
१० श्री रा रा मगनलाल नगीनदास सेठ, चोपडे, सयुक्त कार्यवाह
११ श्री रा रा ग म वाड, अमलनेर, सयुक्त कार्यवाह

# लेखकांचा परिचय

## खण्ड १ ला

१ प्रो माधव रामचंद्र ओक, एम् ए, तत्त्वज्ञानाचे अध्यापक, तत्त्वज्ञानमंदिर, अमळनेर
२ श्री श्री मा चिंगळे, एम् ए, फेलो, तत्त्वज्ञानमदिर, अमळनेर
३ श्री म रा करदीकर, निवृत्त हेड क्लार्क, प्रताप मिल, अमळनेर
४ श्री म गो भालेराव, बी ए, एल्एल् बी, कार्याध्यक्ष, अमृतमहोत्सव समिति, प्रसिद्ध ज्येष्ठ वकील व कायदेपंडित, अमळनेर.
५ श्री व्य ज मुजे, कॉटन एक्स्पर्ट, प्रताप मिल, अमळनेर
६ श्री दि द क्षीरसागर, पूर्वीचे डाइंग व वीव्हिंग मास्तर, प्रताप मिल आता गिरणीला लागणारा माल व सल्ला देणारे इंजीनिअर, मुलुड, ठाणे.
७ श्री वसतलाल पटवा, सूत व कापडाचे तज्ज्ञ, प्रताप मिल, अमळनेर
८ श्री पाडूतात्या वैद्य, मोटर सुपरिन्टेन्डन्ट, प्रताप मिल, अमळनेर
९ श्री किसनशेट पोतदार, एका शाखेचे हेड क्लार्क, प्रताप मिल, अमळनेर.
१० श्री दत्तोपंत नाईक, स्टोअर-कीपर, प्रताप मिल, अमळनेर
११ डॉ प्रभाकर त्रिवेदी, एम् ए, डी लिट्, माजी फेलो, तत्त्वज्ञानमंदिर, अमळनेर.
१२ पं आत्मारामशास्त्री जेरे, न्याय व वेदान्तशास्त्राचे अध्यापक, तत्त्वज्ञानमंदिर, अमळनेर
१३ म म प श्री दा सातवळेकर, सस्थापक, स्वाध्यायमडल,-पूर्वी औंध-आता किल्ला पारडी
१४ कै वासुदेव आण्णा कामत, ज्ञानेश्वरी व वेदान्तभक्त, शाहुपुरी, कोल्हापूर
१५ प रामावतार शास्त्री, रतनगढ, बिजनोर ( उ प्र ) प्रसिद्ध पडित व लेखक
१६ श्री ना व्य त्रिवेदी, बी ए, सेक्रेटरी, प्रताप मिल, अमळनेर
१७ प्रो जी आर मलकानी, एम् ए, एम् लिट्, डायरेक्टर, तत्त्वज्ञानमदिर, अमळनेर
१८ श्री ना प रायकर, बी कॉम, सेक्रेटरी, न्यू प्रताप मिल, धुळे
१९ श्री ग म. वाड, एम् एस्सी पूर्वी खानदेश-शिक्षण-मडळाचे १५ वर्षे आजीव सदस्य, आता प्रताप मिलमध्ये अधिकारी व सयुक्त कार्यवाह, अमृत-महोत्सव समिति
२० श्री य नि खाडेकर, ॲक्टिंग प्रिन्सिपॉल, भोसले मिलिटरी स्कूल, नासिक
२१ श्री य गो हरताळकर, बी एस्सी, बी टी, सुपरिंटेन्डन्ट, प्रताप विद्यामदिर, चोपडे
२२ श्री राम किशोर, एम् ए, सी टी, हेडमास्तर, प्रताप रामेश्वरलाल सहारिया हायस्कूल, कालाडेरा
२३ रा ब डॉ आर व्ही मोने. एम् आर सी एस् (इंग्लड) एल् आर सी पी (लडन) इ रि सिव्हिल सर्जन, चीफ् मेडिकल ऑफिसर, प्रताप हॉस्पिटल, अमळनेर

---

# श्रीमंत प्रतापशेठ अमृत-महोत्सव गौरव ग्रंथ

## खंड १ ला

अनुक्रमणिका



—

श्रीमंत प्रतापशेठ अमृतमहोत्सव गौरव-ग्रंथ

खंड १ ला—विभाग १ ला

# श्रीमंत प्रतापशेठ यांचें चरित्र


लेखक

माधव रामचंद्र ओक, एम्. ए.,

अध्यापक,

तत्त्वज्ञानमंदिर, अमळनेर

## निवेदन

हे चरित्र श्रीमंत प्रतापशेठ यांनीं स्वमुखाने सांगितलेल्या माहितीच्या आधाराने प्रस्तुत लेखकाने लिहिले आहे.

गणेशचतुर्थी,
भाद्रपद शु० ४ शके १८७६
तत्त्वज्ञानमंदिर,
अमळनेर ( पूर्व खानदेश )

माधव रामचंद्र ओक

---

## अनुक्रमणिका

# सुभाषित

स्नातं तेन समस्ततीर्थसलिले सर्वाऽपि दत्ताऽवनि-
र्यज्ञानां च कृतं सहस्रमखिला देवाश्च संपूजिताः ।
संसाराच्च समुद्धृताः स्वपितरस्त्रैलोक्यपूज्योऽप्यसौ
यस्य ब्रह्मविचारणे क्षणमपि स्थैर्यं मनः प्राप्नुयात् ॥१॥

श्रीगणेशाय नमः ।

# श्रीमंत प्रतापशेठ यांचें चरित्र

## प्रकरण १ लें

## जन्म व बालपण

जननी जन्मभूमिश्च बाल्यं बालसुहृद्गण ।
प्रत्यक्षतामिवायान्ति मुहु स्मृतिमुपागताः ॥ १ ॥

अर्थ —आई, जन्मभूमि, बालपण व बालपणचे सवंगडी याची वृद्धापकाळीं वारंवार आठवण होते, व त्यामुळे ते सर्व मला प्रत्यक्ष भासल्यासारखे होतात.

राजपुतान्यांत जयपूरपासून पश्चिमोत्तर दिशेस सुमारे २५ मैलावर कालाडेरा या नांवाचे एक तालुक्याचें गाव आहे त्याचे आसपास दोन दोन चार चार मैलावर नवापुरा, मोहनपुरा, साहेबरामपुरा, मालिकपूर इत्यादि लहान लहान खेडीं आहेत पूर्वेस चार सहा मैलावर चोमू व सामोद हीं दोन रजपूत सरदाराची तटबदी गावे असून सामोद-पासून दोन मैलावर एका नदीचे पलीकडे डोंगराच्या अगदी पायथ्याशी बासा म्हणून एक छोटेसे सुदर खेडे आहे

कालाडेरा येथे सुमारे १०० वर्षापूर्वी गोपीरामजी म्हणून एक गरीब व सालस मारवाडी गृहस्थ होते गावाला एक पचायत होती, व गोपीरामजी त्या ग्रामपचायतीचे सरपच होते योग्य न्याय देण्याबद्दल कालाडेऱ्याच्या पचायतीचा आसपासच्या गावात मोठा लौकिक होता याचे सर्व श्रेय गोपीरामजींनाच होते व त्यामुळे गोपीरामजींचेबद्दल गावकऱ्यास फार आदर वाटत असे.

गोपीरामजींचे घरीं ते स्वत, त्यांची पत्नी व छोटूराम हा एकच मुलगा, इतकीच माणसे प्रथम होतीं पुढे छोटूराम मोठा झाल्यावर बासा येथील बक्षीरामजी यांची मुलगी शिवकुवरबाई हिला त्यांनी आपली सून करून घेतली.

पुढे कांहीं वर्षांनीं गोपीरामजींनी कालाडेऱ्याजवळच तीन चार मैलावर मोहनपुरा या खेड्यांत आपले सर्व कुटुंब नेले, व या कथानकाचे आरंभी – सुमारे ८० वर्षांपूर्वी – ते, त्यांची पत्नी, मुलगा छोटूराम, सून शिवकुवरबाई आणि मूलचंद व नानगराम हे दोन नातू, इतकी माणसे त्या वेळीं कुटुंबांत होती

## प्रतापचा जन्म

नंतर कांहीं दिवसांनीं मोहनपुरा येथे असतानाच शके १८०१, संवत १९३६ च्या कार्तिक कृष्ण १३ स, म्हणजे संतशिरोमणि ज्ञानेश्वरमहाराज यांनीं समाधि घेतली त्याच दिवशी, उत्तररात्री, छोटूरामजींची पत्नी शिवकुवरबाई प्रसूत होऊन तिला पुत्र झाला व त्याचे नाव रामप्रताप असे ठेविले हा पुत्र म्हणजेच आमचे चरित्रनायक श्रीमत प्रतापशेठ हे होत त्यांच्या जन्मदिवशी इंग्रजी तारीख ११ डिसेंबर सन १८७९ ही होती नर्मदेच्या उत्तरेस, मारवाडात, पौर्णिमान्त महिने मानतात त्याप्रमाणे आपल्या इकडील कार्तिक कृष्ण १३ ला तिकडे मार्गशीर्ष कृष्ण १३ असे म्हणतात

गोपीरामजी यांची स्वत ची घरची शेती नव्हती, म्हणून कुटुंबाचा चरितार्थ चालविण्यास त्यांनी घरी शेळ्या, उंट व बैल बाळगले होते त्या काळांत एका गावाहून दुसऱ्या गावास धान्याची वाहतूक बैलांचे पाठीवर धान्याच्या गोण्या लादून करीत असत गोपीरामजी स्वत हि बैलावर गोण्या लादून इकडचा माल तिकडे व तिकडचा माल इकडे, असा व्यापार करीत असत एकदा प्रताप लहान असताना कालाडेऱ्याजवळ बैलांचा तांडा उतरला असताना “ आपला मोठा भाऊ मूलचंद याचेबरोबर आपण तेथे जेवायलाहि गेलो होतो ” अशी आठवण श्री प्रतापशेठजी अजून सांगतात !

मोहनपुरा हे खेडे त्या वेळीं जयपूरच्या माजीसाहेब ( महाराजांची आई ) यांच्या ताब्यातील गाव होते माजीसाहेबांचा कारभारी त्या गावावर अमल करीत असे गोपीरामजी आपला उंट भाड्याने देत असत, परंतु कारभाऱ्यांच्या मर्जीस येईल तेव्हा तो गोपीरामजींचा उंट वेठीस धरून नेत असे व त्याला संभाळण्यास गोपीरामजींनाच उंटाबरोबर जावे लागे ! एकदा वेठीस धरल्यावर दोन दोन महिनेसुद्धा ते घरी येत नसत नंतर जेव्हा एकदा त्यांना ६ महिनेपर्यंत त्यांच्या उंटासह वेठीस धरून नेले, तेव्हा गोपीरामजींचे फार हाल झाले, व ते त्या खेड्याला कंटाळले मग तेथून जवळच एक दीड मैलावर असलेल्या नवापुरा या गावाला त्यांनी सर्व माणसे नेऊन स्थलांतर केले. त्या वेळीं रामप्रतापचे वय सुमारे ३॥-४ वर्षांचे असेल, तरी पण “ घरातील सर्व सामान बैलगाडीत भरून त्यावर आपण बसून मोहनपुऱ्याहून नवापुऱ्याला गेलो ” हे श्री. प्रतापशेठजीस आजहि स्पष्ट स्मरते !



★

कालाडेरा येथील नवी हवेली

★



कालाडेरा येथील प्रताप सहारिया हायस्कूल.

## नवापुऱ्यास आल्यावर

रामप्रतापला घरात सर्वजण नुसते प्रतापच म्हणत, पण आजी व आई त्याला प्रेमाने 'परत्या' असेसुद्धा म्हणत असत नवापुऱ्यास आल्यावर काही दिवसानी शिवकुवरबाईला एक मुलगी झाली व तिचे नाव जडावबाई असे ठेविले

छोटूरामजी आता सर्व कामात गोपीरामजी याना मदत करू लागले, व मधून मधून पचायतीचे कामास गोपीरामजी यास कालाडेऱ्यास जावे लागे म्हणून हळूहळू कुटुबाची सर्व जबाबदारी छोटूरामजींचेकडे आली त्याचे तीन मुलगे मूलचद, नानगराम व प्रताप, हेहि आपल्या शक्तीप्रमाणे छोटूरामजींना मदत करीत असत घरातील गुरास रानात चरावयास नेण्याचे काम छोट्या प्रतापकडेच असे रानात गेल्यावर शेण गोळा करून त्याच्या गोवऱ्या थापण्याचे काम प्रतापकडेच होते, व ते तो मोठ्या आस्थेने करीत असे नवापुऱ्यापासून सुमारे अर्ध्या मैलावर एक फार जुनी व मोठी पायविहीर आहे तिच्यासमोर एका ओवरींत एक शिवलिंग आहे बाहेरच्या बाजूस जवळच आबे, जाभळे व खिरण्याची मोठमोठीं झाडे वर्तुळाकार लावलेली असून पलीकडे एक तलाव आहे ती जागा फार रमणीय आहे त्या तलावाच्या आसपास गुरे चरावयास सोडून, विहिरीवर पाणी पिऊन, सर्व मुलें व त्यातच छोटा प्रतापहि, दुपारीं त्या झाडांखालीं विश्राति घेत असत आसपास सर्व बाजूस वाळूचे ढीगचे ढीग असूनहि त्या झाडां-खालची वर्तुळाकार जागा मात्र अगदीं घरातल्या जमिनीसारखी झाडून स्वच्छ केल्याप्रमाणें नेहमी असते.

## साहेबरामपुरा

नवापुऱ्याला आल्यावर माती खाण्यामुळे प्रतापच्या हातापायाच्या काड्या होऊन पोट मोठे झाले त्यामुळे जवळच दोन मैलावर साहेबरामपुरा येथे शिवकुवरबाई प्रतापला घेऊन जाऊन दोन तीन महिने तेथे राहिली तेथे ती रोज मेढीचे दूध, साखर घालून, प्रतापला पाजीत असे तो मुलामध्ये घराबाहेर खेळत असला तरी ताटात ते दाट दूध घेऊन आई बाहेर जाई व प्रताप खेळत असेल तेथेच त्यास ते दूध पाजवी हे दूध पिण्याने प्रतापचे पोट झडले व एकंदर सर्व प्रकृति साफ बरी झाली

## बासा

प्रतापचे मामा श्रीनिवासजी, वृद्ध आजोबा बक्षीरामजी व आजी याचे घर सामोदजवळ बासा येथे होते नवापुऱ्यापासून बासा हे गाव सुमारे सहा कोसावर आहे मामाना मूल नव्हते, व प्रताप लहानपणापासूनच फार हुषार व तरतरीत होता, त्यामुळे मामा, मामी, आजोबा व आजी या सर्वांचे प्रतापवर फार प्रेम होते म्हणून वर्षातून चार-चार, सहा-सहा महिनेसुद्धा शिवकुवरबाई प्रतापला घेऊन बासा येथेच जाऊन राहात असे तिचे सर्व लहानपण तेथेच गेले होते मामाच्या घराजवळ एक प्रचड वडाचा वृक्ष होता त्याच्या उच फांदीवर झोपाळा बाधून शिवकुवरबाई

प्रतापला घेऊन नेहमी झोके घेत असे बासा हे सामोदच्या रावळजींचे गाव होते, व गावाजवळच रावळजींची एक मोठी बाग असून त्यात विहीर होती लहानपणी बासा येथे गेल्यावर त्या बागेतहि प्रताप खेळावयास जात असे

मामाच्या घरासमोर एक निंबोणीचे झाड होते त्यावर पिकलेल्या निंबोण्या तोडण्यास प्रताप नेहमी चढत असे एकदा तो असा चढला असताना त्याचा वडील भाऊ मूलचंद झाडाखालीं उभा होता त्याला प्रताप म्हणाला, "भाऊ, चार निंबोण्या खाली टाकतो, घे" ते ऐकून मूलचद पदर पसरून निंबोण्या झेलण्यास वर पाहात उभा राहिला निंबोण्या तर आल्याच नाहींत, पण प्रतापचा मात्र पाय निसटून प्रतापच प्रथम खालीं एका झोपडीच्या छपरावर पडला, व तेथून गडगडत खालीं दगडाच्या फरशीवर येऊन आपटला ! मामा समोरच आपल्या दुकानात बसले होते प्रताप पडल्याचे पाहताच ते झाडाखालीं आले व त्यानी प्रतापला उचलून घेतले परतु त्या अपघाताने प्रतापचा खांदा व हात इतका दुखावला, की पुढे चार सहा महिने त्यावर मालिश, लेप व शेक वगैरे उपाय करूनहि तो अगदीं पूर्ण बरा झाला नाही, व अद्यापहि ती जागा मधून मधून दुखते !

एकदा सामोदजवळच्या डोगरात महामाई देवीच्या दर्शनासाठी प्रतापची आई त्याला घेऊन गेली होती वाटेत एक नदी होती दर्शन घेऊन परत येताना देवीच्या देवळाजवळ प्रतापकरिता एक पैशाची शेव घेतली व ती शेवेची पुडी प्रतापचे हातात देऊन, त्याला पाठकुळीला घेऊन आई परत निघाली नदीतून येताना ती शेवेची पुडी प्रतापचे हातातून पाण्यांत पडली व वाहून जाऊ लागली ! परतु आईने तसेच धावत जाऊन ती पुडी धरली व प्रतापला परत दिली शेव पाण्याने आबट ओली झाली होती तरीहि प्रतापला शेव फार आवडत असल्याने तीच ओली शेव मिटक्या मारीत खात खात तो आईच्या पाठकुळीवर बसूनच घरी आला

बासा गाव एका डोगराच्या अगदी पायथ्याशीं आहे त्याच्या एका बाजूस बारीक वाळूच्या एक दोन टेकड्या आहेत बाशाला गेल्यावर प्रताप नेहमी त्या वाळूच्या टेकड्यावर खेळावयास जाई. प्रथम त्या मऊ मऊ वाळूतून टेकडीच्या माथ्यापर्यंत चढत जावें व नतर वाळूंत निजून गडगडत खालपर्यंत लोळत यावे, पुन वर जावे व खाली यावे, असा त्याचा व इतर मुलाचा नित्य खेळ चालत असे हा खेळ इतका आल्हादकारक आहे की, आजच्या वयातसुद्धा श्रीमत प्रतापशेठ मारवाडात बाशाला गेले म्हणजे पुन त्या टेकडीवर चढावे व गडगडत लोळत खाली यावे असा त्याना मोह होतो !

मामाच्या घरी एक शेळी होती तिला रोज प्रताप जवळच्या डोगरात चरावयास घेऊन जाई डोगरात कुसुंब्याचीं फुले पुष्कळ होतीं. ती गोळा करून प्रताप घरी घेऊन येत असे. तसेच डोगरातून लाकडे गोळा करून तींहि घरी घेऊन येण्याचा प्रतापचा नित्याचा क्रम असे बरोबर गावातील इतर काही मुलेहि आपापल्या शेळ्या घेऊन जात व परत येताना डोगरातलीं लाकडे आणीत. एखादे वेळी जगलातले रेंजर सरकारी लाकडे आणल्याबद्दल प्रतापला व मुलाना धरून

ठेवीत. पण मुलानी आजेवे केली म्हणजे जरा रागें भरून, पुन असे न करण्याबद्दल सागून सोडून देत असे पुष्कळ वेळा झाले, तेव्हा रेजरने प्रतापच्या मामास निरोप पाठविला की, "तुमचा भाचा रोज डोगरातली सरकारी लाकडे चोरून आणतो हे बरे नाही तुम्ही त्याला सक्त ताकीद द्या, नाही तर त्याचे प्रायश्चित्त तुम्हालाहि भोगावे लागेल"

## नवापुरा

प्रताप सुमारे पाच सहा वर्षाचा असताना नवापुऱ्यास एक दिवस एकदम स्फूर्ति आल्याप्रमाणे तो आपला वडील भाऊ मूलचद यास म्हणाला, "भाया! मारा ललाटसू थारो ललाट घस ले, तो थारोभी भलो हो जासी!" म्हणजे, माझ्या कपाळाला तुझे कपाळ घासून घे, म्हणजे तुझेहि भले होईल! अशी एकदम ऊर्मि प्रतापच्या डोक्यात का व कशी आली ते देव जाणे! त्या वेळी स्वत चे कितपत व काय भले आहे याचेहि प्रतापला नीट आकलन नव्हते, तरी पण 'एकदम स्फूर्ति आल्याप्रमाणे आपल्याला तो असे म्हणाला' असे मूलचदजी हयात असेपर्यंत सागत असत, व प्रतापलाहि आजसुद्धा ही गोष्ट स्पष्ट आठवते!

प्रताप सुमारे सहा सात वर्षाचा असताना एके दिवशी त्याची आजी चुलीजवळ स्वयपाक करीत होती व प्रतापची धाकटी बहीण जडावबाई जवळच रागत होती प्रतापहि तेथेच खेळत बसला होता मध्येच काही कामाला आजी बाहेर गेली, व जाताना उलथन्याने विस्तव चाळवून, विस्तव चुलीबाहेर ओढून ठेवून बाहेर कोण आले आहे ते पाहावयास आजी बाहेर गेली. जडावबाई रागत रागत चुलीजवळ गेली व त्या तापलेल्या उलथन्यावर बसली! त्यामुळे तिचे ढुगण पोळले व तिने आक्रोश सुरू केला त्या वेळी तेथे केवळ प्रताप व जडावबाई ही दोघेच होती जडावबाईचे रडणे ऐकून सर्व मडळी धावत घरात आली, व एकदर प्रकार पाहून प्रतापनेच धाकट्या बहिणीस डाग दिला असा त्याचा समज झाला! खरा प्रकार तो सागू लागला, पण त्याचे म्हणणे ऐकून न घेता सर्वानी त्याचेवरच हल्ला चढविला व त्याला चोपण्यास आरभ केला या गडबडीत शेजाऱ्यापाजाऱ्यानीहि प्रतापला बडविण्याची सधि साधून घेतली! बिचाऱ्या प्रतापला स्वत चा बचाव करण्याची सधीच दिली नाही!

नवापुऱ्याच्या घरात राहात असताना याच्या शेजारी एका बाजूस न्हाव्याचे व दुसऱ्या बाजूस सुताराचे घर होते सुताराचे व याचे अगण एकच होते घरासमोर एक लक्ष्मीनारायणाचे मदिर होते, व त्याच्या जवळच एक बैरागी आणि त्याचे पोर ही राहात असत सुताराच्या अगणात दुरुस्तीला आलेल्या गाड्या, मोडकी तुटकी चाके, लाकडाचे तुकडे वगैरे जिन्नस पडलेले असत एके दिवशी सायकाळी सुताराचे दारापुढे पडलेल्या गाडीत बसून प्रताप एकटाच खेळत होता इतक्यात ते बैराग्याचे पोर आले व त्याने प्रतापला खडे मारण्यास सुरुवात केली एकदोन खडे मारीपर्यत प्रतापने त्याकडे लक्ष दिले नाही, पण जवळपास वडील माणूस कोणी नाही असे पाहून त्या पोराने आणखी खडा मारला तिसरा खडा मारताच प्रताप गाडीच्या खाली उतरला व त्याने त्या बैरागयाच्या पोराला धरून खूप चोप दिला मग मोठीं माणसेहि आली व त्यानी त्या पोरास

हांकून दिलें. पण या गोष्टीवरून प्रतापचा स्वभाव दिसून आला कीं आपली कोणीं खोडी काढली तर एकदोन वेळां फार तर त्याची गय करायची, पण त्यानंतर पुनः खोडी काढल्यास जोराचा प्रतिकार करून खोडी काढणाऱ्यास चांगली अद्दल घडवावयाची.

नवापुरा व बासा या दोन गांवी मिळून प्रतापचीं लहापणचीं तीन चार वर्षें फार आनंदांत गेलीं. त्याला आतां सात वर्षें संपून आठवें वर्ष लागलें होतें. इतक्यांत एका चमत्कारिक व आकस्मिक योगायोगाने त्याला आपली जन्मभूमि सोडून दूरच्या देशांत जावें लागलें!

---



मोहनपुरा गावाबाहेरील विहीर व तलाव विहिरीवर श्रीमत प्रतापशेठ उभे आहेत



जन्मस्थान-मोहनपुरा
डाव्या हातास कढई पडली आहे तेथे
जुने घर होते, त्या घरात जन्म
चित्रात श्री शेठजी उभे आहेत



नवापुरा येथील स्वतःच्या राहात्या घराची आतां नवी बांधलेली शाळा. समोर श्रीमंत प्रतापशेठ उभे आहेत.



नवापुऱ्याजवळची सुंदर आंबराई



आंबराईजवळची विहीर

प्रकरण २ रें

# मारवाडांतून प्रयाण व चोपडयास आगमन

## दैवयोग

येन यत्रैव भोक्तव्यं सुखं वा दुःखमेव वा ।
स तत्र बध्वा रज्वेव बलाद्दैवेन नीयते ॥ १ ॥
द्वीपादन्यस्मादपि मध्यादपि जलनिधेर्दिशोऽप्यन्तात् ।
आनीय झटिति घटयति विधिरभिमतमभिमुखीभूत ॥ २ ॥

अर्थ —दैवाला ज्या प्राण्याकडून ज्या ठिकाणी सुख किंवा दुःख भोगवावयाचे असेल ते दैव त्या प्राण्याला त्या ठिकाणी दोरीने बांधल्याप्रमाणे ओढून नेते ॥ १ ॥

अर्थ —जर दैव अनुकूल झाले तर ते प्राण्याला दुसऱ्या द्वीपातून, समुद्रातून किंवा दिशाच्या टोकातूनहि आणून तत्काळ इष्टलाभ करून देते ॥ २ ॥

खानदेशांत चोपडा या गावी राहात असलेले एक श्रीमंत व्यापारी शेठ माणिकचंद रतिराम यास मुलगा नव्हता वऱ्हाडात सुरजी अजनगाव येथे त्यांच्याच गोत्रातला एक मुलगा आहे असे समजले म्हणून त्यांनी आपले वृद्ध व विश्वासू मुनीम गोकुळदास याना तिकडे पाठविले वऱ्हाडात त्यांनी दत्तक घेण्यास योग्य मुलाचा बराच शोध केला, पण तिकडे त्याना कोणी चागला मुलगा आढळला नाही ज्या मुलाची बातमी ऐकून ते गेले होते तो मुलगा त्याना पसत पडला नाही गोकुळदास तसेच रिकामे परत आले शेवटी माणिकचदशेठ याच्या तिसऱ्या पत्नीचे मामा काशीदास रामचद्र हे दत्तक घेण्यास चागला मुलगा शोधण्यासाठी मारवाडात कालाडेरा येथें गेले कालाडेरा हे त्याचे मूळ गांवच होते तेथे गेल्यावर त्यास पत्ता लागला की

नवापुऱ्याला छोटूरामजी म्हणून एक सालस व गरीब मारवाडी गृहस्थ राहतात त्याना तीन मुलगे असून त्यापैकीं एखादा पसत पडण्याचा बराच सभव आहे. ते ऐकून काशीदासजी काला-डेऱ्याहून नवापुऱ्यास गेले सर्व मुले पाहून त्यानी प्रतापलाच तावडतोब पसत केले, व त्याला दत्तक देण्यास छोटूरामजींची समति विचारली प्रतापची आजी घरात स्वयपाक करीत होती छोटूरामजी घरांत आल्यावर स्वयपाक करतानाच आजी छोटूरामजींना म्हणाली, "चागली सधि आलेली आहे प्रतापला दत्तक देण्यास काय हरकत आहे? चागला लाखाचा धनी होईल" "लाखापर बैठे छे!" असे आजी म्हणाली तरी छोटूरामजींच्या मनात प्रतापला दत्तक देण्याचे नव्हते तेव्हा टाळाटाळी करण्याच्या उद्देशाने ते म्हणाले की, "बाशाचे आजोबा, आजी व मामा याचा प्रतापवर फार लोभ आहे तेव्हा त्याना विचारल्याशिवाय मला समति देता येत नाही" मग असे ठरले की, वडील मुलगा मूलचद यास मामा, आजोबा व आजी याची समति विचारण्यास पाठवावे छोटूरामजींस आशा होती की, मामा, आजोबा व आजी प्रतापला दत्तक देण्यास समति देणार नाहीत, म्हणून त्यानी मूलचदास बासा येथे पाठविले तो बाशाला जाऊन दोन दिवस स्वस्थ राहिला, दत्तकाबद्दल काहीहि बोलणे काढले नाही, व परत येऊन आई-वडिलास खोटेच सागितले की, "प्रतापला दत्तक देण्यास मामा, आजी व आजोबा याची बिलकुल हरकत नाही मात्र प्रतापचे लग्नहि दत्तक घराकडूनच करवावे," असाहि मामाचा खोटाच निरोप सागितला!

आजी व मामा याची समति मिळाली असे समजल्यावर छोटूरामजींना फार आश्चर्य वाटले, व त्याचा हिरमोड झाला पण मग त्याचा निरुपाय झाला! इकडे घरात आजी दत्तक देण्यास अनुकूल होतीच त्यामुळे प्रतापला दत्तक देण्याचे वडिलानी शेवटी ठरविले तेव्हा काशीदासजी म्हणाले की, "मग प्रताप व धाकटी मुलगी ह्यास घेऊन तुम्ही दोघे माझ्याबरोबरच चोपड्यास चलावे" तेव्हा पाच सात दिवसात तयारी करून प्रताप व त्याची धाकटी बहीण जडावबाई या दोघा मुलास घेऊन, छोटूरामजी व शिवकुवरबाई काशीदासाबरोबर निघाली मजल दरमजल करीत ही सर्व मडळी चैत्र शुद्ध ३, सवत १९४४ या दिवशी, म्हणजे गणगौरीच्या उत्सवातच चोपड्यास येऊन पोचली प्रताप त्या वेळीं सुमारे साडेसात वर्षांचा होता

मारवाडातून चोपड्यास येताना प्रवासात काशीदासजीबरोबर जसराज नावाचा एक ब्राह्मण स्वयपाकी होता. वाटेत जागोजागी मुक्काम करून त्याचा डाळबाटीचा स्वयपाक व्हावयाचा, तेव्हा त्या ब्राह्मणाने जेवणाचे वेळीं प्रतापला तूप न वाढता सर्व तूप मागाहून आपणच गट्ट करण्याचा क्रम ठेविला! प्रतापचे वय लहान असल्याने त्याच्या लक्षात त्या वेळी ही गोष्ट आली नाही नतर चोपड्यास दत्तविधान झाल्यावर प्रतापशेठ मोठे पचायती शेठ बनले एकदा एका लग्नसमारभात पच या नात्याने ब्राह्मणास दक्षिणा वाटण्याचे काम श्री प्रतापशेट यांचेकडे आले हजर असलेल्या सर्व ब्राह्मणास दक्षिणा द्यावयाची, गैरहजर असतील त्यास द्यावयाची नाहीं, असे श्री प्रतापशेठ यानी ठरविले, व त्याप्रमाणे हजर असलेल्या सर्व ब्राह्मणास त्यानी दक्षिणा दिली जसराज त्या वेळी हजर नसल्याने त्यास दक्षिणा मिळाली नाही तो मागून आल्यावर दक्षिणा मागू लागला, तेव्हा

श्री प्रतापशेठजींनी त्याला नकार दिला तेव्हा जसराज दुसऱ्या ब्राह्मणाजवळ बोलला की, " वाटेत प्रतापला मी तूप वाढले नाही त्याचा हा आता बदला घेत आहे " हे शब्द शेठजींनी ऐकले व जसराजला विचारले की, " कसला बदला रे ? " तेव्हा त्यानेच ही कबूली दिली ! तेव्हा श्री प्रतापशेठ म्हणाले, ' त्या वेळी माझ्या लक्षात ही गोष्ट आली नव्हती, व बदला घेण्याचा माझा विचारहि नव्हता पण तुझ्या चुकीचे तुला प्रायश्चित्त मिळाले ना ? ' ते ऐकून जसराज मनातल्या मनात फार विरमला

## चोपड्यास आल्यावर

माणकचद रतिरामशेठ हे त्या वेळचे चोपड्याचे एक धनाढ्य व्यापारी होते गावातले ते नगरशेठ व सरपच होते गावाच्या मधोमध दोन मजली दुकान असून जवळच राहावयाचे निराळे घर होते त्याचे स्वत चे एक जीन असून शेतीवाडी व सावकारी बरीच होती एकदर इस्टेट सुमारे चार लाखाची असावी सरकारी अधिकारी, अतिथि, हरदास वगैरे कोणी चोपड्यास आल्यास त्याचा मुक्काम माणकचदाकडेच बहुधा असे तीन विवाह होऊनसुद्धा त्याना मुलगा नव्हता, म्हणून ते थोडे विपण्ण असत वय बरेच असल्याने स्वभावाने ते थोडे चिडखोर व तापट झाले होते गावात त्याचा फार वचक असून घरातील नोकरचाकर त्यास भिऊन असत मारवाडातील गरीबीच्या पण स्वतत्र वातावरणातून चोपड्याच्या श्रीमत घरात आल्यावर प्रतापला प्रथम प्रथम फार अवघड वाटू लागले छोटूरामजी व माणकचद ह्याचा पूर्वपरिचय मुळीच नव्हता, त्यामुळे माणकचदजींच्या घरातील वातावरण त्यानाहि थोडे परके व अवघड वाटले काशीदासजी हाच काय तो त्याचा मोठा आधार व वशिला त्याची भाची माणकचदाची तिसरी पत्नी मामानी चागला मुलगा दत्तक घेण्यास आणला म्हणून त्या आईस प्रतापबद्दल प्रेम वाटत असे तरी पण दत्तकविधान, आल्याबरोबर एकदम काही केले नाही, काही दिवस मुलास ठेवून घेऊन मग दत्तकविधान करावे असा माणकचदजींचा विचार असावा, पण तोपर्यंत प्रताप व त्याचे जनक आई-वडील याची मन स्थिति जरा अवघडल्या-सारखीच राहिली असावी !

---

## प्रकरण ३ रें

## शालेय शिक्षण

**मातेव रक्षति पितेव हिते नियुंक्ते । कान्तेव चाभिरमयत्यपनीय खेदम् ।**
**लक्ष्मीं तनोति वितनोति च दिक्षु कीर्तिं । किं किं न साधयति कल्पलतेव विद्या ।।१ ।।**

अर्थ :— विद्यादेवी विद्यावंताचे सर्व संकटांतून आईप्रमाणे रक्षण करते. बापाप्रमाणे सर्व हित-कारक गोष्टीकडे प्रवृत्त करते. साध्वी स्त्रीप्रमाणें सर्व खेद नाहींसे करून सर्वतोपरि आनंद देते. ऐश्वर्याची अभिवृद्धि करते, व सर्व जगांत कीर्ति गाजविते. म्हणून ती कल्पवृक्षाप्रमाणे आहे. विद्यादेवी प्रसन्न झाल्यास ती काय देणार नाहीं ? ।। १ ।।

प्रताप चोपड्यास आल्यावर कांहीं दिवस तसेच लोटले. मग माणकचंदशेठ यांनीं प्रतापला शाळेंत घालण्याचे ठरविले. प्रतापला यापूर्वी शाळेचा संस्कार मुळींच झाला नव्हता. चोपड्यास सीतारामभाऊ या नांवाचे एक कनोजी गृहस्थ होते. त्यांनीं एक खाजगी शाळा काढली होती. त्यांच्या शाळेत प्रताप जाऊं लागला. ही शाळा म्हणजे २५ × २५ फूट अशी एक चौकोनी जागा होती. ह्यात सर्वांनीं बसावयाचे. मध्ये गुरुजींचें अंथरूण पसरलेलें असे. कोपऱ्यांत धान्याच्या कणग्या व शेतीचीं औतें पडलेली असत. विळे व कोयते वगैरे खुंट्यांवर अडकविलेले असत. सीतारामभाऊ उत्तम शिक्षक असल्याचा लौकिक होता. छडी लागे छम् छम्, विद्या येई घम् घम् । ह्या सूत्रावर त्यांचा विश्वास होता. त्यांचे डोळे घारे असून आपलीं नखे ते नेहमीं वाढलेलीच ठेवीत असत. आपल्या अंथरुणावर बसून चौफेर नजर टाकून ते सर्व मुलांवर करडा अंमल ठेवीत. त्यांच्या शाळेत औटकीपर्यंत उजळणी, अक्षरओळख, बाळबोध व मोडी लिहिणें, स्टॅप वगैरे वाचणें एवढ्या गोष्टी शिकविल्या जात. कित्येक वेळीं स्टॅप किंवा बखरी भिंतीला चिकटवून दुरून मुलांस वाचावयास लावीत. मुलगा चुकला तर वेळेवर जें हत्यार हातास येईल त्यानेंच त्या मुलास बडवून काढीत. मुलगा चुळवूळ करूं लागला तर दोघांनीं त्याचे हातपाय धरून, काठी, ऊंस, दांडा, कशानेंहि

ते त्यास बडवीत छडीचा उपयोग तर रोजच करीत असत एकदा कणगी रिकामी असताना, त्यात एक साप जाऊन बसला दुसरे दिवशी मास्तर एका मुलावर रागावले व त्यानी त्या मुलास उचलून कणगीत टाकून दिले ! साप पाहून भेदरल्याने ते मूल मोठ्याने ओरडू लागले, परतु हा त्याचा कांगावा आहे असे ठरवून सीतारामभाऊनी वरून कणगी बद केली व तो मुलगा साप चावून मेला ! अशा त्या पतोजीना माणकचदानी समक्ष बोलावून प्रतापला त्यान्च्या स्वाधीन केले व सांगितले की, 'यास नीट शिकवा, इतर मुले तुम्हास आणा दोन आणे फी देतात, आम्ही १ रु फी देऊ ह्याचे मास मास तुमचे व हाडे हाडे आमची !'

ह्या शाळेत दाखल झाल्यावर सर्व विद्यार्थी भिंतीला लागून सोप्यात बसत असत, परतु प्रतापची जागा गुरुजीन्च्या अथरुणाजवळ नेमलेली असे दर शुक्रवारी सगळ्या मुलानी घरी जाऊन पसाभर धान्य आणून गुरुजीस द्यावे, असा शिरस्ता होता ह्याला पिचकी म्हणत हे आणण्यास शुक्रवारी मुले तास दोन तास घरी जात, परतु माणकचद १ रु फी देत असल्याने प्रतापला निराळे धान्य द्यावे लागत नसे पण त्यामुळेच प्रतापला पिचकीची सुट्टी न मिळता तेथेच बसून राहावे लागे ! बाराखड्या शिकताना क, ख, ग, घ, ङ या बाराखड्या लिहून झाल्यावर प्रतापने मास्तरास विचारले की, "भाऊ, पुढल्या सर्व बाराखड्या अशाच काढायच्या ना ? म्हणजे पहिली इ ऱ्हस्व, दुसरी दीर्घ, वगैरे, वगैरे ?" भाऊ म्हणाले, "हो, अशाच काढायच्या" त्याप्रमाणे प्रतापने सर्व बाराखड्या ज्ञ पर्यंत बिनचूक काढून दाखविल्या दर शनिवारी सर्व अभ्यासाची उजळणी होत असे एका शनिवारी इतर बऱ्याच मुलास चागलाच चोप बसल्याचे पाहून प्रतापला दहशत बसली, आणि रोज जी बाराखडी तो बिनचूक काढून दाखवीत असे तीहि आज त्यास काढता येईना त्याची बुद्धि कुठित झाली त्यावर मास्तर सतापले व दोन्ही माड्यावर छडीने इतका मार दिला की, त्याचे कातडे फाटून रक्तबबाळ झाले ! त्यावर आणखी स्वत न्या तीक्ष्ण नखानी ओरबाडून, दातओठ खाऊन, घारे डोळे वटारून ते ओरडले, 'का, मौतीने डेरे दिले आहेत ?' "काय मृत्यला बोलावतो आहेस ?" त्या दिवशी नित्याप्रमाणे सर्व मुलाना १० वाजता सोडून देऊन प्रतापला मात्र ११ वाजेपर्यंत डाबून ठेवले ! लगडत लगडत घरी आल्यावर मोठ्या आईन्च्या गळ्यात पडून प्रताप रडला, व रक्ताळलेल्या माड्या त्याने तिला दाखविल्या आईला फार वाईट वाटले व तिने तावडतोब काशीदासजीना बोलाविले प्रतापची ती अवस्था पाहून त्यासहि फार दु ख झाले मग त्यानी माणकचदास दुकानावरून बोलावून आणून प्रतापची स्थिति दाखविली व विचारले की, 'याला विद्या शिकवावयाची आहे की मारून टाकायचे आहे ? ह्यासाठी का मी त्याला मारवाडातून आणला ? ह्या गरीब मुलाचे असे हाल होता कामा नयेत' असे त्यानी माणकचदास बजावले त्या वेळी सर्वजण हळहळले नतर काशीदासजींनी प्रतापला आपल्या घरीच राहावयास नेले, व नतर दोन महिने प्रताप त्यान्याच घरी राहिला

## राखी पौर्णिमा

पुढे श्रावण महिन्यात राखी पौर्णिमा आली त्या सणाला माणकचदान्या दुकानातून सर्व ब्राह्मणास दक्षिणा वाटली जात असे मुलगा गावात असताना स्वत च दक्षिणा वाटणे बरे

दिसत नाहीं, असे मुनीम गोकुळकाका ह्यांनी शेठजींस सांगितले, व त्यावरून काशीदासजींना बोलावून 'मुलाला आमचेकडे पाठवून द्या, ह्यापुढे असला प्रकार होणार नाहीं,' असे म्हणून आश्वासन दिले. माणकचंदजींचेसमोर आल्यावर प्रताप म्हणाला की, 'मी आता मार खाणार नाहीं.' तेव्हा ते विनोदाने म्हणाले की, 'विद्येसाठीं केव्हा केव्हा मार खावा लागेल.' तेव्हा प्रताप म्हणाला, (थोपटल्यासारखे हाताने दाखवून) 'असा थोडा थोडा मार खाऊं.' नंतर प्रताप घरीच राहू लागला व हे सीताराम पंतोजींचे प्रकरण संपले.

श्रावण पौर्णिमेपासून अदांजे चैत्रापर्यंत घरीं जेवावयाचे व दुकानात बसावयाचे, हाच प्रतापचा कार्यक्रम असे. एके दिवशी प्रताप दुकानात बसला असताना एक हमाल दुसऱ्या एका हमालाला ओरडून म्हणाला, "अरे, इकडचेहि खोवले व तिकडचेहि खोवले." ते ऐकून माणकचंदांनी विचारले, "काय रे, तो हमाल काय म्हणाला?" प्रतापला तो अर्थ समजला होता, परंतु चुकलो तर मार बसेल ह्या भीतीने त्याने म्हटले की, "मला काहीं समजले नाहीं." ते ऐकून माणकचंदजींनी ठरविले की, ह्यास पुनः शाळेत घातले पाहिजे! म्हणून लगेच दुसरेच दिवशी त्यांनीं प्रतापला चोपड्यांच्या 'म्युनिसिपल मराठी शाळा नं. १' मध्ये घातले. (व घरीं शिक्षणासाठीं धोंडोपंत मास्तरांची नेमणूक केली. हे मास्तर सुंदरगढींच्या शाळेत शिकवीत असत.) त्या शाळेत काहीं शिक्षण झाल्यावर प्रतापला पाटीलगढीच्या शाळेत पाठविण्यात आले. त्या शाळेत दुसऱ्या यत्तेत असताना परीक्षेचा दिवस आला. परीक्षा घेण्यास बाहेरून डेप्युटीसाहेब आले होते. पुस्तकात जॉर्ज वॉशिंग्टनचा धडा आला. त्यावर डेप्युटीसाहेबांनी काहीं प्रश्न विचारले. त्यांनीं विचारलेला एक प्रश्न पहिल्या नंबरापासून शेवटच्या नंबरापर्यंत कोणासच सांगता आला नाहीं. प्रतापच्या पुढील दोन तीन मुलांना विचारून झाल्यावर मग प्रतापला त्या प्रश्नाचे उत्तर सुचले. तेव्हा तो मध्येच म्हणाला, "सर, मी उत्तर सांगतो." ते त्याला थांब असे म्हणाले व उरलेल्या सर्व मुलांस विचारले, परंतु कोणासच उत्तर आले नाहीं. तेव्हा ते प्रतापला म्हणाले, "आता सांग," व प्रतापने सांगितलेल्या उत्तराने साहेब फार खूष झाले.

दुसरे दिवशी शाळेत जाण्यास प्रतापला थोडा उशीर झाला. तरी साहेबांनी त्यांच्या वर्गाची परीक्षा थांबवून, त्यास घरीं बोलावणे धाडले! आणि त्यानंतर परीक्षा होऊन, प्रताप दुसऱ्या वर्गाच्या परीक्षेत उत्तम पास झाला.

दुसऱ्या इयत्तेची परीक्षा पास झाल्यानंतर प्रतापला शेखपुऱ्याच्या वस्तादजींच्या शाळेत घातला. ती शाळा नुकतीच उघडली होती. तेथील हेडमास्तर मधून मधून बाहेर कामाला गेले तर शाळेतीलच एखाद्या विद्यार्थ्यास हेडमास्तरचा चार्ज देत, व प्रताप हुषार व नगरशेठचा मुलगा, म्हणून तो चार्ज प्रतापकडेच येत असे. मास्तरकीचा चार्ज आल्यानंतर मास्तरांची ड्यूटी म्हणजे मुलांनी अभ्यास केला की नाहीं हे विचारणे, ह्याऐवजी आपल्या प्रतिपक्षी विद्यार्थ्यांवर सूड उगवून घेण्यावरच ह्या जुजबी हेडमास्तरांचे लक्ष असे. थोड्याशा कारणानेसुद्धा एखाद्याला यावयास उशीर झाला तर त्यास चांगला चोप देऊन वचपा काढून घ्यावयाचा! या सर्व

कामासाठी प्रतापच योग्य असा हेडमास्तराचा ग्रह झाला होता हे हेडमास्तर मुसलमान असून त्याची ही खाजगी शाळा होती मुले त्यास वस्तादजी म्हणत

काही दिवस वस्तादजीन्या शाळेत शिकल्यावर प्रतापला पुन म्युनिसिपल शाळा न १ मध्ये घातले व तेथे मराठी ४ थी पास होईपर्यंत त्याचे शिक्षण झाले त्या शाळेत नुकताच इग्रजी शिक्षणाचाहि वर्ग सुरू झाला होता मराठी शाळेचे वर्ग सकाळ दुपार, दोन्ही वेळी भरत असत, व इग्रजीचा वर्ग ११ वाजता सुरू होई त्याकरिता प्रतापला घरून असा हुक्रम सुटला की सकाळी १० वाजेपर्यंत त्याने मराठी शाळेत जावे, व घरी येऊन जेवून लगेच इग्रजीन्या वर्गात जावे त्याचा परिणाम असा झाला की, प्रतापची दुपारची मराठी शाळा बुडली, त्यामुळे वर्गाबरोबर अभ्यास न होऊन तो वर्गाचे मागे राहिला इग्रजीचे तर नवेच शिक्षण होते त्यालाहि सकाळी मराठी शाळत जावे लागत असल्याने अभ्यासाला वेळच मिळत नसे त्यामुळे ना धड इग्रजी ना मराठी, अशी त्याची अवस्था होऊन प्रतापचे दोन्हीकडील लक्ष उडाले व त्याने अभ्यासच अजिबात सोडला !

मराठी ४ थी पास होऊन तो ५ वीत गेलेला होता त्याच सुमारास त्यान्या शाळेसमोर नानाजी गोविंद शिदीड ह्या गृहस्थानी एक नवीन इग्रजी शाळा काढली त्या शाळेत मराठी व गणित विषय शिकविण्याचे अध्यापक सावळारामपत नाईक होते त्या शाळेत प्रतापला घातले त्या शाळेत असताना प्रतापन्या वर्गात एका श्रीमत धनगराचा उनाड मुलगा होता त्याचा क्रम असा की, शाळा सुटल्यावर बाहेरन्या ओट्यावर जाऊन मास्तराना शिव्या देऊन पळून जावे एक दिवस त्याने प्रतापलाहि फितवून आपल्याबरोबर ओट्यावर नेले पण तेथे गेल्यावर प्रतापच्या तोडातून शिव्या तर निघाल्याच नाहीत, पण आतूनसुद्धा, हे ठीक नव्हे, असे वाटून शिव्या न देता प्रताप घरी निघून गेला

एकदा सावळाराम मास्तर फळ्यावर गणिताचे उदाहरण सोडवीत होते त्या वेळी प्रतापने त्यास एक प्रश्न विचारला व त्यानी उत्तरहि दिले मग दुसऱ्या मुलाने प्रश्न विचारला, पण त्यान्यावर मास्तर रागावले व त्यानी त्यास छडी मारली त्यावर मुलगाहि रागावून म्हणाला, "सर, तुम्ही पक्षपात करता ! प्रतापला तुम्ही उत्तर दिले व मला मात्र मारलेत" तेव्हा मास्तर म्हणाले, की "गाढवा ! प्रश्न कसा विचारावा त्याची त्यास अक्कल आहे परतु तुला तीहि नसल्याने तुला चोप मिळाला "

प्रताप त्या शाळेत असतानाच पुढे माणकचदशेठ आजारी पडले, व भाद्रपद शुद्ध ५, सवत् १९५० चे रात्री ते वारले योगायोग असा की, ते मरण्यान्या पूर्वी पाचच मिनिटे छोटूराम-शेठ मारवाडातून, सेधव्यावरून नुकतेच पायी पायी घरी येऊन पोचले होते त्याची दृष्टादृष्ट झाली व माणकचदानी प्राण सोडला ! ते वारल्यामुळे प्रतापचा शाळेतील विद्याभ्यास येथेच सपला !

## मध्यंतरीची हकीकत

मारवाडातून चोपड्यास आल्यावर सुमारे दोन वर्षांनी म्हणजे सवत् १९४६ मिति फाल्गुन वद्य २ ह्या दिवशी माणकचदानीं प्रतापचे विधिपूर्वक दत्तविधान करून त्याचे नाव

मोतीलाल असे ठेविले त्यानंतर एक दोन वर्षांनी संवत् १९४८ त प्रताप १२ वर्षांचा असताना माणकचंदांनी चोपड्याच्याच राजश्री देवचंद डालूशेठ ह्याची सुशील मुलगी सुंदराबाई हीस पसंत करून मोठ्या थाटाने तिचा प्रतापशी विवाह केला त्या वेळी त्यांनी सर्व चोपडा गावास मेजवानी दिली लग्नात माणकचंदांनी जो दारूखाना उडविला तो अजून म्हाताऱ्या लोकांच्या स्मरणात आहे चोपड्याच्या नदीत लंकादहनाचा देखावा करून मोठा मारुती व प्रशस्त लंकानगरी करून ती सर्व उडविण्यात आली ती मौज पाहण्यास आसपासच्या खेड्यांतीलहि मंडळी जमली होती या प्रथम पत्नीस तीन चार अपत्ये झाली पहिला मुलगा 'किशन' एक वर्षाचा होऊन गेला, व पुढील दोन तीन मुले अगदी लहानपणीच वारली

माणकचंदांच्या मृत्यूनंतर दुकानातील त्यांचे मुनीम गोकुळकाका ह्यांचीच दुकानावर देखरेख चालू राहिली ते वयस्क असल्याने व त्यांचे प्रेमळ वागणुकीमुळे प्रतापशेठ त्यांस काका म्हणत व वडिलांप्रमाणे मान देत गोकुळकाकांना अनेक वर्षांचा अनुभव असल्याने दुकानाचा व इस्टेटीचा सर्व कारभार ते दक्षतेने व सचोटीने करीत असत माणकचंदशेठ वारल्याने साह-जिकच प्रतापला आता सर्वजण प्रतापशेठ म्हणू लागले त्यांचे दत्तक घरातील नाव जरी मोतीलाल ठेवले होते तरी व्यवहारात प्रतापशेठ हेच नाव रूढ झाले दुकानाची सर्व जबाब-दारी आता वास्तविक त्यांच्याचकडे आल्याने कर्तव्य म्हणून ते रोज दुकानावर जाऊन बसत असत परंतु दुकानाच्या कामाकडे त्यांचे मुळीच लक्ष नसे वडील वारल्यामुळे त्यांचे मन खट्टू झाले असेल, अजून घरात लक्ष लागत नसेल, असे वाटून काही दिवस गोकुळकाकांनी दम धरला माणकचंदास गाणे-बजावणे वगैरे कलांचा नाद होता ते स्वतः जरी गात नसत तरी त्यांचे दुकानात वरच्या मजल्यावर सतार, पेटी, तबला, कछवा, सारंगी इत्यादि गायन-वादनाची साधने ठेवली होती ती सामुग्री पाहून गोकुळकाकास वाटले की, सध्याच्या मनःस्थितीत प्रतापला जर गायनवादन शिकविले तर त्यांची करमणूक होईल, ह्या साधनांचाहि सदु-पयोग होऊन माणकचंदांचे नाव होईल म्हणून त्यांनी त्या कामासाठी एक चांगला शिक्षक ठेवण्याचे ठरविले, व त्याची वाटाघाट दुकानात चालली असताना, चिंतामणदादा चौधरी ह्या नावाचे गृहस्थ त्याच दुकानात जमाखर्च शिकावयास येत असत, त्यांनी रा सावळाराम-पंत नाईक ह्यांचे नाव सुचविले त्या वेळी सावळारामपंत फारच आजारी होते इतके की त्यांच्या जगण्याची आशा वाटत नव्हती त्यांची घरची स्थिति फारच हलाखीची होती मामलेदार कचेरीत काही दिवस नाइकाची नोकरी करून मामलेदाराने त्यांच्यावर अन्याय केला म्हणून त्यांनी ती नोकरी सोडून दिली होती मग खाजगी शाळेत नोकरी धरली, पण आजारामुळे तीहि सुटली औषधपाणी करण्यास जवळ पैसा नव्हता परंतु त्याच वेळी धरणगाव ते चोपडा पक्क्या सडकेचे काम चालू होते त्यावर काम करणाऱ्या कैद्यांना औषधोपचार करण्यास एक पारशी डॉक्टर होते त्यांना कोणी तरी बोलावून आणून सावळारामपंत नाईक यास त्यांचा इलाज करविला त्या सज्जन डॉक्टराने सावळाराम मास्तरांची गरीबी पाहून त्यांना अगदी फुकट इलाज करून चांगले बरे केले त्या आजारातून ते चांगले

बरे झाल्यावर चिंतूदादा त्यास दुकानावर घेऊन आले, व प्रतापशेठजींस सतार शिकविण्यासाठी त्यांची रीतसर नेमणूक झाली, व त्यास द म रु २ पगार ठरला ते रोज दुकानात येऊन, दुकानाच्या माडीवर प्रतापशेठजींस सतार शिकवू लागले त्यांना मारवाडातून येऊन आता पाचसहा वर्षे झाली होती, तरी अजून त्यास चांगले शुद्ध मराठी बोलता येत नव्हते पण आपल्याच दुकानातील कीर्दीची नक्कल करावयास लावल्याने त्यांचे मोडी हस्ताक्षर बरेच घटविले गेले होते

## सावळाराम मास्तर

सावळाराम मास्तर हे जरी गवय्ये नव्हते, ताना वगैरे मारण्याची त्यांची फारशी तयारी नव्हती, तरी ते फार गोड व सुरेल गात असत त्याचप्रमाणे सतार वाजविण्यातहि हात फार तयार नव्हता, तरी पण सोंच वगैरे ते फार गोड वाजवीत असत त्यांची शिकविण्याची पद्धत फार चांगली होती त्यांनी एकदोन गवयीहि तयार केले होते त्याचप्रमाणे सावळारामपंतांना संस्कृत जरी फारसे येत नव्हते, तरी त्यांची शिकविण्याची हातोटी उत्तम म्हणून त्यांचेजवळ शिकून एक दोन शास्त्रीहि तयार झाले होते सावळाराममास्तरांचा गणित विषय अति उत्तम होता ते स्वत विद्यार्थी असतानासुद्धा, कित्येक वेळा गणिताच्या शिक्षकास एखादे उदाहरण अडले तर ते सावळारामास विचारीत, व हे त्यांचे समाधान करीत असत त्यांना गोड पदार्थ खाण्याची इतकी मनापासून आवड होती की, त्यांच्या वडिलांनी त्यास रोज पेढे व बर्फी आणून न दिली तर ते रागावून दुप्पट आणावयास सांगत, आणि शिवाय वडिलास आणा दोन आणे दंड करीत ! त्यांचे वडील मामलेदार कचेरीत शिपायांवर नाईक होते, व त्यास दरमहा ७ रु पगार मिळे तेवढ्या पगारात कुटुंबाचा खर्च भागवून पेढे बर्फी आणण्यास त्यास क्वचितच सवड होई स्वत सावळारामहि वडिलांचे मागून कचेरीत नोकरी करीत होते एके दिवशी ते कामासाठी एका गावी जाऊन आल्यावर पुन त्याच दिवशी दुसऱ्या गावावर जाण्याचा मामलेदारांनी त्यांना हुकूम केला सावळारामपंत म्हणाले की, " माझी ड्यूटी संपली आहे, आता दुसऱ्या कोणास पाठवा " त्यावर मामलेदारांनी रागावून " तुम्हालाच गेले पाहिजे " असे सांगताच मास्तरांनी तेथेच आपल्या नोकरीचा राजीनामा दिला व ते घरी गेले ! ही नोकरी सोडल्यावर काही दिवस लासूर वगैरे जवळच्या गावी दारूच्या ठेकेदाराकडे जमाखर्च लिहिण्याचे काम ते करू लागले त्यानंतर शिर्दीड मास्तरांनी खाजगी इंग्रजी शाळा काढली तीत गणित व मराठी शिकविण्यासाठी त्यांची नेमणूक झाली तेथे असतानाच ते फार आजारी पडले, व त्यातून बरे झाल्यावर प्रतापशेठजींचे सतारशिक्षक झाले

---

## प्रकरण ४ थें

## गुरुशिष्यभेट व अध्यात्मयोग

महाजनस्य संसर्गः कस्य नोन्नतिकारकः ।
पद्मपत्रस्थितं वारि धत्ते मुक्ताफलश्रियम् ॥ १ ॥
जाड्यं धियो हरति सिञ्चति वाचि सत्यं ।
मानोन्नतिं दिशति पापमपाकरोति ॥
चेतः प्रसादयति दिक्षु तनोति कीर्तिम् ।
सत्संगतिः कथय किं न करोति पुंसाम् ॥ २ ॥

अर्थ :—सत्पुरुषांची संगति कुणाचा उत्कर्ष करीत नाही ? तर सर्वांचाच उत्कर्ष करते. पाहा कीं, कमलपत्राची संगति जलबिंदूने केली असतां त्याला मोत्याची शोभा आली. ॥ १ ॥

अर्थ :—सत्संगति बुद्धीचा मंदपणा घालविते. वाणीमध्यें सत्याचा वर्षाव करते, म्हणजे खरें बोलावयास शिकविते. जगांत प्रतिष्ठा वाढविते. सर्व पाप नाहीसे करते. चित्त प्रसन्न करते. सर्व जगांत कीर्ति वाढविते. मग सांग बरे, सत्संगति काय करणार नाही ? तर सर्वच करूं शकेल. ॥ २ ॥

गुरुवर्य सावळाराम मास्तर यांची प्रतापशेठ यांचे सतारशिक्षक म्हणून रीतसर नेमणूक झाली. त्याप्रमाणे मास्तरसाहेब रोज सकाळी व दुपारीं येऊन दुकानाचे माडीवर प्रतापला सतार शिकवूं लागले. कांहीं दिवसांनंतर, सतारीचे शिक्षण चालू असतांनाच, मास्तरांच्या मनांत आलें कीं, प्रताप हा हुषार मुलगा आहे, तेव्हां त्याला मराठीहि चांगलें शिकवावें, व त्याचें सर्वसाधारण ज्ञान वाढवावें. मग त्याकरितां त्यांनी पुढील चार पुस्तकें मागविलीं:—

( १ ) मधुमक्षिका
( २ ) बेकनचे निबंध
( ३ ) नशीब आणि उद्योग
( ४ ) डॉ जॉन्सनचे रासेलस ( कै चिपळूणकरकृत भाषान्तर )

वरील चार पुस्तकांपैकी पहिली तीन त्यांनी प्रतापकडून पुष्कळ वेळा चांगली वाचवून घेतली पण चिपळूणकरांची भाषा फार उत्तम म्हणून 'रासेलस' हा ग्रंथ त्यांनी प्रतापकडून तोंडपाठच करून घेतला त्यामुळे प्रतापच्या तोंडात उत्तम मराठी भाषा पक्की बसली एखादे दिवशी सांगितलेला पाठ तयार नसला तर ते प्रतापला उभे राहण्याची शिक्षा करून उभ्यानेच तो पाठ वाचून पाठ करावयास लावीत त्या वेळी प्रतापचे वयहि विद्यार्थिदशेला अनुकूल असल्यामुळे ती शिक्षा प्रताप आनंदाने पत्करी या पाठान्तरानेच त्या वेळेपासून चांगले मराठी वाङ्मय वाचण्याची प्रतापला गोडी लागली, व सावळाराम मास्तरांनीहि त्यानंतर अनेक उत्तमोत्तम मराठी ग्रंथ आणवून तेहि प्रतापकडून चांगले वाचवून घेतले

सतारीचे शिक्षण रोज थोडा वेळ चालूच होते, परंतु आता मराठी वाङ्मयाच्या अभ्यासावर अधिक भर असे दोन वर्षे असा अभ्यास झाल्यावर, 'प्रतापची भाषा आता चांगली शुद्ध व प्रौढ झाली आहे, असे चोपड्यातील मोठे लोकहि म्हणू लागले पण त्याला आता वाचनाची गोडी लागल्याने दुकानाचे कामात प्रतापचे मुळीच लक्ष लागेना [१] व 'तो दुकानात न बसता दिवसभर माडीवर जाऊन सतारच वाजवीत बसतो,' असा लोकांचा समज झाला [१] पण वास्तविक फारशी सतार न वाजविता प्रताप आपला सारा वेळ वाचनात घालवीत असे दुकानाचे कामात त्याचे लक्ष नव्हते ही गोष्ट खरी याला कारणे अनेक असतील लहानपणी मारवाडात असताना घरच्या गरीबीमुळे सावकारी दुकान चालविण्याची कधी वेळच आली नाही पुढे सात–आठ वर्षांच्या वयातच मारवाडातून तो अचानक खानदेशात आला व चोपड्याचे धनिक व्यापारी शेठ माणकचंद यांनी त्याला दत्तक घेतले त्यामुळे प्रतापच्या लहानपणच्या मोकळ्या व दृढ वृत्तीस मोठाच हादरा बसला मनाला वाटेल तिकडे रानात मोकळे हिंडण्याचे स्वातंत्र्य गेले, व श्रीमंत घराण्यात दत्तक आल्यामुळे तेथील शिष्टाचार पाळणे आवश्यक झाले गरीबी जाऊन श्रीमंती आली याबद्दल समाधान वाटण्याइतके त्याचे वय नव्हते 'इतके दिवस मोकळा होतो तो आता कचाट्यात सापडलो,' याची मात्र त्याला तीव्र जाणीव झाली [१] त्याची आई शिवकुंवरबाई व वडील छोटूरामजी – ही दोघे जरी काही दिवस चोपड्यास राहिली होती, तरी माणकचंदजींच्या कडक स्वभावामुळे प्रतापला जनक मातापित्यांशी मोकळेपणाने वागणे परिस्थितीमुळे अशक्य झाले काही दिवस तरी जुना जिव्हाळा सुटला व दत्तक मातापित्यांशी नवीन जिव्हाळा अद्याप उत्पन्न झाला नाही अशा मन स्थितीत प्रताप मनातून जरा खिन्न व उदासीन झाला असावा असे वाटते परंतु हे औदासीन्यहि फार काळ टिकेल इतके त्याचे प्रौढ वय नसल्याने, नवीन परिस्थितीच्या अडचणी हळहळू विसरून दत्तक घराण्याशी प्रताप समरस होऊ लागला होता परंतु इतक्यात, वयाच्या चौदाव्या वर्षीच त्याचे दत्तक वडील, शेठ माणकचंद हे आजारी पडले व त्या आजारातच

१ प्र गौ ग्र ३

ते लौकरच वारले त्यामुळे घराची, दुकानाची व एकदर कारभाराची सर्वच जबाबदारी प्रतापच्या शिरावर एकदमच येऊन पडली आतापर्यंत माणकचदजी स्वत सर्व कारभार दक्षतेने करीत असल्यामुळे, व प्रतापचे वयहि लहान असल्यामुळे दुकानाचे कामात लक्ष देण्याचे त्याला कारणहि नव्हते व त्याची माहितीहि नव्हती दुकानाचे वृद्ध व विश्वासू मुनीम 'गोकुळकाका' हे पूर्वीपासूनच सर्व कारभार चोख रीतीने करीत असत, व माणकचदशेठ वारल्यानतरहि पुष्कळ वर्षे ते तसा करीत राहिले परतु आता गोकुळकाकाना वाटे की प्रतापने आता हळूहळू दुकानाचे कामात लक्ष घालावे, सर्व कारभार समजून घ्यावा, व स्वत काम करू लागावे त्यानी अनेक वेळा प्रतापला तसे सागूनहि पाहिले पण एक ना दोन! प्रतापचे दुकानाचे कामाकडे केव्हाच फारसे लक्ष लागले नाही! त्यामुळे गोकुळकाका तर खट्टू झालेच, पण माणकचदशेठजींचे वडीलधारे स्नेही उघड म्हणू लागले की, "माणकचदानी दत्तक घेतला तो मुलगा स्वभावाने तसा चागला आहे, परतु वडिलाचे दुकान सभाळण्याची कर्तबगारी त्याच्यात दिसत नाही सर्व दिवसभर तो आपला सतारच वाजवीत बसतो!" हे उद्गार प्रतापच्याहि कानी आले असतील, परतु त्याकडे प्रतापने मुळीच लक्ष दिले नाही व आपला अभ्यास तसाच चालू ठेवला

## अध्यात्मयोग

अशा रीतीने ३-४ वर्षे अभ्यास झाल्यावर एक दिवस सावळाराम मास्तरानी एकदम स्फूर्ति आल्यासारखा प्रतापला एक प्रश्न विचारला की "का रे, तुला आता 'प्रवृत्ति' शिकवू की 'निवृत्ति' शिकवू?" प्रतापला त्याचा अर्थच कळेना त्याने विचारले, "'प्रवृत्ति' म्हणजे काय व 'निवृत्ति' म्हणजे काय?" मास्तरानी सागितले की, "प्रवृत्ति म्हणजे 'व्यवहार' आणि निवृत्ति म्हणजे 'परमार्थ'" प्रतापने विचारले की, "या दोहोपैकी चागली कोणती?" त्यावर मास्तरानी सागितले की, "निवृत्ति चागली साधली तर त्या माणसाला व्यवहार सहज चागला करता येईल" तेव्हा प्रतापने चटकन म्हटले की, "मग मला निवृत्तीच शिकवा"

आणि तेव्हापासून प्रतापच्या आध्यात्मिक शिक्षणाला प्रारभ झाला

गुरुवर्य सावळाराम मास्तरानी प्रतापला निवृत्ति शिकविण्यास आरभ केला, व तेव्हापासून प्रतापच्या आध्यात्मिक उत्कर्षाला सुरुवात झाली, एवढेच नव्हे, तर त्याचे ऐहिक ऐश्वर्यहि त्याच्यामागे धावू लागले

कवि 'कृष्णदास' यानी गुरुवर्य सावळाराम मास्तर याचे एकाच श्लोकात फार अनुरूप वर्णन केले आहे, तो श्लोक असा—

> तत्त्वज्ञान-विशारद-प्रमुख जो, ब्रह्मीच जो का स्थित।
> वाक्–पांडित्य उगाच जो नच करी, बोधार्थ बोले मित।
> साधी सभ्यचि राहणी, परि असे जो का विचारी महा॥
> नाईक द्विजराज पूज्य गुरु तो, श्री सावळाराम हा॥ १॥

गुरुवर्य मास्तरसाहेबांना प्रतापला अध्यात्मविद्या कशी शिकविली त्याचें श्रीमंत प्रतापशेठ यांनी [illegible] मोठें रसभरित [illegible] केलें आहे [illegible]

श्रीमंत प्रतापशेठ [illegible]

[illegible] मास्तरसाहेबांनी [illegible] प्रसिद्ध झालेले भाषांतररूप असे काहीं ग्रंथ, [illegible] इतर काहीं चांगल्या [illegible] मास्तरसाहेबांचा शिकविण्याचा मुख्य [illegible] बसून वाचीत [illegible] लांब पाय करून [illegible] कान करून, सावळारामभास्तरांच [illegible]

[illegible] मास्तरसाहेबांच्या [illegible]

[illegible]

प्रतापचें अध्यात्मशिक्षण ज्ञानेश्वरीपासून सुरू केलें श्रीमंत प्रतापशेठ यांचा जन्म ज्ञानेश्वर महाराजांच्या पुण्यतिथीस, व अध्यात्मशिक्षण ज्ञानेश्वरीच्या अध्ययनानें सुरू झालें, हा योगायोग लक्षांत घेण्यासारखा आहे

हें अध्यात्मविद्येचें शिक्षण चालू असतांना प्रतापशेठ मास्तरसाहेबांस म्हणाले कीं, ‘ पुढें केव्हांहि मी जरी आपणास सोडलें तरी आपण मला सोडूं नये ’ त्यावर सावळाराम मास्तरांनींहि “ बरें आहे, नाहीं सोडणार,” असें सांगितलें, व त्याप्रमाणें पुढें अगदीं अखेरपर्यंत ते श्रीमंत प्रतापशेठ यांचेजवळच अमळनेरला येऊन राहिले व येथेंच तत्त्वज्ञानमंदिरांत वारले

या दीर्घ काळांत प्रतापनें दुकानाचें कोणतेंहि कामकाज पाहिलें नाहीं त्यामुळें घरांत आई व मुनीम गोकुळकाका यांची प्रतापवर खप्पा मर्जी होऊं लागली आई व गोकुळकाका त्याला नेहमीं म्हणत, “ तुम्ही दिवसभर सतारच वाजवीत बसतां, दुकानाकडे तुम्ही काहींच बघत नाहीं हें बरें नव्हे ” त्याचप्रमाणें गावांतील इतर लोकहि बोलूं लागले कीं, प्रताप स्वभावानें चांगला असूनसुद्धां त्याच्यांत कर्तबगारी काहीं दिसत नाहीं !

एकदां गोकुळकाका असेंच रागावल्यावर प्रतापशेठ त्यांना म्हणाले, “ बरें तर, आमच्याकडून दुकानाचें काहीं काम होत नाहीं, म्हणजे येथें राहून आमचा काहीं उपयोग होत नाहीं, तर मग जातों आम्ही परत मारवाडला ”

त्यावर गोकुळकाका रागावून म्हणाले, “ वा ! असे कोणी बोलतो का ? तुम्ही गेलात तर मग येथे कसे चालेल ? मग येथे कोण आहे ? ” तेव्हा प्रतापशेठजींनीं शान्तपणे उत्तर दिले की, “ झाले तर मग, हेच आमचे काम ! ”

( म्हणजे त्याचा म्हणण्याचा भाव असा की, माझ्या केवळ येथे राहण्यानेच सर्व कामे नीट चालतात व तुम्ही सर्व मडळी आपापली कामे यथायोग्य करीत आहात )

मास्तरसाहेबानी सागितलेले तत्त्वज्ञान पूर्णपणे आत्मसात् केल्यावर, प्रतापशेठजींनीं ते आपल्या शब्दात निरनिराळ्या वेळी अनेकदा तत्त्वज्ञानमदिरात, अध्यापक व सशोधन करणारे विद्यार्थी, याच्यासमोर व्याख्यानरूपाने माडलेले आहे त्याचप्रमाणे बहुजनसमाजातील जिज्ञासु वाचकास त्याचे विचार कळावेत या उदात्त हेतूने त्यानी ते ग्रथरूपाने प्रसिद्ध केले आहेत

आतापर्यंत त्याचे खालील ग्रथ प्रसिद्ध झाले आहेत —

(१) खाजगी टिपणवही, भाग १ व २
(२) जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप ? ( ओवीबद्ध ग्रथ )
(३) भगवद्गीतेची गुरुकिल्ली
(४) तत्त्वज्ञानावरील ५१ व्याख्याने

या ग्रथापैकी खाजगी टिपणवहीचे दोन भाग आहेत ते पुढे प्रसिद्ध झालेल्या सर्व ग्रथाचे बीजक आहेत त्याचा छोटासा ओवीबद्ध ग्रथ –‘ जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप ? ’–हा ग्रथ फार सरस व महत्त्वाचा आहे श्रीमत प्रतापशेठ याना एकदम आतून स्फूर्ति आल्याप्रमाणे त्यानी तो ओवीबद्ध लिहिला आहे त्याची भाषा सुलभ असून ओघवती आहे ‘ भगवद्गीतेची गुरुकिल्ली ’ हि त्याच वेळीं लिहिली आहे

विशेष चमत्कार असा कीं, त्याच्यापूर्वी कधी किंवा नतरहि केव्हा, श्रीमत प्रतापशेठ यानी ओवी केली नाही व आताहि त्याना स्फुरत नाही ! हा ग्रथ लिहिण्यापूर्वी एकदा ते दुमासला गेले असताना सुमारे दोन महिनेपर्यंत रोज सकाळी तीन चार तास दुमासच्या राममदिराच्या मागच्या बाजूस बसून ते एकनाथी भागवताचे वाचन करीत असत, व त्यानतर त्याना हा ग्रथ स्फुरला, म्हणून एकनाथमहाराजाचा तो प्रसाद आहे, असे श्रीमत प्रतापशेठजी समजतात

श्री प्रतापशेठ याच्या तत्त्वज्ञानाचे सर्व सार या छोट्याशा ग्रथात आलेले आहे तेच नतर त्यानी वेळोवेळी आपल्या व्याख्यानात सागितले असून, त्याच्या ५१ व्याख्यानाचा सग्रहहि आता स्वतत्र पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला आहे

श्रीमत प्रतापशेठ याच्या तत्त्वज्ञानावर श्रीयुत चिंगळे यानी परिश्रमपूर्वक लिहिलेला एक स्वतत्र व विस्तृत निबध याच गौरव–ग्रथात पुढे येत असल्यामुळे त्याबद्दल येथे अधिक विस्तार व ऊहापोह केला नाही

जिज्ञासु वाचकानी तो उत्कृष्ट निबध पाहावा

---

## प्रकरण ५ वें

## उद्योगपर्व

उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी
दैवं हि दैवमिति कापुरुषा वदन्ति ।
दैवं निहत्य कुरु पौरुषमात्मशक्त्या
यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः ॥ १ ॥
उद्योगिनः करालम्बं करोति कमलालया ।
अनुद्योगि करालंबं करोति कमलाग्रजा ॥ २ ॥

अर्थ —उद्योगी अशा पुरुषश्रेष्ठालाच लक्ष्मीदेवी वरते दैवानेच सर्व होते दैवाधीन सर्व आहे असा दैववाद क्षुद्र पुरुषच बोलत असतात तुला जर भाग्याची लालसा असेल तर दैवाला पायाखाली तुडवून आपल्या सामर्थ्यानुरूप तू प्रयत्नशील हो प्रयत्न करूनहि जर भाग्योदय झाला नाही तर त्यात तुझा काय दोष आहे ? ॥ १ ॥

अर्थ —उद्योगी माणसाला लक्ष्मी हात देते लक्ष्मीची वडील बहीण जी विपत्ति ती अनुद्योगी माणसाला वरते ॥ २ ॥

मास्तरसाहेबानीं 'निवृत्ति' ऊर्फ 'परमार्थ' शिकविण्यास आरंभ केल्यावर काही वर्षांनी, म्हणजे सुमारे सन १९०४–१९०५ चे सुमारास, नवा उद्योग म्हणून, प्रतापशेठजींनी चोपड्यास एक स्वदेशी कापडाचे दुकान काढले लोकमान्य टिळकांची स्वदेशीची चळवळ त्याच सुमारास फार जोरात आलेली होती, व त्यांच्या चतु सूत्रीवर महाराष्ट्रभर चाललेली व्याख्याने चोपड्यापर्यंतहि जाऊन पोचली असतील त्यामुळे म्हणा, किंवा मास्तर

साहेबांनी सांगितल्याप्रमाणे, “ निवृत्ति शिकली म्हणजे माणसाला व्यवहार सहज साधतो, ” यामुळे स्फूर्ति होऊन म्हणा, प्रतापशेठजींनी सुमारे पन्नास हजार रुपयाचे भांडवल निरनिराळ्या भागीदाराकडून भाग म्हणून गोळा केले व स्वदेशी कापडाचे दुकान काढले त्या दुकानात श्रावण नावाचा एक गुमास्ता होता एके दिवशी सहज बोलता बोलता श्रावण म्हणाला की, “ भाऊ, यापूर्वी सर्व मंडळी पूर्वेकडे बऱ्हाणपूर दरवाजाकडे शीखऱ्या ओट्यावर फिरावयास जात असत, पण पश्चिमेस कारखाने निघाल्यापासून सर्व मंडळी पश्चिमेकडे फिरावयास जाऊ लागली आता पूर्वेस एक मिल काढा, म्हणजे सर्व मंडळी पुन पूर्वेकडे फिरावयास येतील—” प्रतापशेठजींनी ते ऐकून हासत हासत त्याला विचारले की, “ मिल काढली तर तू किती रक्कम त्यात घालशील ? ” त्यावर श्रावण म्हणाला, “ मी दोन हजार रुपये घालीन ”

त्या वेळी हा विनोदात्मक संवाद तेथेच थांबला पुढे एकदा, त्या दुकानाकरिता कापड खरेदी करण्यास दुकानाचा माणूस येवल्यास गेला असताना तेथील ‘ शेठ गंगाराम छबिलदास ’ यांच्या सुप्रसिद्ध पेढीचे मालक श्रीमंत वल्लभदासशेठ यांनी प्रतापशेठजींनी मागविलेले कापड तर दिलेच, पण खरेदी करावयास गेलेल्या माणसाला ते म्हणाले, की “ प्रतापशेठजींना सांगा, की असे किरकोळ कापडाचे दुकान काढून स्वदेशीचे काय कार्य होणार आहे ? तेव्हा आता एखादी स्वत चीच मिल काढा ”

खरेदीला पाठविलेल्या माणसाचे नाव ‘ मगनलाल टिकमदास ’ होते त्याने तो निरोप ऐकून घेतला व परत येऊन जशाचा तसाच प्रतापशेठजींना सांगितला प्रतापशेठजींनी त्या वेळी त्याकडे फारसे लक्ष दिले नाही, तरी तो प्रश्न त्यांच्या मनात त्यानंतर सतत घोळत राहिला पुढे काही दिवसांनी एका रात्री त्यांच्या डोक्यात विचार आला की, मिल काढली तर त्याला सुमारे चार लाख रुपये लागतील, व तेवढ्या भांडवलात एक लहानशी सुताची मिल निघू शकेल प्रताप-शेठजींचे वडील माणिकचंदशेठ वारल्यानंतर, त्यांच्या एकंदर इस्टेटीची मोजदाद करताना ती सुमारे चार लाख रुपयांची होईल, असा एकदा हिशोब करून झाला होता परंतु मिल काढली तर त्यात आपली सर्वच्या सर्वच इस्टेट घालणे इष्ट व शक्यहि नव्हते तेव्हा प्रतापशेठजींच्या मनात असाहि विचार आला की, या चार लाखांपैकी आपली स्वत ची म्हणून, इकडून तिकडून वसूल करून, एक लाख रुपयांची रक्कम आपण घालू शकू, व बाकीचे तीन लाख रुपये, १०० रुपयाचा एक शेअर असे तीन हजार शेअर्स काढून, आपल्या ओळखीच्या लोकांकडून एकेक शेअर सहज घ्यावयाला लावू ! आणि असे तीन हजार लोक ( प्रत्येकी फक्त १०० रु चा शेअर घेणारे ) सहज भेटतील चोपड्यास आणि खानदेशात माणकचंदजींच्या वेळच्या इतक्या ओळखी आहेत की, त्यांच्यातच तीन हजार शेअर्स सहज खपतील असे त्या वेळी त्यांना वाटले या विचाराने मिल काढण्याची उमेद वाढू लागली, व त्यानंतर मिल काढायची ती कशी काढावी, कोठे काढावी, हाच विचार प्रतापशेठजींच्या डोक्यात घर करून बसला आणखी काही दिवस गेल्यावर मिल काढण्याचा विचार पक्का ठरला व त्याच उद्योगाला प्रतापशेठजी लागले

पण मिल काढायची म्हणजे काय ? चोपड्याला त्यांचे स्वत चे एक 'जिन' होते नतर त्यानी कापसाच्या गाठी बाधायचा एक प्रेसहि काढला होता परतु 'जिन' आणि 'प्रेस' यांच्या मानाने मिल काढण्याचे काम फारच प्रचड होते, व त्याबद्दल त्या वेळी प्रतापशेठजीना काहीच माहिती नव्हती तेव्हा प्रत्यक्ष मिल काढण्यापूर्वी आपण एकदा अहमदाबादला जावे, तेथे लहानमोठ्या मिल्स पुष्कळ आहेत त्यांचे काम कसे काय चालते, त्याला काय काय तयारी लागते, हे सर्व समक्षच तेथे जाऊन पाहावे व नतर आपला बेत ठरवावा, असा त्यानी स्वत च्या मनाशी विचार केला, परतु त्याबद्दल चोपड्यास कोणालाहि मागमूस लागू दिला नाही

त्यांच्या मनाचा निश्चय होताच प्रतापशेठजी एके दिवशी उठून एकदम अहमदाबादेस गेले कशाकरिता जात आहोत हेहि त्यानी घरी कोणास सागितले नाही अहमदाबादेस गेल्यावर काही गिरण्याचे कामकाज समक्ष पाहून, काही मिल-मालकाची भेट घेऊन, त्यांच्याशी विचार-विनिमय केला, आणि एका मिलचे Memorandum and Articles of Association चे पुस्तक घेऊन ते मुबईला गेले तेथे जाताच फक्त कपनीचे नाव बदलून बाकी सर्व म्हणजे हेतु व नियम, त्या पुस्तकाप्रमाणेच ठेवून दहा लाखाचे भाडवल काढून "The Pratap Spinning, Weaving and Manufacturing Company, Limited," या नावाची कपनी तारीख १३ जून १९०६ रोजी रजिस्टरहि करून टाकली !

त्यानतर मुबईहून सरळ येवल्यास जाऊन श्रीमत वल्लभदासशेठजीची भेट घेतली, व त्याना सागितले की—

"आपण आमच्या माणसाबरोबर पाठविलेला निरोप पोचला, व त्याप्रमाणे आम्ही मुबईस जाऊन 'प्रताप मिल्स कपनी' रजिस्टर करून आलो आहोत मी स्वत त्यात एक लाख रुपयाचे शेअर्स घेतले आहेत तेव्हा आपणास त्याहीपेक्षा जास्तीचे शेअर्स घेतले पाहिजेत "

त्यावर वल्लभदासशेठ म्हणाले की, "ही रक्कम जरा जास्त होते," तेव्हा प्रतापशेठ म्हणाले, "मीच एक लाखाचे शेअर्स घेतलेले आहेत, तेव्हा तुम्हाला त्यापेक्षा कमीचे शेअर्स घेताच येणार नाहीत " तेव्हा वल्लभदासानीहि विशेष आढेवेढे न घेता एक लाखाचे शेअर्स घेण्याचे मान्य केले इतके काम करून प्रतापशेठजी अमळनेरास आले व काही दिवस अमळनेरलाच राहिले वाटेत जळगावहून अमळनेरला येत असताना गाडीतच नाशिकचे पोस्टल इन्स्पेक्टर श्री खाडेकर या नावाचे गृहस्थ सेकड क्लासमधे भेटले व त्यानीहि प्रतापशेठजींनी मिल काढण्याचे ठरविल्याबद्दल त्याचे अभिनदन करून, तेथल्या तेथेच मिलचे दहा शेअर्स घेतले, व त्याची डिपॉझिटची रक्कमहि देऊन टाकली !

पुढे अमळनेरास येऊन प्रतापशेठ श्री गोविंदराव मुठे याचे घरीच काही दिवस राहिले प्रतापशेठजींनी मिल काढली ही बातमी ते इकडे येण्यापूर्वीच चोपड्यास व इतरत्र पसरली होती तेव्हा आता मुनीम गोकुळकाका आपल्यावर रागावतील असे वाटून चोपड्यास जाण्याचे त्याना धैर्य होईना म्हणून त्यानी असे ठरविले की, काही शेअर्स आधी खपवून, थोडे भाडवल गोळा

करून, मग चोपडयास गेलो म्हणजे जरी गोकुळकाका रागावले असले, तरी तो राग इतका तीव्र स्वरूपाचा राहणार नाही चोपड्यास येण्याबद्दल त्यांची पत्रे येतच होती त्यावर प्रतापशेठजींनी आपला एक विश्वासू गुमास्ता दलपत यांच्याबरोबर असा निरोप पाठविला की, "आम्ही मिल काढायचे ठरवून कंपनी रजिस्टरसुद्धा करून आलो, त्यामुळे आम्ही चोपड्यास आलो तर काका रागावतील, म्हणून आम्ही येत नाही" तेव्हा गोकुळकाकाचा तावडतोब निरोप आला की, "शाबास! काही हरकत नाही हा व्यापार आहे तुम्ही योजिलेले कार्य मोठे आहे व ईश्वर करील तर त्यात चांगले यश येईल म्हणून तुम्ही एकदा सत्वर चोपड्यास येऊन जावे" या निरोपाने धीर येऊन ते चोपडयास गेले गोकुळकाका काही रागावले नाहीत पण असे मात्र म्हणाले, की "मिल काढली त्याला काही हरकत नाही, पण हे केवढे प्रचंड काम आहे? केवढा त्याचा व्याप आहे? त्याला पैसे किती लागतील? यातायात किती करावी लागेल?" इत्यादि गोष्टींची त्यांनी जाणीव करून दिली प्रतापशेठ म्हणाले, "आम्ही तर मिल काढून चुकलो आता काहीहि होवो!

मिल काढण्यासंबंधाने इतर लोकांतहि बरीच चर्चा चालली होती कोणी म्हणत, 'मिल काढावी फक्त मुंबईवाल्यांनी, खानदेशातील माणसाच्याने मिल होणे शक्य नाही!' कोणी म्हणाले की, "प्रतापशेठाची मिल जर झाली तर आमच्या तळहातावर केस उगवेल! अहो! त्यांचे दुकान जर त्यांना संभाळता येत नाही, आणि त्याकडे तर ते मुळीच पाहात नाहीत, ते मिल काय काढणार?" अशा अनेक प्रकारच्या कल्पना लोक करीत होते

त्यानंतर भांडवल गोळा करण्यास प्रतापशेठ बाहेर पडले. त्या बाबतींत मात्र त्यांना फारच चमत्कारिक व विविध प्रकारचे अनुभव आले

"कहीं तो घी घणा, कहीं मुठ्ठीभर चणा, तो कहीं वो भी मना!"

असे मान, अपमान व लोकांचे औदासीन्य, वगैरे अनेक प्रकारचे अनुभव आले विशेषत पूर्वी मनात विचार करीत असताना ज्या स्नेहीमंडळींच्याकडून आपण सहज भांडवल गोळा करू असे वाटत होते, त्या अनेक स्नेही मंडळींपैकी फक्त एक, श्रीमंत वल्लभदासजी वगळून, एकाहि स्नेह्याने एकहि शेअर खरेदी केला नाही! परंतु जेथे ओळख नाही, पाळख नाही, अशा अनेक ठिकाणी शेअर्स खपत गेले, व त्याकरिता घेणाऱ्यांत केव्हा केव्हा चढाओढ लागत होती कोणी १० हजाराचे घेतले, तर कोणी ११००० चे शेअर्स घ्यायला तयार होई! कोणी मानसन्मान करून, 'जेवायला आलात तर शेअर घेऊ,' असे म्हणून मेजवानीस बोलावून शेअर खरेदी करीत असत, तर दुसरे कोणी बाहेरच्या बाहेरच वाटेला लावीत असत!

सावद्याचे एक व्यापारी 'लहूकुमार,' म्हणजे लहूचे कुमार, यास प्रताप मिलचे 'प्रॉस्पेक्टस्' दाखविले असताना—

'पत्रिकार्थ पाहुनी लहूकुमार हासला,
शेअर्स ते आम्हा नको, म्हणून चुरा करोनि टाकिला"

व त्याने साफ नकार दिला!

त्यांच्या नकाराने व विक्षिप्तपणामुळे जरा खट्टू होऊन प्रतापशेठ परत सावदा स्टेशनवर आले. शेअरबद्दलच त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. त्या ऐकून सावद्याचे स्टेशनमास्तर म्हणाले की, " मीच एक शेअर घेतो, " असे म्हणून तेथल्या तेथे त्यांनी दहा रुपये देऊन टाकले व शेअरचा फॉर्महि ताबडतोब भरून दिला !

दुसऱ्या एका प्रसंगी प्रतापशेठजी पायानेच दूरच्या गावी शेअर खपविण्यास चालले होते. पुढे एक दगड भरलेली गाडी चालली होती. जवळपास दुसरे काहीच वाहन मिळण्यासारखे नव्हते. तेव्हा त्यांनी त्या गाडीवाल्याची आर्जवे करून त्या दगड भरलेल्या गाडीतूनच कित्येक मैल प्रवास केला !

मिल काढण्याचे तर ठरले, व भांडवलहि गोळा होण्यास सुरुवात झाली. वास्तविक घर जर चोपड्याला तर मिलहि तेथेच काढावयाची. परंतु एक तर तेथे आगगाडी नाही, व दुसरे, तापीवर जवळपास पूल नाही. मिलची मशिनरी वगैरे आणण्यास व पक्का माल इतर ठिकाणी पाठविण्यास आगगाडीची सोय असणे अत्यंत आवश्यक होतें. त्या दृष्टीने धरणगाव जवळ होते, पण तेथे पाण्याची फार टंचाई व हाकाटी असल्याने धरणगाव रद्द केले, व अमळनेरला सखारामहाराजांची गादी व मुबलक पाणी असल्याने अमळनेरच पसंत केले. सुरतेहून येणारी ताप्ती व्हॅली रेलवे व भुसावळहून येणारी जी. आय. पी. रेलवे यांचे अमळनेर हे एक महत्त्वाचे जंक्शन होते. त्यामुळे मुंबई, अहमदाबादकडून येणारा माल व बंगालकडून येणारा कोळसा, तसेच उत्तर हिंदुस्थानात पाठविण्याचा तयार माल, या सर्व कामास अमळनेरलाच मिल काढणे फार सोयीचे होईल असे पाहून, अमळनेरच्या पश्चिमेस गावाबाहेर, स्टेशनच्या जवळ गोविंदराव मुठे यांची एक विस्तृत जागा रु. ७५०० ला खरेदी केली, व तेथे मिल बांधण्याचे काम सुरू केले. या कामात रा. गोविंदराव मुठे आणि रा. भाऊसाहेब परांजपे यांची फार मदत झाली. बांधकाम सुरू झाल्याने प्रतापशेठजी आता चोपड्याहून अमळनेरलाच राहावयास आले, परंतु शेअर खपविण्यास त्यांना वरचेवर बाहेरगावी जावे लागे. काम चालू झाले म्हणजे रोज मजुरी देणे आलेच ! तेव्हा पैशाची फार टंचाई पडू लागली. कित्येक वेळी पातोंडे येथील दुकानातून कधी कधी ५० रुपयांची रक्कमसुद्धा मुद्दाम टांगा पाठवून आणावी लागे, तेव्हा मजुरांची चुकोती करता येत असे ! अशी चोहो बाजूंनी त्या वेळी प्रतापशेठजींस काळजी उत्पन्न झाली. परंतु अशी जरी त्यांची तारांबळ उडत होती, तरी सर्व अडचणींना धैर्याने तोंड देऊन मोठ्या चिकाटीने मिलचे काम त्यांनी चालूच ठेवले.

पुढे कामाचा व्याप वाढल्यामुळे चोपडे व पातोंडे येथून येणाऱ्या किरकोळ रकमांवर काम भागेना. मोठी रक्कम हाताशी असणे आवश्यक झाले. त्यामुळे प्रतापशेठजींनी येवल्याचे श्रीमंत वल्लभदास शेठ यांचेकडून ४०,००० रुपये उसनवार आणून मिलचे काम चालू ठेवले. प्रतापशेठजींचा हा उत्कर्ष सहन न होऊन काही उपद्व्यापी व असहिष्णु लोकांनी श्रीमंत वल्लभदास शेठजींजवळ, 'मिलच्या कामात प्रतापशेठ पैसे खातात' वगैरे प्रकारच्या चहाड्या सांगून त्यांचे मन

प्रतापशेठजीबद्दल कलुषित करण्याचे पुष्कळ प्रयत्न केले परंतु श्रीमंत वल्लभदास शेठजींनी त्या सर्वांना स्पष्टच सांगितले की, "माझे पैसे गेले असे समजूनच मी शेअर्स घेतले आहेत, तेव्हा या बाबतीत तुम्ही पुनः आमचेजवळ काही गोष्ट काढू नये," असे स्पष्टच बजावल्यामुळे आक्षेप घेणारे लोक निरुपाय होऊन स्वस्थ बसले, व थोर मनाच्या वल्लभदास शेठजींनी अशा परिस्थितीत, हे लोकापवाद ऐकूनसुद्धा प्रतापशेठजीस ४०,००० रुपये रोख दिले व ते लौकरच शेठजींनी त्यास परत केले.

मिल बांधून तयार झाली, तरी सुद्धा प्रत्यक्ष काम चालू करण्यास, कापूस आणि स्टोअर्स वगैरे माल लागणार, त्याकरिताहि लाखो रुपयांची जरूरी होतीच. म्हणून काही सल्ला-गारांनी शेठजींना अशी सल्ला दिली की, पैसे गोळा होईपर्यंत मिल सुरूच करू नये. परंतु ती सल्ला प्रतापशेठजींना मुळीच पटली नाही, कारण मिल सुरू होऊन, तयार माल बाहेर पडल्याशिवाय पैसे तरी कसे उभे रहाणार? म्हणून प्रतापशेठजींनी जळगावच्या दाढीवाले शेठजींशी बोलणे सुरू केले की, त्यांनी प्रतापशेठजीस एक लाख रुपये कर्ज द्यावे व त्याबद्दल मिलचे कापड २१ वर्षेपर्यंत विकण्याची एजन्सी घ्यावी. या व्यवहाराचे कागदपत्र सॉलिसिटर्समार्फत करून घेण्याकरिता श्रीमंत प्रतापशेठ स्वतः, आणि दाढीवाले शेठजी हे दोघे मुंबईस गेले, व त्यांचे आणि दाढीवाले शेठजींचे सॉलिसिटर्स यांची लिखा पढी सुरू झाली. दरम्यान दाढीवाले शेठजी म्हणाले, "अहो, लिखापढी होत राहील, तुम्ही रुपये तर घेऊन चला!" त्यांचे बरोबर त्यांचा गुमास्ता रघुनाथ टेकचंद हा होता. तो तर पैसे अगोदर घेण्याचा फारच आग्रह करू लागला, परंतु प्रतापशेठजींच्या बरोबरहि त्यांचे मुनीम गोकुळकाका होते. त्यांनी एकदम रागावून सांगितले की, "रघुनाथशेठ, तुम क्या समझे हो! क्या तुमनेहि पैसे देखे हैं? क्या सिर्फ तुम्हारे पासहि पैसे हैं? याद रखो! तुमको रुपयोंसे ब्रूझ देऊंगा! (पैशाच्या ढिगाऱ्यात तुम्हाला पुरून टाकीन) तुम्हारी-हमारी व्यवहार की शर्तें अभी तक ठहरी नहीं हैं। तुम्हारा हमारा लेख पत्र अभी हुआ नहीं। तो तुम कायके पैसे देते हो? क्या पैसेके जोरसे, तुम हमको दबाना चाहते हो? तुम्हारी हमारी सब शर्तें जब नक्की हो जावेगी, और कागजपर सही-शिक्का हो जाअेगा तब ही हम पैसे लेवेंगे! पहिले नहीं!"

असे दरडावून सांगताच दाढीवाल्यांचा गुमास्ता थंड पडला. दोन्ही पक्षांच्या सॉलिसिटर्सचे ठरवाठरवीचे काम बरेच दिवस चालू होते आणि त्यांच्या सर्व शर्ती उभय पक्षास मान्य होईपर्यंत जवळजवळ सहा महिने श्रीमंत प्रतापशेठजीस सरदारगृहात राहून अतिशय अस्वस्थ मनःस्थितीत घालवावे लागले!

सरदारगृहात असताना, त्याच वेळी प्रतापशेठजींचे अमदाबादचे एक मित्र, शेठ वैकुंठराय, मुंबईस आले होते ते भेटले. तेव्हा या पैशाच्या अडचणीचे बाबतीत त्यांची सल्ला घेण्या-साठी प्रतापशेठजी त्यांचेकडे गेले. तेव्हा त्यांनी शेठजीस विचारले की, खानदेशात तुमची पत कशी काय आहे? त्यावर प्रतापशेठजी म्हणाले, की "आम्ही सबंध खानदेश जरी विकत घेतला, तरी 'पैशाचे काय,' असे काही कोणी आम्हास त्या वेळेस विचारणार नाही." हे ऐकताच

वैकुंठरायशेठ म्हणाले, "इतकी जर पत असेल तर नुसत्या पतीवर मी दहा मिल्स चालवून दाखवीन" परंतु हे त्यांचे म्हणणे प्रतापशेठजीस पटले नाही. कारण, त्या वेळी जरी कुणी पैसे मागितले नाहीत, तरी रोजच्या व्यवहारात 'उद्या किंवा परवा तरी लोक पैसे मागावयास येणारच, तेव्हा आपण त्याना काय उत्तर देणार?' असे वाटून वैकुंठरायजींच्या सल्ल्याप्रमाणे वागण्याचा बेत त्यांनी रहित केला

तरी पण मिल चालविण्यास पैसा कसा उभा करावयाचा हा प्रश्न समोर होताच कारण, पैसा मिळाल्याशिवाय मिल कशी चालेल? बरे, चालवली तर माल कसा निघेल? आणि मालहि निघाला तरी तो बाजारात कसा पसत पडेल आणि खपेल?— अशा अनेक प्रकारच्या काळज्या त्यांच्या मनात उत्पन्न होत होत्या शेवटी मिल चालू करण्याचा ठरविलेला दिवसहि जवळ येऊन ठेपला तरी त्याना रक्कम उभी करण्याकरिता मुंबईसच राहावे लागल्यामुळे मिल चालू करण्याचे मुहूर्तावर ते स्वत अमळनेरास येऊ शकत नव्हते शेवटी तेथूनच त्यांनी पत्राने कळविले की, "तुम्ही ब्राह्मणाकडून मुहूर्त उरकून घ्या माझे येणे काही होत नाही!"

त्यांच्या या पत्राप्रमाणे ठरलेल्या मुहूर्तावर, ब्राह्मणाकडून विधिपूर्वक पूजा वगैरे करून, प्रताप मिलचे प्रत्यक्ष काम नोव्हेंबर १९०८ मध्ये सुरू झाले पण दैवाचा योग असा की, स्वत श्रीमत प्रतापशेठ त्या दिवशी येथे येऊ शकले नाहीत! मिल उघडण्याचे वेळी स्वत हजर राहावे, असा शेवटच्या क्षणास विचार करून ते मुंबईहून रात्री निघालेहि होत, परंतु पुढे काय झाले ते त्यांच्याच शब्दात देणे योग्य होईल

"हे पत्र अमळनेरास पाठविताना आमच्या मनात फारच कालवाकालव झाली त्या वेळच्या आमच्या मन स्थितीचे वर्णन करणे फारच कठीण आहे ज्या दिवशी आम्ही अमळनेरला हे पत्र लिहिले, त्याच दिवशी सध्याकाळी आमचे आणि दाढीवाले शेठजी याचे बिनसले! ते म्हणू लागले की, 'आम्ही बाजारभावाने माल विकून टाकू' त्यावर आम्ही म्हणालो की, 'हे शक्य नाही माल आमचा आहे, तो आम्ही सागू त्याच भावाने तुम्हीं विकला पाहिजे माल तुबल्यामुळे भाव उतरवावा लागला तर त्याचा विचार करणे हे आमचे काम आहे तुम्हाला ते परस्पर करता येणार नाही' आणि या मुद्द्यावर त्याचे व आमचे बिनसले

"दाढीवाल्याचा नाद सोडून आता स्वत च्या पायावरच उभे रहावे, असा एकदम मनात विचार आला व या विचारानेहि आमच्या अंगात संजीवनी शिरली! 'आता आपणच सर्व करू, कोणास जुमानणार नाही, असे मनाशी ठरविले नंतर विचार केला की, 'सध्या कापसाचा हगाम सहा महिने तरी आहेच, तेव्हा या सहा महिनेपर्यंत आपण रोजचा कापूस आणावा आणि रोजचा खावा,' असे केले तर काय हरकत आहे? त्यात कोणी काहीं दोष देणार नाहीं, अशी मनाशी खूणगाठ बांधून, आम्ही आमचे सामान गुंडाळून रात्री बोरीबंदर स्टेशनवर तिकीट काढण्यास आलो तेथेहि दाढीवाले शेठजींचा मुनीम आमचे पाठीमागे फिरतच होता, व 'शेठजी, 'करून घ्या, 'करून घ्या,' असे म्हणतच होता पण आम्ही काहीं त्याचे म्हणणे ऐकले नाहीं

त्याच दिवशी रात्री मेलने आम्ही मुबईहून निघालो पण पुढे वाटेतच कल्याणनतर खर्डी स्टेशनवर चालत्या गाडीत आमच्या डब्यात चोर शिरला व त्याने आमची बॅगच चोरून नेली ! त्यातच सॉलिसिटरशी चाललेल्या २१ वर्षाची एजन्सी देण्यासबधीचे तयार केलेले सर्व कागदपत्रहि होते आमच्याच कपार्टमेटमधील एका गुजराथी गृहस्थाची एक ट्रकहि चोराने पळविली होती पुढे इगतपुरीस आल्यावर पोलिसाकडे वर्दी देण्यास आम्ही दोघे खाली उतरलो फौजदाराच्या ठाण्यावर गेल्यावर मी बाहेर बसलो व ते गुजराथी शेठजी वर्दी देण्याकरिता आत गेले त्याचे म्हणणे ऐकल्यावर फौजदार त्याना दरडावयाला लागले की, 'तुम्ही येथे कशाला आलात ? कसाऱ्यालाच वर्दी द्यायला पाहिजे होती !' असे ते मोठमोठ्याने ओरडून दरडावू लागले !

" त्याचे ओरडणे ऐकून मी आत गेलो व म्हणालो की, 'फौजदारसाहेब ! आमची चोरी झाली आहे त्याची आम्ही तुम्हाला वर्दी द्यायला आलो आहोत, ती तुम्हाला घ्यायची आहे की नाही ते सागा '

" आमचे ते दरडावणे ऐकताच फौजदारसाहेब म्हणाले, " हो, हो, मी कोठे नाही म्हणतो या, या, या,–बसा–' असे अदबीने बोलून मग त्यानी सर्व हकीकत लिहून घेतली

" फौजदाराने आमची तक्रार लिहून घेतल्यावर, आमचेबरोबर एक पोलिस देऊन आम्हास परत खर्डीस पाठविले तेथे काही चौकशी वगैरे करून आम्हाला त्याने कसारा येथे आणले तेथे सर्व दिवसभर आमचा मुक्काम झाला, व स्नान–जेवण वगैरे काही न करता कडकडीत उपास घडला ! आमची बॅग गेली यासबधाने आम्हाला फारसे वाईट वाटले नाही कारण त्यातल्या कागदपत्राचे आम्हास आता काही महत्त्व वाटत नव्हते त्यामुळे 'बॅग' नाही गेली, तर ती एक व्यादच गेली असेच आम्हास वाटले ! परतु त्या गुजराथी गृहस्थाची मात्र कपड्याची पेटीच गेल्यामुळे आम्हाला दोघानाहि फार वाईट वाटले ! पुढे आम्ही रात्रीचे गाडीने निघून दुसरे दिवशी सकाळी जळगावला पोचलो तेथे आल्याबरोबर भाऊसाहेब पराजपे स्टेशनवरच आम्हाला भेटले व म्हणाले की, ठरल्याप्रमाणे काल प्रताप मिल चालू झाली, व सूत आणि बाहेरून आणलेल्या सुताचे कापडहि बरे निघाले, व ते ऐकून आम्हाला फारच आनद झाला !

" नतर आम्ही रोजचा कापूस रोज खरेदी करून, रोजच्या रोज विक्री करून, मिलचे काम चालू ठेविले आमचे कापडहि बाजारात पसत पडले नतर गोकुळकाकानी अशी व्यवस्था केली की, चोपड्याचे दुकानातून जितकी उगराणी करावयाची होती ती करून, रोजच्या रोज चोपड्याहून १००–१००, १२५–१२५ कापसाच्या गाड्या रवाना करून त्या अमळनेरला मिलचे दारात येऊन पोचू लागल्या ! ते पाहून लोकानी आश्चर्याने तोडात बोटे घातली ते म्हणाले, 'अहो, रोज कापूस विकत घेऊन सुरू केलेली मिल अशी किती दिवस चालेल ?'–असे आम्हास वाटत होते पण आता पाहतो तो दररोज १००–१२५ गाड्याची अखड रागच दारात येऊन उभी राहते ! ही कशी व कोठून येऊ लागली ! या प्रकाराने सर्वांना फारच आश्चर्य वाटू लागले परतु या व्यवस्थेने पुढचा हगाम येईपर्यंत जितका कापूस घ्यायला पाहिजे होता, त्यापेक्षाहि पुष्कळ

जास्त कापूस भरला गेला, व पुढे कापसाचा भाव चढल्यामुळे आम्हाला नको असलेला कापूस विकून टाकून त्या व्यवहारात आम्हास पुष्कळ नफा झाला

" मिल एकदा सुरळीत सुरू झाल्यानंतर आमचेकडे लोकांच्या रकमा डिपॉझिट म्हणूनहि येऊ लागल्या डिपॉझिटचे पैसे घेताना गोड वाटत असे, परंतु परत देताना मात्र इतक्या हजाराचे डिपॉझिट व्याजासह परत करावयाचे आहे, ते कसे करता येईल, अशी नेहमीच काळजी वाटत असे काही लोक तर एकदा ठेवलेली रक्कम मुदत भरल्यावर परत घेऊन, 'आता व्याज वाढवा' असे सांगत होते, व तसे आम्ही मान्य न केले म्हणजे बाजारात हिंडून येऊन पुन परत येत, आणि म्हणत, 'बरे तर, आता तुम्ही नाहीच ऐकत, तर राहू द्या आणखी एक वर्षभर!' असे म्हणून डिपॉझिट पुन ठेवून जात!

" सारांश, आम्हाला पैशाची चिंता नेहमीच राहात असे, परंतु असा प्रसंग कधीहि आला नाही, की कोणी पैसे मागावयास आला व तो पैसे न घेताच परत गेला आमचेजवळ जरी पैसे नसले, तरी समोरून जर पैसे मागणारा इसम आला, तर त्याच क्षणी पैसे देणाराहि कोणी तरी थैली हातात घेऊन आमच्या मागे उभाच आहे, असेच आजपर्यंत आमच्या अनुभवास आले आहे! आमचेजवळ प्रत्यक्ष हातात त्या वेळेस पैसे राहात नसत, व आताहि राहात नाहीत परंतु पैसे देण्याची वेळ आली, तर त्याच वेळी ते कोठून तरी येतात, हेहि तितकेच खरे आमच्याजवळ मात्र काहीहि राहात नाही

"आम्ही आधी खरेदी केलेला जास्तीचा कापूस विकून टाकला व त्यात बराचसा नफा झाला, पुढे दोन वर्षे कापसाचे भाव वाढले पण त्या प्रमाणात कापडाचे भाव वाढले नाहीत, त्यामुळे मिलच्या चालू कारभारात फारसा नफा झाला नाही, तरीहि कापूस विक्रीतला फायदा मिलच्या भागीदारांना डिव्हिडंड देण्याकरिता आमच्या फार उपयोगी पडला

"याप्रमाणे पाच-सात वर्षे मिल चालत राहिल्यानंतर पैशाची मोकळीक होऊ लागली व आम्हास तितकीशी पैशाची काळजी राहिली नाही इतक्यात १९१४ साली युरोपात महायुद्ध सुरू झाले, व त्याचा फायदा प्रताप-मिलला बराच मिळाला ही भरभराट युद्ध संपेपर्यंत ४ ५ वर्षे चालूच राहिली, व भागीदारास ४० टक्केपर्यंत डिव्हिडंड वाटले गेले! मग प्रताप-मिलचा पसारा वाढवून युद्धाच्या अवधीत होणाऱ्या फायद्यातून येथेच दुसरी मिल उभी करण्याचे ठरविले परंतु मशिनरी पुरवायची, व तिच्या किंमतीची युद्धजन्य परिस्थितीमुळे कारखानदार काहीच हमी द्यावयास तयार नव्हते! त्यामुळे आमचा अंदाज १५ लाखात मिल उभी राहील असा होता, त्याऐवजी मशिनरी प्रत्यक्ष येऊन पोचून नवी मिल चालू झाली तोपर्यंत ६० लाख रुपये खर्च होऊन गेले होते! परंतु पहिली मिल उत्तम चालू असल्यामुळे ही सगळी जबाबदारी आम्हास बिनबोभाट पार पाडता आली, नाही तर नवे पाणी जुन्या पाण्यासहि घेऊन गेले असते "

प्रताप मिल एकदा सुरळीत चालू झाल्यावर श्रीमंत प्रतापशेठ दररोज सकाळी मिल उघडताच मॅनेजरना बरोबर घेऊन, मिलच्या सर्व खात्यात हिंडून कापूस आल्यापासून कापड

निघेपर्यंत कोठे कोठे काय काय करावे लागते, याचे बारकाईने निरीक्षण करून सर्व काम स्वत समजावून घेत असत त्याचप्रमाणे इंजिनीअरला बरोबर घेऊन, या कामास लागणाऱ्या निरनिराळ्या यंत्रांची माहितीहि त्यांनीं स्वत करून घेतली साधारणपणे सर्व गिरण्या जिन करून, म्हणजे सरकी काढून, गाठी बांधून आणलेला तयार कापूस खरेदी करीत असत, व तो आल्यावर त्या गाठी तोडून तो कापूस वापरीत असत बाहेरगावाहून गाठी बांधून आणण्याच्या ऐवजी अमळनेरलाच जिनिंग आणि प्रेसिंग केले तर जास्त सोयीचे पडेल, असे पाहून, त्यांनी अमळनेरातच 'हिंदुस्थान प्रेस' या नावाचा एक पूरक कारखाना काढला परंतु पुढे सरकी काढल्यावर कापूस एकदमच गिरणींत नेता आला, तर गाठी बांधायच्या आणि सोडायच्या, यांत होणारा व्याप आणि खर्च, ही दोन्हीहि वाचतील असा विचार करून प्रताप मिलमधेच त्यांनी जिनिंग करण्याची सोय केली व कच्चा कापूस साठविण्यास मोठमोठी कोठारघरे बांधली त्यामुळे खर्चात पुष्कळच बचत करता आली अशा रीतीने अवास्तव होणारा सर्व खर्च कमी करून, स्वस्तात स्वस्त, पण उत्तम आणि अत्यंत टिकाऊ कापड अमळनेरला प्रताप मिलमध्ये तयार होऊ लागले

अमळनेरच्या दोन्ही मिल्स चांगल्या चालू लागल्यावर, धुळ्यालाहि एक मिल काढावी असा विचार करून, १९२३ साली 'दि न्यू प्रताप मिल, धुळे' ही मिल रजिस्टर केली, व १९२८ पर्यंत तिचेहि काम जोरात सुरू होऊन, तेथेहि कापड चांगले निघू लागले चार पांच वर्षांनी अमळनेर-प्रमाणे धुळ्यालाहि पहिल्या मिलच्या जोडीला दुसरी एक मिल काढली अमळनेर व धुळे येथील दोन्ही मिलचा कपडा सुबक, स्वस्त व टिकाऊ असल्यामुळे त्याला हिंदुस्थानभर व परदेशातहि मागणी येऊ लागली, आणि त्याकरिता कलकत्ता, काशी, कानपूर व दिल्ली, तसेच मुंबई, अमृतसर, जळगाव, नगर, नाशिक इत्यादि प्रमुख शहरी, प्रताप मिलची दुकाने व एजन्सीज उघडल्या अमळनेर व धुळे या दोन्ही ठिकाणच्या मिलमध्ये शक्यतोपर्यंत खानदेशातच उत्पन्न झालेल्या कापसाचा सुबक आणि टिकाऊ माल तयार होऊ लागल्यामुळे या प्रांतातील शेतकऱ्यासहि प्रताप मिलमुळे फार फायदा होऊ लागला स्वत श्रीमंत प्रतापशेठ आपल्या गिरणीत तयार झालेली धोतरे व कपडाच पहिल्यापासून वापरीत आहेत

श्रीमंत प्रतापशेठ यांची देवावर दृढ श्रद्धा व भक्ति आहे आपल्या या अफाट कारभाराचा सर्व भार त्यांनीं देवावरच टाकिला, व योगायोगाने त्याच सुमारास खानदेशातील अनुभवी मामलेदार श्री रामचंद्र त्र्यंबक ऊर्फ भाऊसाहेब देव हे नुकतेच सेवानिवृत्त झाले होते, त्यास श्री शेठजींनी आपले खाजगी कारभारी नेमिले श्री भाऊसाहेब देव यानीहि हा सर्व कारभार श्री प्रतापशेठ यांच्या इच्छेप्रमाणे व त्यास हितकर होईल अशा रीतीने अत्यंत दक्षतेने व यशस्वी-पणे आतापर्यंत सुमारे २० वर्षे चालविला आहे यात नि संशय दोघांचाहि गौरव आहे

त्याचप्रमाणे श्री महादेव चिंतामण ऊर्फ आप्पासाहेब केळकर, डेप्युटी कलेक्टर, सेवानिवृत्त झाले होते त्यास धुळे मिलमध्ये 'लोकल एजंट' नेमिले व त्यांनी श्री प्रतापशेठ यांच्या सल्ल्याने त्या मिलचे सर्व काम अनेक वर्षे फार यशस्वी रीतीने चालविले

याप्रमाणे दोन्ही गिरण्याचा, व हिंदुस्थानभर पसरलेल्या त्यातील कापडाच्या दुकानाचा व्याप वाढला, व नफाहि चागला होऊ लागला त्यावरच सतुष्ट होऊन आणखी द्रव्योत्पादक नवे उद्योग सुरू करण्याचे भानगडीत न पडता, श्रीमत प्रतापशेठ यानी मनोनिग्रह करून, इतर सामाजिक व लोकोपयोगी कार्याकडे आता आपले लक्ष वळविले

---

## प्रकरण ६ वें

# धार्मिक व सामाजिक कार्य

परोपकाराय फलन्ति वृक्षाः परोपकाराय वहन्ति नद्यः ।
परोपकाराय दुहन्ति गावः परोपकारार्थमिदं शरीरम् ॥ १ ॥

पद्माकरं दिनकरो विकचं करोति
चंद्रो विकासयति कैरव चक्रवालम् ।
नाभ्यर्थितो जलधरोऽपि जलं ददाति
सन्तः स्वयं परहितेषु कृताभियोगाः ॥ २ ॥

अर्थ :—झाडें परोपकाराकरिताच फलित होतात, नद्या परोपकाराकरितांच वाहतात, गाई परोपकारार्थच दूध देतात, म्हणून हे शरीर परोपकाराकरितांच आहे. ॥ १ ॥

अर्थ :—सूर्य कमलवनाला विकसित करतो व चंद्र कुमुदवनाला (रात्री विकास पावणाऱ्या कमलवनाला) प्रफुल्लित करतो, तसेंच मेघ, न मागतांहि जलवर्षाव करतो, यावरून सज्जन हे स्वतःच पराहिताविषयी उद्युक्त असतात. ॥ २ ॥

दोन्ही ठिकाणच्या गिरण्या चागल्या चालू लागल्यानतरच श्रीमंत प्रतापशेठ सामाजिक कार्याकडे वळले असे आम्हांस म्हणावयाचे नाहीं. फार वर्षापूर्वी एकदां फैजपूर गांवास आग लागली व बहुतेक सर्व गांवच जळून गेले ! ते समजतांच श्री. प्रतापशेठ स्वत. फैजपूरला गेले व स्वतःची ओळख न देतां, नुसतेच "आमच्याजवळच्या जैन फंडातून या घरें जळलेल्या लोकांना मदत करावयाची आहे" असे खोटेच सांगून म्युनिसिपालिटीत जाऊन सर्वांची नांवे घेतली व घरोघर जाऊन सर्वास द्रव्याची मदत केली. या कामीं त्या वेळी त्यांनीं सुमारे

रु २००० खर्च केले ते स्वत मारवाडात एका गरीब कुटुबात जन्म घेऊन खानदेशातील एका सपन्न घराण्यात आता आले होते लहानपणी परिस्थितीमुळे त्याचे शिक्षण फारसे होउ शकले नाही, याची त्यास तीव्र जाणीव होती त्यामुळे गरिबीमुळे ज्याना विद्या सपादन करणे अशक्य होते, अशा विद्याभ्यास व इतरहि गरज व होतकरू विद्याभ्यास पुस्तके, कपडे, फी, जेवण इत्यादि सर्व प्रकारे मदत ते यापूर्वीहि करीत असत त्याचप्रमाणे मिलमधील मजूर, किंवा इतर काणी गरीब माणूस, आजारी पडला, त्याला औषधोपचाराची जरूर असली व मोठ्या गावी जाऊन इलाज करून घेण्याची पत नसली तर त्या सर्वास चोपडे, धरणगाव, जळगाव इत्यादिपैकी जेथे सोयीचे पडेल तेथील डॉक्टरकडून, किंवा अमळनेरचे प्रसिद्ध सर्जन म्हस्कर बधु—डॉ रामभाऊ व डॉ नारायणराव, यान्च्या दवाखान्यात इलाज करण्यास पाठवून त्याचा खर्च आपण स्वत च देत असत गो-पालनाची त्याना लहानपणापासून आवड असल्यामुळे व त्याची स्वाभाविक वृत्ति भाविक व धार्मिक असल्यामुळे महाराष्ट्रातल्या गोशाळा, धर्मशाळा, विद्यालये, मदिरे इत्यादि अनेक लोकोपयोगी सस्थास त्यानी सढळ हाताने यापूर्वीहि मदत केली होती महापुराने बगाल आणि आसाममधील लोकावर कठीण आपत्ति आल्यामुळे त्या लोकान्च्या मदतीसाठी त्यानी हजारो रुपये पाठविले ‘ महाराष्ट्र-राष्ट्रभाषा-प्रचार सभे ’ ला, वैदिक सस्कृतीचे पुनरुज्जीवन करणाऱ्या औधच्या ‘ स्वाध्याय–मडळाला ’, कन्हैय्यालाल मुनशी यानी काढलेल्या ‘ भारतीय विद्याभवना ’ला, स्वामी कुवलयानद यान्च्या योगविद्या शिकविणाऱ्या ‘ कैवल्यधाम ’ या सस्थेला, व महाराष्ट्रातील लष्करी शिक्षण देणारी एकच एक खाजगी सस्था–नाशिकच्या ‘ भोसले मिलिटरी स्कूल ’ला, अशा अनेक सस्थाना शेठजींनी मोठमोठ्या देणग्या दिल्या आहेत

अमळनेरला तर सर्वच शिक्षणसस्था त्यान्च्याच औदार्यामुळे उभ्या राहिलेल्या आहेत १९१४ साली खानदेश शिक्षण मडळाच्या प्रताप विद्यालयाला चागली मोठी देणगी देऊन, १९४५ साली प्रताप महाविद्यालय व त्याची दोन-तीन सुदर वसतिगृहे ह्या सर्वास प्रतापशेठजींनीच मोठ्या देणग्या दिल्या आहेत

‘ तत्त्वज्ञान ’ हा श्रीमत प्रतापशेठजींचा अत्यत आवडीचा विषय आहे त्याकरिता प्रथम प्रथम काही वर्षे दसरा–दिवाळीच्या सुट्टीत चोपड्यास ‘ ज्ञानसत्रा ’च्या रूपाने महाराष्ट्रातील विद्वान लोकास बोलावून त्याची व्याख्याने कित्येक वर्षे ते करवीतच असत परतु तत्त्वज्ञानाचा स्थायी स्वरूपाने अभ्यास करण्यास, गुरुवर्य सावळाराम मास्तरसाहेब यान्च्या प्रेरणेने, भारतीय तत्त्वज्ञानाचा व विशेषत अद्वैत वेदान्ताचा सखोल अभ्यास करून भारतीय आणि पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा तुलनात्मक अभ्यास करण्याकरिता, सन १९१६ साली अमळनेरला ‘ भारतीय तत्त्वज्ञानमदिर ’–**‘Indian Institute of Philosophy’**–या सस्थेची त्यानी स्थापना केली येथे भारतातील निरनिराळ्या विद्यापीठाचे तत्त्वज्ञान घेऊन M A झालेले हुषार विद्यार्थी एकत्र येतात, व भारतीय दर्शनाचा काळजीपूर्वक अभ्यास करून, त्याचा तत्सदृश युरोपिअन दर्शनाच्याशी तुलना करून सशोधनात्मक प्रबध लिहितात तत्त्वज्ञानमदिरात चाललेल्या सशोधनाने भारतीय तत्त्वज्ञानास

उजळा मिळून त्याची व त्याबरोबरच तत्त्वज्ञानमंदिराचीहि हिंदुस्थानात सर्वत्र, व अमेरिकेसारख्या दूरच्या देशातहि, प्रसिद्धि झाली आहे तत्त्वज्ञानमंदिर स्थापन करण्यात त्या वेळचे जळगावचे कलेक्टर, ओटो रॉथफेल्ड, शंकराचार्य डॉ कुर्तकोटि, प्रो रामभाऊ रानडे व बडोद्याचे प्रोफेसर अल्बन विजरी या सर्वांची फार मदत झाली गुरुवर्य सावळाराम मास्तर हयात होते तोपर्यंत तत्त्वज्ञानमंदिरातच राहून येथील कामावर ते देखरेख करीतच होते ते वारल्यानंतर त्यांचे स्मारक म्हणून तत्त्वज्ञानमंदिराच्या ग्रंथालयात त्यांचे मोठे तैलचित्र लाविले असून, प्रवेशद्वारासमोरच्या बागेत त्यांचा एक भव्य पुतळाहि आता उभारला आहे त्याचप्रमाणे दर वर्षी भाद्रपद वद्य नवमीला त्यांची पुण्यतिथीहि तीन दिवस मोठ्या उत्साहाने साजरी केली जाते

तत्त्वज्ञानमंदिराचे कार्य आज ३८ वर्षे अव्याहत चालू असून आतापर्यंत शंभर-दीडशेच्या वर लोक दोन दोन, चार चार वर्षे येथे राहून तत्त्वज्ञानाचा अभ्यास व संशोधन करून भारतातील निरनिराळ्या विद्यापीठात तत्त्वज्ञान शिकविण्याचे कार्य करीत आहेत इतकेच नव्हे, तर येथील एक माजी फेलो एक वर्ष ऑक्सफोर्डला व दोन तीन वर्षे कोलंबो विश्वविद्यालयात प्रोफेसर म्हणून काम करीत होते, व आजहि लंकेच्या युनिव्हर्सिटीत तत्त्वज्ञानाचे मुख्याध्यापक अमळनेरचेच दुसरे एक माजी फेलो आहेत श्रीमंत प्रतापशेठजी यास तत्त्वज्ञानाची इतकी आवड आहे की, आठवड्यातून निदान एक दिवस तरी सवड काढून तत्त्वज्ञानाची चर्चा करण्यास ते तत्त्वज्ञानमंदिरात येतात तत्त्वज्ञानमंदिर उघडलेल्या दिवशी येथे संशोधन करण्यास 'फेलो' म्हणून आलेले, प्रो घनश्यामदास मलकानी आज ३६ वर्षे येथेच तत्त्वसंशोधन व अध्यापन करीत असून गेली २० वर्षे ते या संस्थेचे डायरेक्टर म्हणून काम करीत आहेत १९२१ ते १९२३ ही दोन वर्षे फक्त ते केंब्रिजला जाऊन M Litt ही उच्च पदवी संपादन करून येथेच परत आले तीस वर्षांपूर्वी विलायतेतून उच्च डिग्री मिळवून येणाऱ्यांना येथल्यापेक्षा दुसऱ्या अनेक ठिकाणी शिक्षणखात्यातील मोठमोठ्या जागा मिळत होत्या, परंतु त्या न स्वीकारता निवान्त ठिकाणी राहून आपले जीवन तत्त्वसंशोधनातच घालवावयाचे असा निश्चय करून, जन्मभर अल्प वेतनावरच संतुष्ट राहून ते हा सर्व काळ येथेच अव्याहतपणे काम करीत राहिले आहेत !

श्री शेठजींचे मारवाडातील मूळ गाव कालाडेरा तेथे त्यांनी हायस्कूलची एक भव्य दगडी इमारत बांधून दिली असून त्याच्या चालू खर्चाचा अर्धा वाटाहि त्यांनी उचलला आहे उरलेला अर्धा खर्च शेठजींचे कालाडेरा येथील चुलत चुलत बंधु व परम स्नेही आसामात दिब्रूगढ येथे स्थायिक झालेले, श्रीमंत रामेश्वरलाल सहारिया यांनी करण्याचे ठरविले आहे त्या हायस्कूलला आता 'श्री सेठ प्रताप रामेश्वरलाल सहारिया हायस्कूल' असे नाव ठेविले आहे तसेच कालाडेऱ्याच्या धर्मार्थ आयुर्वेद दवाखान्याची इमारत बांधून देण्यासहि त्यांनी मदत केली आहे नवापुरा येथील त्यांचे जुने राहते घर मोडकळीस आले होते, त्या जागी त्यांनी एक चांगली नवी दगडी इमारत बांधून देऊन त्यात आता प्राथमिक शाळा उघडली आहे

अमळनेरच्या व आसपासच्या खानदेशातील लोकांना अल्प खर्चात उत्तम वैद्यकीय इलाज

मिळावा या उद्देशाने सन १९४४ साली त्यानी अमळनेर येथे प्रताप चॅरिटेबल हॉस्पिटल या नावाचा मोठा दवाखाना उघडला त्याचप्रमाणे आयुर्वेदाचे सशोधन करून देशी वैद्यकाचा इलाज करण्याकरिता एक स्वतत्र आयुर्वेद-सशोधन-केद्राहि त्यानी उघडले होते या दोन्ही सस्थास प्रत्येकी सुमारे १० लाख रुपयाची देणगी दिली होती प्रताप हॉस्पिटलला जोडूनच सौ भागीरथीबाई सूतिकागृह बाधले असून या दोन्ही सस्था गेली १० वर्षे उपयुक्त कार्य करीत आहेत

तत्त्वज्ञानमदिराचे जवळच श्रीमत प्रतापशेठ यानी सन १९४३ साली एक भव्य व सुदर राममदिर बाधले असून त्यातच आद्य श्रीशकराचार्य याचीहि एक मूर्ति बसविलेली आहे या सर्व मूर्ति औंधचे स्वर्गीय राजेसाहेब यानी इटलीमधून उत्तम पाढरा शुभ्र सगमरवरी दगड मोठ्या प्रयासाने आणून आपल्या स्वत च्या देखरेखीखाली औधला घडवून दिलेल्या आहेत या सर्वच मूर्ति फार सुदर व मनोहर आहेत राममदिरात नेहमी भजन, पुराण, कीर्तन इत्यादि कार्यक्रम चालू असतात, दर वर्षी चैत्रमासात नऊ दिवस रोज कीर्तन होऊन रामनवमीला श्रीरामजन्माचा सोहळा साजरा केला जातो त्या वेळी अमळनेरचा व आसपासचा फार मोठा जनसमुदाय गोळा होऊन तेथे यात्राच भरते

बोरी नदीच्या काठावर दक्षिणोत्तर पसरलेले जुने अमळनेर गाव सत सखाराममहाराज व वाडी यामुळे प्रसिद्ध होते त्यात आता श्रीमत प्रतापशेठ यानीं निर्माण केलेल्या अनेक लोकोपयोगी सस्थाची भर पडून या नवीन भागास ' प्रतापनगर ' असे सार्थ नाव पडले आहे सरकारनेहि मिलचे दारातच आता ' प्रतापनगर ' नावाचे एक नवे पोस्ट ऑफिस उघडून या नावाला मान्यता दिली आहे

श्रीमत प्रतापशेठजीचा दानधर्म अक्षरश अफाट आहे स्वत सस्था काढण्यात, इतराच्या उपयुक्त सस्थाना सढळ हाताने मदत करण्यात व सतत चाललेल्या गुप्त दानात त्यानी आतापर्यंत जे द्रव्यदान केले आहे त्याचा आकडा १ कोटि रुपयाच्या वरच जाईल त्यापैकी काही ठळक देणग्याचाच येथे फक्त ओझरता उल्लेख करणे शक्य आहे त्यावरून त्याच्या दातृत्वाची वाचकास कल्पना येईल

| सस्था | देणगी रुपये |
|---|---|
| (१) प्रताप चॅरिटेबल हॉस्पिटल | १० लाख. |
| (२) आयुर्वेद रुग्णालय व सशोधनकेद्र | सुमारे १० लाख |
| (३) प्रताप कॉलेज | २॥ लाख |
| (४) प्रताप हायस्कूल | १ लाख |
| (५) तत्त्वज्ञानमदिर | २ लाख |
| (६) भोसले मिलिटरी स्कूल, नाशिक | १ लाख |
| (७) कालाडेरा प्रताप रामेश्वरलाल सहारिया हायस्कूलची इमारत बाधण्यासाठी | २ लाख |

| संस्था | देणगी रुपये |
|---|---|
| (८) डॉ. सरदेसाई यांचें तळेगांव येथील क्षयरोग निवारक केंद्र | १६ हजार. |
| (९) मारवाडी विद्यार्थी सहाय्यक मंडळ . | ५० हजार. |
| (१०) प्रताप विद्यामंदिर, चोपडे . . . . | १५ हजार. |
| (११) मुंबई जातीय कोष . | २५ हजार. |
| (१२) चौंडेमहाराज गो-शाळा, वाई . . ... | २० हजार. |
| (१३) गाडगेमहाराज धर्मशाळा . ... | २ हजार. |
| (१४) भारतीय विद्याभवन .... ... | २ हजार. |
| (१५) स्वाध्याय मंडळ, औंध . . . | २,४०० |
| (१६) महाराष्ट्र राष्ट्रभाषा प्रचार समिति .... | ६,००० |
| (१७) बंगाल नोआखली फंड . . . . | १०,००० |
| (१८) आसामांतील पूर व धरणीकंपग्रस्तांना मदत | ५,००० |
| (१९) धुळयाच्या पांझरा नदीच्या पुरामुळे त्रस्त लोकांस मदत | ५,००० |
| (२०) गीताजयन्ती मंदिर, धुळें ... ... | ५,००० |

इत्यादि, इत्यादि, इत्यादि.

## प्रकरण ७ वें

# गृहजीवन व दिनचर्या

### निष्कामकर्म

मानुष्यं वरवंशजन्म विभवो दीर्घायुरारोग्यता ।
सन्मित्रं सुसुतः सती प्रियतमा भक्तिश्च नारायणे ॥
विद्वत्त्वं सुजनत्वमिन्द्रियजयः सत्पात्रदाने रतिः ।
निष्कामेऽभिरतिश्च कर्मणि यदा धन्यस्तदाऽसौ गृही ॥ १ ॥

अर्थ —माणुसकी, श्रेष्ठ कुळात जन्म, वैभव, दीर्घायुष्य, आरोग्य, सन्मित्र, सत्पुत्र, साध्वी भार्या, नारायणाविषयी प्रेम, विद्वत्ता, सौजन्य, जितेन्द्रियत्व, सत्पात्री दान करण्याची आवड, निष्काम कर्माविषयी प्रीति, एवढे गुण जर गृहस्थाश्रम्याजवळ असतील तर तो गृहस्थाश्रमी या जगात धन्य होय ॥ १ ॥

बाळपणीचा काळ सुखाचा आठवतो घडिघडी ।

### बालपण

'भृगुसंहितें'त श्रीमत प्रतापशेठ याची जन्मकुडली सापडली त्यात या मुलाचा जन्म तळ्यान्या काठन्या गावी झाला असावा असे सापडले वास्तविक मारवाडात सर्वत्र वाळवटच असावयाचे त्यात अजमेरजवळ 'पुष्कर' नावाचे एक फार सुदर सरोवर आहे तेव्हा त्याच्या आसपास शेपन्नास मैलातहि कोणाचा जन्म झाला तर तो तळ्यान्या काठींच झाला असे ज्योतिषज्ञ समजतात, परतु श्री प्रतापशेठ याचा जन्म ज्या 'मोहनपुरा' नावाच्या खेड्यात झाला, त्यान्याजवळ खरोखरच एक सुदर तलाव आहे त्यावरून 'भृगुसहिते'तील उल्लेख बरोबर आहे

लहानपणी मारवाडात असताना छोट्या प्रतापला नेहमी मोकळ्या हवेत, रानात, डोंगर-टेकड्यावर खेळणे व बागडणे फार आवडत असे मोहनपुऱ्यास गावाबाहेर एका विहिरीवर डोलकाठीला एक पोहरा बांधलेला असे व अजूनहि आहे त्याला 'चाच' असे म्हणतात त्या विहिरीवर पोहऱ्याने पाणी काढून घ्यावे, आपले उंट, शेळ्या व गाई आसपास चरावयास सोडून द्याव्यात व शेजारच्या वृक्षांच्या छायेत, सवंगड्यासह खेळावे, हा तेथील मुलांचा नित्याचा कार्यक्रम होता तेथून पुढे नवापुऱ्याला गेल्यावरहि प्रतापचा बराचसा वेळ घराबाहेर मोकळ्या मैदानातच जात असे मधून मधून चार चार, सहा सहा महिने प्रताप आपल्या आईबरोबर व केव्हा केव्हा एकटाहि आपल्या आजोळी 'बासा' येथे जाऊन राहात असे तेथे तर तो आजीचा व मामाचा फार लाडका असल्याने त्याला तेथे पूर्ण स्वातंत्र्य होते मामाच्या घराला लागूनच एक डोंगर आहे त्या डोंगराच्या एका बाजूला बारीक वाळूच्या उंच व लांबच लांब टेकड्या आहेत ही वाळू मैद्यासारखी मृदु व बारीक, आणि हरभऱ्याच्या ताज्या पिठासारखी पिवळट असते बरोबरच्या मुलांना घेऊन प्रताप ह्या वाळूच्या टेकडीवर नेहमी खेळावयास जात असे प्रथम सर्व मुले वाळूतून टेकडीच्या माथ्यावर चढून जात व तेथे मऊ मऊ वाळूत लोळण घेऊन टेकडीवरून खालपर्यंत गडगडत, लोळत येत असत प्रतापला लहानपणी हा खेळ फारच आवडे नवापुरा गावाच्या आसपासहि सर्वत्र वाळूच वाळू आहे केव्हा केव्हा उंटाच्या शेपटीला धरून त्याच्या मागल्या पायावर टेकून प्रताप उंटाच्या पाठीवर चढे, व 'पडलो रे पडलो' असे म्हणून खाली वाळूत पडे पुन असे चढायचे आणि पुन पडायचे हाहि खेळ छोटा प्रताप व त्याच्या बरोबरची लहान मुले नेहमी खेळत असत मामाच्या घरची शेळी बाशाच्या डोंगरावर चरावयास नेऊन घरी येताना डोंगरावरली कुसुंब्याची फुले व लाकडे घरी घेऊन येणं हा प्रतापचा नित्याचा क्रम असे मामाच्या घराजवळच एक जुना प्रचंड वटवृक्ष होता त्याच्या एका अति उंच फांदीवर दोरीचा झोपाळा बांधून प्रतापची आई त्याला घेऊन बसत असे केव्हा तर ती स्वत एकटीच उभ्याने मोठमोठे झोके घेई, ते पहात प्रताप झाडाखाली बसत असे एकदा घरासमोरच्या निंबोणीच्या झाडावर प्रताप चढला व पिकलेल्या निंबोण्या स्वत खाऊन, खाली खेळत असलेल्या आपल्या वडील भावाला—मूलचंदाला—म्हणाला, 'या घे चार निंबोण्या' असे म्हणून वाकला, तोच प्रतापचा पाय निसटून तो प्रथम एका झोपडीच्या छपरावर पडला व तेथून गडगडत खाली दगडाच्या फरशीवर पडला! मोठा भाऊ मूलचंद पदर पसरून वरच पहात उभा होता मामा समोरच आपल्या दुकानात बसले होते प्रतापला पडलेला पाहताच मामा धावत आले व त्यांनी त्याला उचलून घेतले ह्या माराने प्रतापचा खांदा व हात चांगलाच दुखावला गावातल्या वैदूकडून तीन चार महिने औषधोपचार करून व चोळून घेतल्यावर हात साधारण बरा झाला, पण आतील दुखाव नंतर कित्येक दिवसपर्यंत त्याला जाणवत होता व अजूनहि अभ्रे आली म्हणजे तो हात केव्हा केव्हा दुखतो बासा येथे सामोदचे रावळजी यांची एक सुंदर बाग आहे त्या बागेत मोठमोठी फळझाडे व विपुल पाणी आहे रावळजींचे कामदार मामाचे स्नेहीच असल्यामुळे त्या बागेतहि प्रताप व त्याचे मित्र पुष्कळ वेळा दिवसभरहि खेळावयास जात असत याप्रमाणे प्रतापचे लहानपण मारवाडातल्या लहान लहान खेड्यातहि फार आनंदात गेले होते.

मारवाडातून वडील व मातुश्री यांच्याबरोबर प्रताप व धाकटी बहीण जडावबाई खानदेशात चोपड्यास आलीं तेव्हा प्रतापचे वय अवघे ८ वर्षांचेच होते ही सर्व मडळी चोपडयास एकदम श्रीमत माणकचदशेठ यान्या मोठ्या घरात आली नवापुरा व बासा या खेडयान्या मानाने चोपडे म्हणजे मोठे शहरच। श्री माणकचदाचे दुकान गावान्या मध्यभागीं आहे व राहावयाचे घर जवळच आहे श्री माणकचदजी त्या वेळी चोपडयाचे नगरशेठ होते या नव्या घरात प्रताप आला तेव्हा घरात दत्तक पिता माणकचदजी, व दोन दत्तक माता होत्या इतर कामास अनेक गडीमाणसे होती त्यामुळे घरातील काम असे प्रतापला काहीच करावे लागत नसे श्री माणकचदजींनी मोठ्या प्रेमाने प्रतापला दत्तक घेण्याचे ठरविले तरी त्याचा स्वभाव जात्याच जरा कडक व रागीट असल्यामुळे, माणकचदान्या समोरून येण्याजाण्याचे प्रतापला भयच वाटे लहानपणचे खेडयातील मनमोकळे वातावरण व आतडयाचा जिव्हाळा असलेली आई, आजी व मामा याचा सुखद आश्रय सुटला, व नवख्या वातावरणात एकदम येऊन पडल्यामुळे प्रतापच्या मनाची बरीच कुचबणा झाली असावी तथापि जात्याच तो कुशाग्रबुद्धि असल्याने, लवकरच त्याने नव्या परिस्थितीशी जुळते करून घेतले व काही दिवसानी छोटूरामजी व शिवकुवरबाई लहानग्या जडावबाईला घेऊन, प्रतापला येथेंच श्रीमत घरात सोडून, जड अत करणाने देशाला परत जाण्याकरिता जळगावकडे वाट चालू लागली। हा वियोग प्रतापलाहि काही दिवस चागला जाणवला असावा

## चोपड्याचें जीवन

पुढे प्रतापचे शालेय शिक्षण सुरू झाले चोपडयास आल्यावर सुमारे दोन वर्षांनीं प्रतापच्या दहाव्या वर्षी त्याचा शास्त्रोक्त दत्तविधान समारभ झाला व प्रतापचे नवे नाव ‘मोतीलाल’ असे ठेविले प्रताप १२ वर्षांचा झाल्यावर त्यान्या दोन्ही दत्तक मातानी ‘आता लवकर घरात सून आणावी’ असा लकडा लावला व श्री माणकचदशेठ यानीहि त्याला समति देऊन चोपडयाचेच एक सज्जन व्यापारी देवचद डालूशेठ याची सुशील कन्या, सुदराबाई पसत करून तिला आपली सून करून घेतली लग्न अतिशय थाटाने केले आणि ते सर्व चोपड्यात व आसपासच्या भागात गाजले सर्व गावाला त्यानी जेवण दिले व जवळच्या नदींत दारूची लका बाधून रात्री लकादहनाचा देखावा दाखविला सुदराबाईस पहिला मुलगा झाला व तो एक वर्ष चागला वाढला, परतु दुर्दैवाने पुढे तो आजारी पडून एकाएकी वारला त्यानतरहि त्याना दोन तीन अपत्ये झाली, पण तीहि सर्व अल्पायुषीच ठरली पुढे खुद्द श्री माणकचदशेठच आजारी पडले व सवत् १९५० मध्ये भाद्रपद शुद्ध पचमीला वारले।

वडील वारल्यामुळे अवघ्या चौदाव्या वर्षीच श्रीमत प्रतापशेठ दुकानाचे मालक झाले त्या वेळी त्याना दुकानाच्या कामाची काहीच माहिती नव्हती वडिलाच्या वेळचे वृद्ध व विश्वासु मुनीम गोकुळकाका यानीच पुढें पुष्कळ वर्षेपर्यत दुकानाचे सर्व काम पाहिले श्रीमत प्रतापशेठ याचे दुकानाचे कामात लक्ष लागावे असा गोकुळकाकानी पुष्कळ प्रयत्न केला, परतु प्रतापशेठ याचे

त्याकडे लक्षच लागेना. त्यांच्या मनाला विरंगुळा म्हणून त्यांना मग सतार तरी शिकवावी म्हणून गुरुवर्य सावळाराममास्तर ह्यांची दरमहा २ रु वर सतारशिक्षक म्हणून नेमणूक केली पुढे सन १८९९ साली संवत् १९५६ च्या चैत्र वद्य तृतीयेस श्री प्रतापशेठ यांचा दुसरा विवाह कालाडेरा येथील शेठ सुखदेवजी अग्रवाल यांची सुशील कन्या अणचाबाई हिच्याशी झाला व वधूचे सासरचे नाव सौ 'भागीरथीबाई' असे ठेविले सौ भागीरथीबाईंच्या गृहप्रवेशापासून आपले ग्रह अधिक उच्चीचे झाले व आपल्या घरात साक्षात् लक्ष्मीनेच प्रवेश केला, असा श्रीमंत प्रतापशेठजी यांचा दृढ विश्वास आहे सौ भागीरथीबाई घरात आल्याबरोबर प्रथमच श्री प्रतापशेठजी, सौ भागीरथीबाई व सौ सुंदराबाई ही मंडळी काशीयात्रेस गेली तेव्हापासूनच दर वर्षी उन्हाळ्यात महाबळेश्वरास किंवा दुसऱ्या पहाडावर हवा खाण्याचे ठिकाणी जाऊन रहाण्याचा क्रम उत्साहाने सुरू झाला क्रमाक्रमाने पुढे भारतातील सर्व तीर्थयात्राहि त्यांनी सहकुटुंब केल्या

दुसऱ्या विवाहापासून श्री प्रतापशेठजींच्या ऐश्वर्याला भरती आली व ती भरभराट आतापर्यंत चालूच आहे, ही गोष्ट मात्र खरी असून सर्वांस स्पष्ट दिसतच आहे

याच सुमारास चोपड्यास एक साधूंचा मेळा आला त्यातल्या महंताजवळ एक सुंदर हत्ती होता त्या साधूंचे श्रीमंत शेठजींनी उत्तम आदरातिथ्य केले सर्वांस सुग्रास भोजन घातले महंत फार प्रसन्न झाले त्यांचा सुंदर हत्ती पाहून जमल्यास आपणच तो खरेदी करावा असे शेठजींना वाटले व त्याप्रमाणे त्यांनी महंताला विचारले तेव्हा महंत प्रसन्न होऊन त्यांना आपण हत्ती बक्षीसच देतो म्हणून सांगितले तरीहि त्याला श्रीमंत प्रतापशेठजींनी २००० रुपये देऊन संतुष्ट केले व महंतानेहि 'या हत्तीमुळे तुझ्या घरात सदोदित गजलक्ष्मी नांदेल' असा शेठजींना आशीर्वाद देऊन महंत व साधु पुढे निघून गेले त्या महंताचा आशीर्वादहि खरा झालेला दिसत आहे

सावळाराममास्तरांची सतारशिक्षक म्हणून नेमणूक झाली खरी, परंतु त्यांच्या शिकविण्याचा परिणाम मात्र गोकुळकाकांना फारच अनपेक्षित असा झाला शास्त्रोक्त गायनविद्या व सतारवादन हे तर मास्तरसाहेबांनी शिकविलेच, परंतु श्रीमंत प्रतापशेठ यांना त्यांनी 'निवृत्ति' मार्गावर नेऊन त्यांची सर्व जीवनदृष्टीच फिरवून टाकली ! त्यानंतर श्रीमंत प्रतापशेठ हे एक धनिक व्यापारी एवढेच राहिले नाहीत चोपड्याचा सारा जीवनक्रमच त्यांना संकुचित वाटू लागला काही दिवस तेथे त्यांनी एक स्वदेशी कापडाचे दुकान उघडले व चालवलेहि, पण नंतर बाहेर पडण्याचेच ठरवून ते अमदाबाद व मुंबईला गेले व तेथे प्रताप मिल रजिस्टर करून आले त्यानंतर मिलमुळे चोपडे सोडून ते कायमचेच अमळनेरला येऊन राहिले व गेली ४५ वर्षे येथे राहून हळूहळू त्यांनी अमळनेरला आजचे स्वरूप दिले व त्याचबरोबर स्वत च्या जीवनाचेहि 'पारमार्थिक ध्येय' गाठले

सौ भागीरथीबाईंना चार पाच मुले झाली, पण दुर्दैवाने ती सर्व अल्पवयातच गेली व त्यामुळे उभयतांना फार वाईट वाटले श्रीमंत प्रतापशेठजी खानदेशात आल्यानंतर त्यांचे जन्मदाते

वडीलहि मुलाबाळासह चोपडयासच येऊन स्थायिक झाले प्रतापशेठजींचे वडील भाऊ नानगरामजी यास छगनलाल आणि मगनलाल असे दोन मुलगे होते त्यापैकी धाकटा मुलगा मगनलाल याला दत्तक घेण्याचे श्रीमत प्रतापशेठजींनी ठरविले, व सवत १९७८ त ता १७ मार्च १९२२ रोजी, त्याचा विधिपूर्वक दत्तक समारभ करून मुलाचे नाव 'मगनलाल' हेच ठेविले

चि मगनलाल ऊर्फ बाबूशेठ याचे शालेय शिक्षण, अमळनेरलाच प्रताप हायस्कुलात झाले लहानपणापासून त्याना चित्रकलेची फार आवड होती पुढे १९३५ साली श्रीमत प्रतापशेठ याचेबरोबर बाबूशेठ युरोपात जाऊन आले तेथील मोठमोठ्या वस्तुसग्रहालयातील व राजप्रासादातील सुदर कलाकृति पाहून त्याची कलात्मक दृष्टि विकास पावली परत आल्यावर चैत्र वद्य चतुर्थी, सवत् १९९४, सोमवार, ता १८ एप्रिल १९३८ रोजी श्रीमत शेठ चदूलाल गणेशरामजी धुळेकर यान्च्या सुशील कन्येशी धुऱ्यास त्याचा मोठ्या थाटाने विवाह झाला व वधूचे नाव सौ 'बनारसीदेवी' असे ठेविले त्यानतर मिलच्या कामाची सर्व माहिती श्रीमत प्रतापशेठजींचे जवळ बसून त्यानी करून घेतली व आता धुळ्याच्या मिलचा सर्व कारभार ते यशस्वी रीतीने पहात आहेत

श्रीमत प्रतापशेठ यास मारवाड सोडून ६७ वर्षे झाली तरी त्याची मायभूमीची ओढ अद्याप कायम आहे दर वर्षी नाही, तरी १-२ वर्षांनी तरी ते एकदा कालाडेऱ्यापर्यत जाऊन येतात व लहानपणच्या खेडेगावच्या मोकळ्या वातावरणात महिना, पधरा दिवस आनदात घालवून येतात तसेच नवापुरा व मोहनपुरा येथे जाऊन जवळच्या मोठ्या पायविहिरीवर स्नान करून तिच्या शेजारच्या आबराईत डाळबाटीचा स्वयपाक करून बरोबर नवापुरा व मोहनपुरा या दोन्ही गावची ३०-४० मडळी घेऊन आनदाने भोजन केल्याशिवाय त्याना बरे वाटत नाही तसेच बासा येथील मामाच्या घराजवळचा वटवृक्ष, मागच्या बाजूचा डोगर व वाळूची टेकडी, रावळजींची बाग, महामाईचे मदिर, वाटेतली नदी व 'काळा भाटा' नावाचा डोगर ही सर्व स्थाने पाहिली, तेथील वृद्ध माणसे व बाशाचे शेठजींचे समवयस्क मामेभाऊ भेटले म्हणजे त्याचे अत करण अजून सद्गदित होते आजहि बाशाला गेले म्हणजे तेथील वाळूच्या टेकडीवर चढून जावे व वरून खाली गडगडत यावे असे त्यास वाटते, व तेथे प्रत्यक्ष गेल्यावर बरोबरीच्या मडळीसह वर चढून आजहि वरून लोळत गडबडत येण्यात त्याना मौज वाटते नवापुऱ्याच्या म्हाताऱ्या पाटलाने त्याना आपल्या घरी नेऊन काशाच्या थाळीत घरचे ताजे ताक पाजले तर ते ते मोठ्या आवडीने व आदराने पितात त्याच्या म्हाताऱ्या आईने 'परताप आयो कई' असे म्हणून मोठ्या प्रेमाने पाठीवर हात फिरविला म्हणजे त्याचे अत करण पूर्वस्मृतींनी भरून येते, व बाळपणीचे सर्व सुखद जीवन त्याच्या डोळ्यासमोर उभे राहते लहानपणी ज्या खेड्यातील छोट्याशा घरात सुद्धा आनदात काळ गेला तेथे गेल्यावर आजहि त्याना पराकाष्ठेचा आनद होतो, व ते सुखस्वप्न सोडून पुन अमळनेरच्या आपल्या वैभवशाली प्रासादात येताना सुद्धा त्याचे अत करण जड होते.

श्रीमत प्रतापशेठजींची राहणी अगदी साधी, स्वभाव उदार व कनवाळू, वृत्ति धार्मिक व

परोपकारी, आणि आचार–विचार शुद्ध व सुसंस्कृत आहेत. ते गुणग्राहक, मार्मिक व विनोदी आहेत त्याना संगीताची शास्त्रशुद्ध माहिती असून गायनाची आवड आहे कारखानदार आणि विद्वान या दोन्ही वर्गात त्याची प्रतिष्ठा आहे त्याची सध्याची दिनचर्या अत्यंत नियमित व प्रमाणबद्ध आहे ते रोज पहाटे चार वाजता उठतात ५॥ ते ७ पर्यंत गावाबाहेर ३–४ मैल पायीच फिरावयास जाऊन येतात परत येताना राममंदिरात जाऊन श्रीरामचंद्राचे दर्शन घेतात घरी परत आल्यावर अलीकडे प्रकृतिकरिता तास दीड तास मसाज वगैरे करवून नंतर स्नान करतात दररोज भोजनापूर्वी एक तासभर वेदान्तचर्चा करतात साधारण ११ चे सुमारास ते भोजन करतात त्याचा आहार शुद्ध, सात्त्विक आणि साधाच असतो कटाक्षाने ते फक्त गाईचेच दूध व तूप खातात व त्याकरिता घरात पुष्कळ चागल्या गाई बाळगतात ते चहा कधीच पीत नाहीत, पण कॉफी केव्हा केव्हा घेतात काही वर्षापूर्वी ते धूम्रपान करीत असत, पण गेल्या २५-३० वर्षापासून त्यानीं तेहि पूर्णपणे सोडले आहे

भोजनोत्तर तासभर वामकुक्षि करून ते मिलच्या ऑफिसच्या कामाला बसतात रोजचे टपाल व इतर सर्व कामे स्वत पाहतात व सर्व कामाचा तावडतोब निकाल करतात आलेल्या प्रत्येक पत्राचे उत्तर उलट टपालाने गेले पाहिजे याबद्दल ते फार दक्ष असतात कोणताहि प्रश्न लोबत ठेवणे त्याना आवडत नाहीं काही गोष्टींचा अनेक बाजूनी विचार करावयाचा असला तरी तोहि शक्य तितक्या लवकर करून, त्या वेळी योग्य दिसेल तसा निकाल करून टाकावयाचा, असा त्याचा स्वभाव आहे यामुळे लोकाचा कधी खोळबा होत नाही व आजचे काम उद्याला शिल्लक राहात नाही

सुमारे तीन वाजेपर्यंत ऑफिसचे निकडीचे काम संपल्यावर कोणास समक्ष भेटावयाचे असले तर तासभर भेटावयास आलेल्याच्या ते भेटी घेतात व पुन दररोज ४ ते ५ वाजेपर्यंत प्रात काळप्रमाणे वेदान्तचर्चा करतात सायकाळी पुन गावाबाहेर तास दीड तास फिरावयास जाऊन परत येताना श्रीरामचंद्राचे दर्शन करून घरी येतात आठ वाजण्याचे सुमारास रात्रीचे जेवण उरकून नवाचे सुमारास ईश्वरस्तवन करून ते निद्रावश होतात

वयोमानाप्रमाणें अलीकडे कधी कधी चार वाजण्यापूर्वीच त्याची झोप संपते अशा वेळी त्याच्या डोक्यात तत्त्वज्ञानाचेच विचार चालू असतात कधीं तीन वाजताच उठून दिवा मोठा करून मनातले विचार त्याच वेळी लिहून त्याचे टाचण करून ठेवतात व नंतर सकाळच्या स्वाध्यायाचे वेळी त्याची चर्चा करतात.

सार्वजनिक कामाकरिता, कथा कीर्तनाला जाण्याकरितां किंवा विशेष महत्त्वाच्या समारंभाला किंवा व्याख्यानाला जावे लागले, तर ते सर्व ठिकाणी बरोबर वेळेवर जातात व सर्व काम संपेपर्यंत बसतात. अशा वेळी त्याचा पोषाख म्हणजे धोतर, बंद गळ्याचा पाढरा कोट, रेशीमकाठी उपरणे, व डोक्याला तांबडी पुणेरी पगडी व कपाळी लाल गंधाचा टिळा, असा पूर्वीं असे, परंतु अलीकडे गाऊट व साएटिका याच्या त्रासामुळे धोतराऐवजीं ते शुभ्र विजार घालतात व रोज

फिरावयास जाताना पगडीऐवजी टोपी वापरतात. त्याचा पुणेरी पोशाख पाहिला व शुद्ध मराठी बोलणे ऐकले तर ते एक महाराष्ट्रीय आहेत असेच वाटेल प्रकृतिमुळे अलीकडे ते सभा समारभाना फारसे जात नाहीत व आपला नित्यक्रम नियमितपणे चालवितात एखादे वेळी ते आजारी झाले तरीसुद्धा शक्यतो ते या कार्यक्रमात खड पडू देत नाहीत त्याचा मनोनिग्रह फार दाडगा आहे

साराश, बाह्य जगाला ते एक श्रीमत गिरणीमालक व मोठे व्यापारी म्हणूनच ठाऊक असले, तरी प्रत्यक्ष गिरणीच्या किंवा इतर व्यावहारिक कामाला दिवसातून फक्त २–३ तासच वेळ ते देतात, आणि इतर सर्व वेळ मोठ्या उत्साहाने आपल्या आवडीच्या विषयात–म्हणजे वेदान्त-चर्चेत–घालवितात अलीकडे उत्तरोत्तर त्याचे सारे जीवनच अध्यात्मविचारात गढलेले असते प्रकृति-स्वभावाप्रमाणे देहरक्षण व लोकव्यवहार म्हणून मिलचे व इतर काम ते अत्यत काळजीपूर्वक व दक्षतेने करतात, पण आता त्याना त्यात आसक्ति राहिली नाही या सर्व कारभाराकडे तटस्थ व निरासक्त दृष्टीने पहावयाची शक्ति त्याच्यात उत्पन्न झाली असावी व त्याचे सारे चित्त आन्तरिक तळमळीमुळे ‘ आत्मदर्शनोत्सुक ’ झाले असावे असे त्याच्या प्रसन्न उद्गारावरून पुष्कळ वेळा वाटते

---

## प्रकरण ८ वें

# प्रवास व तीर्थयात्रा

### भक्ति व मुक्तिसाधन

**तीर्थानामवलोकनं परिचयः सर्वत्र, वित्तार्जनं।**
**नानाश्चर्यनिरीक्षणं चतुरता बुद्धेः प्रशस्ता गिरः॥**
**साधूनां शिवदर्शनं निजहितप्रश्नश्च तत्सन्निधौ।**
**सर्वं साधयति प्रवास इह चेत्कल्पद्रुमोऽसौ न किम्॥ १॥**

अर्थः—तीर्थांचें दर्शन, सर्व लोकांचा परिचय, धनसंपादन, मृष्टींतील नाना आश्चर्यकारक गोष्टींचें अवलोकन, बुद्धीचे चातुर्य, सुसंस्कृत भाषाशैली, साधूंचे पुण्यकारक दर्शन, साधूजवळ आपल्या हिताबद्दल प्रश्न करणे,–एवढ्या सर्व गोष्टी जर प्रवास केला असतां सिद्ध होतात, तर त्या प्रवासास कल्पतरु कां म्हणूं नये ? ॥ १॥

**केल्यानें देशाटन पंडित-मैत्री सभेंत संचार।**
**शास्त्रग्रंथ-विलोकन, मनुजा चातुर्य येतसे फार॥ १॥**

**श्रीमंत** प्रतापशेठ यांना प्रवासाची फार आवड आहे. वयाच्या सातव्या वर्षापर्यंत मारवाडांतच मोहनपुरा, नवापुरा, साहेबरामपुरा व बासा या चार ठिकाणीं त्यांनी वास्तव्य केलेंच होतें, तेव्हां वाटेत अनायासे चोमू व सामोद हीं मोठीं गांवेंहि त्यांस पाहावयास सांपडलीं. तसेच सामोदजवळच्या डोंगरावर व महामाईच्या मंदिरांत आईबरोबर ते लहानपणीं गेले होते. नवापुऱ्याला असतांना ते उंटावर स्वारी करीत असत. पुढें चोपड्यास आल्यावर घोड्यावर बसण्यांतहि ते पटाईत झाले. दत्तविधान झाल्यानंतर श्रीमंत माणिकचंदजींच्याबरोबर ते एकदां अमळनेरला सखाराममहाराजांच्या यात्रेसाहि आले होते.

मोठे झाल्यानंतर, निरनिराळे देश पाहून आपले ज्ञान वाढते, लोकांचे देशाचार कळतात, धार्मिक तीर्थक्षेत्रांची यात्राहि करता येते, साधुसंत भेटतात, निसर्ग-रमणीय स्थळे पाहता येतात व आपल्या देशाची साकल्याने चांगली कल्पना येते वगैरे लाभ लक्षात घेऊन, दर वर्षी उन्हाळ्यात वेगवेगळ्या पहाडावरील हवा खाण्याच्या रम्य ठिकाणी ते १-२ महिने जाऊन राहू लागले इतर ऋतूंत त्यांनी तीर्थक्षेत्रांची यात्रा केली श्रीमंत प्रतापशेठजी व सौ भागीरथीबाई ही उभयता अतिशय भाविक व धार्मिक प्रवृत्तीची असल्यामुळे प्रत्येक क्षेत्रात गेल्यावर तेथील प्रघात असेल त्याप्रमाणे स्नान, महापूजा, रुद्राभिषेक, ब्राह्मण-भोजन व इतर दानधर्म सढळ हाताने करतात याप्रमाणे त्यांनी सहकुटुंब काशीपासून रामेश्वर व कन्याकुमारीपर्यंत, आणि काश्मीरपासून आसाम-पर्यंत भारतातील बहुतेक सर्व प्रसिद्ध शहरे, तीर्थक्षेत्रे व प्रान्त पाहिले आहेत त्याचप्रमाणे फेब्रुवारीमध्ये एका महाशिवरात्रीस नेपाळात जाऊन, काटमांडूजवळ पशुपतेश्वराची यात्रा करून आल्यावर लगेच त्याच उन्हाळ्यात हिमालयात कठिण मार्गाने पायी प्रवास करून केदारनाथाचे व बद्रीनारायणाचेहि दर्शन घेतले आहे

सारा हिंदुस्थान देश पाहूनच ते थांबले नाहीत आपल्या मिलच्या यंत्रात व कपड्यात सुधारणा करण्याचे दृष्टीने युरोपातील कारखाने समक्ष पाहून यावे असा विचार करून सन १९३५ साली ते युरोपात गेले होते ईजिप्त, इटली, ऑस्ट्रिया, हंगेरी, जर्मनी व स्वित्झरलंड हे देश व त्यातील कारखाने पाहून ते पुढे फ्रान्समध्ये पॅरिसला गेले लंडनला पुढे लवकरच बादशहा पंचम जॉर्ज यांचा पंचवीस वर्षे राज्य केल्याचा रजत-महोत्सव होणार होता त्या वेळी लंडनला पोचावे असा त्यांचा विचार होता व त्याप्रमाणे त्यांच्या बरोबरच्या बेंजामिनने लंडनमध्ये राहण्याची सर्व सोय करून ठेवली होती व बोटीची आणि आगगाडीची तिकिटेहि रिझर्व केलेली होती, परंतु पॅरिसचे सुंदर राजवाडे, मोठमोठी पदार्थसंग्रहालये, उद्याने, इफेल टॉवर व प्रशस्त रस्ते आणि मोठमोठ्या इमारती वगैरे सर्व पाहून झाल्यावर, एके रात्री ते आपल्या हॉटेलातील खोलींत निजले असता खोलीतील धुराचा (Gas) नळ अर्धवट उघडा राहिल्याने रात्रभर खोलीत विषारी धूर भरून तो या उभयतांच्या फुप्फुसांत शिरला व श्रीमंत प्रतापशेठ व सौ भागीरथीबाई ही दोघेहि बेशुद्ध झाली सकाळी नित्याप्रमाणे ते लवकर उठले नाहीत व दारावर धक्के मारूनसुद्धा आतून आवाज आला नाही, म्हणून बरोबर असलेले श्री क्षीरसागर आणि चोपड्याचे श्री मगनशेठ या दोघांनी धक्के मारून खोलीचे दार फोडले तो आत दोघेहि पूर्ण बेशुद्धावस्थेत पडलेली आढळली ! सर्व खोली विषारी धुराने भरलेलीच होती मग तातडीने पॅरिसच्या प्रख्यात डॉक्टरास बोलावून आणून सतत इलाज केल्यावर सौ भागीरथीबाईसाहेब तीन दिवसांनी व श्रीमंत प्रतापशेठ चार दिवसांनी शुद्धीवर आले ! अशा रीतीने दोघांच्या जीवावर आलेला प्रसंग परमेश्वरकृपेने टळला. परंतु त्यानंतर युरोपातल्या थंड हवेत राहणे त्या दोघांच्या प्रकृतीला मानवण्यासारखे नाही असे फ्रेंच डॉक्टराने निक्षून सांगितल्यामुळे ते प्रथम पॅरिसहून मार्सेल्सला व तेथून हिंदुस्थानला परत आले

सन १९१९ साली ते काश्मीरला एक महिना जाऊन राहिले होते रावळपिंडीहून टांग्याने श्रीनगरला जाताना वाटेत 'मरी' येथे रात्री मुक्काम झाला त्याच रात्रीं तेथे धरणीकंपाचा इतका मोठा धक्का बसला की, बाजेवरून आपण खालीं पडतो की काय असे वाटले ते उठायला लागले तर त्यास उठताहि येईना दारे व खिडक्या खडाखड वाजू लागल्या, पण कोणासहि इजा झाली नाहीं पुढे काश्मीरच्या सरहद्दीवर 'दोमेल' येथे जकातीच्या नाक्यावर नोंद करण्यास टांगेवाला खाली उतरला पुढे रस्ता चढणीचा व डाव्या बाजूस खोल दरीतून झेलम नदी वाहात जात होती रस्त्याला कठडा किंवा भिंत नाहीं, अशा ठिकाणीं काठावर उभा असलेला टांगा, व त्यात श्रीमंत प्रतापशेठ सहकुटुंब बसलेले ! टांग्याचा घोडा फारच उतावळा झाला व चालू लागला, पण रस्त्याला चढाव आणि टांग्यात स्वाऱ्या बसलेल्या, यामुळे टांगा मागे मागेच सरकू लागला टांगा दरीचे काठाकडे जात आहे असे पाहून सौ भागीरथीबाईंनी श्रीमंत प्रतापशेठजींचे त्याकडे लक्ष वेधले शेठजींनी चटकन लगाम हातात घेऊन घोड्यास पुढे चालविले, पण घोडा फारच खोडकर असल्याने तो जो बेफाम निघाला तो आता दरींत पडतो का डोंगरावर आपटतो असे वाटले ! पण सुदैवाने जकात-नाक्याच्या उभ्या खांबात टांग्याचे चाक अडकले व टांगा थांबला याहि वेळेस दोघांचा जीव मोठ्या संकटातून वाचला

जून १९३९ मध्ये बद्रीनारायणास जाताना भुसावळपासून दिल्लीपर्यंत पंजाब मेलने प्रवास झाला यात्रेला एकदर १८ मंडळी अमळनेरहून निघाली होती त्यापैकी बारा माणसे एंजिनाला लागून असलेल्या पहिल्याच डब्यात बसली होती पंजाब मेलने झाशी स्टेशन सोडल्यावर तिचे एंजिन एका वळणावर रुळावरून खाली घसरले, परंतु ड्रायव्हरने मैलभर तशीच गाडी चालत ठेवली, रुळाखालच्या लोखंडी घमेली तडातड फुटल्याचा आवाज होत होता गाडीतील सर्व मंडळी घाबरली व आता गाडी पडते की काय अशी सर्वांस भीति वाटली पण पुढे एक लहानसा पूल आला त्याच्या रुळाखाळच्या आडव्या तुळयामध्ये एंजिनाची पुढची लहान चाके अडकली व मोठा धक्का बसून गाडी थांबली डब्यातील वरच्या फळ्यावरचे सामान धाडकन खाली पडले, पण तेव्हाहि सुदैवाने कोणासच फारशी इजा झाली नाहीं, व यात्रेला निघालेली सर्वच्या सर्व मंडळी सुरक्षित राहिली आणि पुढे सर्वांची बद्रीकेदारची यात्रा सुखरूप पार पडली

परत येताना पावसाळा सुरू झाला होता व देवप्रयाग आणि हृषीकेश यांच्यामधला एक डोंगर पावसाने कोसळून सडक फुटून गेली होती वाटेत मोठमोठे धोंडे पडले होते तेथे बस अडलीच मग सर्वांनी खाली उतरून धोंडे बाजूला ढकलून डोंगराच्या बाजूला जेमतेम बस निघून जाईल इतकी वाट मोकळी करून घेतली व सर्व मंडळी सुखरूप हृषीकेश येथे येऊन पोचली नंतर तेथून हरद्वारला येऊन तेथे १–२ दिवस विश्रान्ति घेऊन श्रीमंत प्रतापशेठ सर्व मंडळींसह अमळनेरला परत आले

आता पाहावयाचे ते बहुतेक सर्व पाहून झाले वयाला ७५ वर्षें पूर्ण झाली धर्म, अर्थ व काम हे मनुष्याच्या पुरुषार्थांचे तीन भाग श्रीमंत प्रतापशेठजींनी आतापर्यंत आत्मसात् केले प्रवृत्ति-

पासून आता त्याचे मन निवृत्त झाले आहे, किंवा प्रवृत्ति आता निवृत्ति झाली आहे विचार सपन्नतेने चित्ताला प्रसन्नता येत चालली चौथा पुरुषार्थ म्हणजे मोक्ष! गुरुवर्य सावळाराममास्तर यान्च्या सदुपदेशाने मोक्षमार्गाची त्याना ६० वर्षापूर्वीपासूनच गोडी लागली आहे स्वत आपणच केले पाहिजे असे व्यावहारिक कार्य आता काही राहिले नाही तेव्हा निवान्त ठिकाणी जाऊन शान्तपणाने राहता यावे म्हणून सुरतेपासून १२ मैलावर 'डुमास' येथे अगदी समुद्रकाठी त्यानी एक विस्तीर्ण बाग व बगला तयारच विकत घेतला असून त्याला 'प्रताप-आश्रम' असें नाव ठेविले आहे आता दर वर्षी वसतऋतूत १-२ महिने ते तेथे जाऊन राहतात, व रोज बराच वेळ तत्त्वज्ञानान्च्या चर्चेत व समुद्रकाठी हिंडून आत्मचिंतनात आनदात घालवितात

श्रीमत प्रतापशेठ याचे जीवनचरित्र पाहून बडोद्याचे कै श्रीमत सयाजीरावमहाराज गायकवाड यान्च्या चरित्राची आठवण होते दोघान्च्या आयुष्यातील प्रमुख घटनात बरेच साम्य आहे गरीब घरात जन्म होऊन दैवयोगाने श्रीमत घरात दत्तक येणे व त्यानतर स्वतच्या बुद्धिसामर्थ्याने वैभवपदावर चढणे अशा घटना इतरत्रहि पाहावयास सापडतील, परतु ऐहिक ऐश्वर्य सपादन केल्यावर त्याबद्दल विरक्ति उत्पन्न होऊन ज्याने आपले सर्व जीवन अध्यात्ममार्गाकडे वळविले आहे अशा व्यक्ति अतिशय विरळा! अशा अलौकिक व्यक्तींपैकी श्रीमत प्रतापशेठ हे एक आहेत

कारखानदार आणि विद्वान या दोन्ही वर्गात त्याची फार मोठी प्रतिष्ठा आहे परतु इतकी प्रसिद्धि प्राप्त केली असूनहि त्याना त्याबद्दल अहकार नाही त्याना फक्त दोनच जबरदस्त व्यसने आहेत एक तत्त्वज्ञानचर्चा, व दुसरे दान-धर्म करणे श्रीमत प्रतापशेठ हे एक अध्यात्मयोगी उद्योगपति अथवा तत्त्वज्ञानी कुबेर आहेत व्यवहार आणि परमार्थ हीं दोन्हीहि त्यानीं साधली असून या अपूर्व यशाचे सर्व श्रेय ते त्याचे पूज्य सद्गुरु सावळाराममास्तर यान्च्या शिकवणुकीलाच देतात

परमेश्वराने श्रीमत प्रतापशेठ यास उदड आयुरारोग्य द्यावे व आणखी अनेक वर्षे सदोदित आत्मचिंतनाचा सात्त्विक परमानद त्याना मिळत राहावा, अशी परमेश्वराजवळ प्रार्थना करून मी हा चरित्रलेख सपवितो

---

# उपसंहार

संपूर्णं जगदेव नन्दनवनं सर्वेऽपि कल्पद्रुमाः ।
गाङ्गं वारि समस्तवारिनिवहः पुण्याः समस्ताः क्रियाः ॥
वाचः प्राकृतसंस्कृताः श्रुतिशिरो वाराणसी मेदिनी ।
सर्वावस्थितिरस्य वस्तुविषया दृष्टे परब्रह्मणि ॥१॥

---

परिशिष्ट १

# श्रीमंत प्रतापशेट यांचा वंशावृक्ष

## १ दत्तक घराणें (चोपडा, पूर्व खानदेश)

स्वरूपचंदजी
- डोंगरसी दासजी
  - रतिरामजी
    - माणिकचंदजी
      - **मोतीलाल (प्रतापशेटजी दत्तक आले)**
        - मगनलाल उर्फ बाबूशेट (दत्तक आले)

## २ जन्म घराणे (कालाडेरा)

गोपीरामजी
- छोटूरामजी + शिवकुवरबाई (बासाच्या बक्षीरामजीची कन्या)
  - मूलचंद
  - नानगराम
    - छगनलाल
    - मगनलाल (प्रतापशेटजींनी दत्तक घेतले)
  - रामप्रताप (माणिकचंदजींना दत्तक गेले)
  - जडावबाई

## ३ मातुल घराणे (बासा)

बक्षीरामजी
- श्रीनिवासजी
  - झाजूरामजी (दत्तक घेतले)
    - गुलाबचंद
    - चतुर्भुज
- शिवकुवरबाई (छोटूरामजी यांना दिली)

## परिशिष्ट २

## श्रीमंत प्रतापशेठजी यांची जन्मकुंडली

**संवत् १९३६, शके १८०१ कार्तिक कृष्ण १३, गुरुवार,**
**इ. घ. ४९ पळें ५०, अनुराधा नक्षत्र,**
**ता. ११ डिसेंबर १८७९; रात्रौ २ वाजून २१ मिनिटें.**

**जन्मस्थळ : मोहनपुरा, जयपूर संस्थान.**




तूळ–लग्न  वृश्चिक–राशी

## परिशिष्ट ४

# श्रीमंत प्रतापशेठ यांच्या आयुष्यातील महत्त्वाच्या घटना.

१ जन्म—कार्तिक कृष्ण १३, सवन् १९३६ राजपुतान्यात जयपूर संस्थानात मोहनपुरा येथे इंग्रजी तारीख ११ डिसेंबर सन १८७९ इसवी

२ नवापुऱ्याला सर्व कुटुंबाचे स्थलान्तर–संवत् १९४०

३ चोपड्यास आगमन—चैत्र शुक्ल ३, संवत् १९४४

४ दत्तविधान—फाल्गुन वद्य २, संवत १९४६

५ पहिला विवाह—चोपड्याचे श्री देवचंद डालूशेठ यांची कन्या सुंदराबाई हिच्याशीं झाला—ज्येष्ठ शुद्ध १०, संवत् १९४८

६ श्री माणकचंदशेठ यांचा मृत्यु—भाद्रपद शुक्ल ५, संवत् १९५०

७ गुरुवर्य सावळारामपंत नाईक यांची संताराशिक्षक म्हणून नेमणूक संवत् १९५०–१९५१

८ दुसरा विवाह—चैत्र वद्य ३, संवत् १९५६, राजपुतान्यातील कालाडेरा येथील श्री सुखदेवजी शेठ अग्रवाल यांची कन्या अणचाबाई हिच्याशी झाला, व नाव सौ भागीरथीबाई ठेविलें

९ पहिली पत्नी सौ सुंदराबाई हिचा मृत्यु–संवत् १९५८

१० जनक माता-पिता, सौ शिवकुंवरबाई व छोटूरामजी यांचा याच क्रमाने संवत् १९५८ च्या प्लेगमध्ये, चोपड्याजवळ, गूळ नदीच्या काठी नारद-खरद या गावीं मृत्यु

११ प्रताप मिल रजिस्टर झाली—१३ जून १९०६

१२ प्रताप मिल चालू झाली—नोव्हेंबर १९०८

१३ चि रा मगनलाल ऊर्फ बाबूशेठ यास विधिपूर्वक दत्तक घेतले. सवत् १९७८, तारीख १७ मार्च १९२२

१४ धुळ्याची ‘ न्यू प्रताप मिल ’ स्थापन झाली––ता ६ ऑगस्ट १९२३

१५ चि ग मगनलाल मोतीलाल याचा विवाह––श्रीमत शेठ चदूलाल गणेशरामजी धुळेकर याच्या कन्येशी झाला, व वधूचे नाव सौ बनारसीदेवी असे ठेविले—चैत्र वद्य ४, सवत् १९९४, सोमवार, तारीख १८ एप्रिल १९३८

## परिशिष्ट ५

## प्रवास व यात्रा

१ १९१९—मे व जून–काश्मीरचा प्रवास–वाटेत ‘ मरी ’ येथे रात्री धरणीकप–‘दोमेल’ येथे टाग्याचा घोडा उधळला, पण सुदैवाने अपघात टळला–अमृतसरला जालियनवाला बागेतील कत्तल नुक्तीच झाली असल्याने जागोजागी दगे चालू होते–परत प्रवासात पेशावरला वजीरबाग पहावयास गेले असता दगा सुरू होण्याची चिन्हे दिसल्यामुळे तेथूनच स्टेशनवर येऊन ताबडतोब परत

२ सन १९२७—कलकत्ता व दार्जिलिंगचा प्रवास

३ सन १९३५—युरोपचा प्रवास–पॅरिसला हॉटेलात रात्री झोपेत विषारी धुराचा ( गॅसचा ) अपघात, व त्यामुळे तेथूनच स्वदेशी परत

४ सन १९३९—फेब्रुवारी––महाशिवरात्रीस नेपाळात पशुपतिनाथाची यात्रा

५ सन १९३९––जून, जुलै–हिमालयातील केदारनाथ, तुगनाथ व बद्रीनाथ या यात्रा

६ सन १९४०––मे व जून–कोडाइ कॅनॉल ते कन्याकुमारीपर्यंत प्रवास

७ सन १९५२––कलकत्ता व विमानाने पुढे आसामात दिब्रूगढपर्यंत प्रवास

८ याशिवाय, महाबळेश्वरास अनेक वर्षे उन्हाळ्यात वास्तव्य, व काशी, रामेश्वर इत्यादि भारतातील बहुतेक सर्व प्रसिद्ध तीर्थक्षेत्राची यात्रा केली आहे

## परिशिष्ट ६

## श्रीमंत प्रतापशेठ यांचे आतापर्यंत प्रसिद्ध झालेले ग्रंथ

१ खाजगी टिपणवही, भाग १ व २

२ जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप ? ( ओवीबद्ध ग्रथ )

३ भगवद्गीतेची गुरुकिल्ली ( ओवीबद्ध )

४ तत्त्वज्ञानावरील ५१ व्याख्याने

श्रीमंत प्रतापशेठ अमृतमहोत्सव गौरव-ग्रंथ

खंड १ ला–विभाग २ रा

# श्रीमंत प्रतापशेठजी यांचें तत्त्वज्ञान

लेखक
श्रीराम माधव चिगळे, एम ए,
तत्त्वज्ञानमंदिर, अमळनेर

# अनुक्रमणिका

# श्रीमंत प्रतापशेठजी यांच्या तत्त्वज्ञानाचा व ग्रंथांचा परिचय

## प्रस्तुत निबंधाचा उद्देश, त्याचें स्वरूप व मर्यादा

" तैसे अध्यातमशास्त्री इये । अंतरंगाचि अधिकारिये " —ज्ञानेश्वरी

निबधान्या प्रारभीच प्राचीन पद्धतींतील अनुबधचतुष्टयास[1] थोड्याफार फरकाने अनुसरून प्रस्तुत निबधाचे स्वरूप, त्याचा उद्देश व मर्यादा इ गोष्टींचे स्पष्टीकरण करणे अनेक दृष्टींनी इष्ट वाटते श्रीमत प्रतापशेठजीच्या अमृत महोत्सवान्या निमित्ताने अमृत महोत्सव समितीतर्फे हा ग्रथ प्रसिद्ध होत आहे, त्या अर्थी या ग्रथाचे अधिकाश वाचक श्रीमत शेठसाहेबाचे मित्र, चहाते व हितचिंतक हे होत श्रीमत शेठसाहेबाची कामगिरी राष्ट्रीय जीवनाच्या बहुविध क्षेत्रामध्ये असल्या-कारणाने त्याचे सबधहि सर्व तऱ्हेच्या लोकाशी आलेले आहेत, व याच कारणामुळे त्याचे मित्र, चहाते व हितचिंतक याच्यामध्ये सर्व तऱ्हेच्या लोकाचा समावेश होतो परतु यापैकी त्यान्या तत्त्वज्ञानाशी खऱ्या अर्थाने परिचित असलेल्याची सख्या बोटावर मोजण्याइतकीच निघेल मात्र सर्वांनाच श्रीमत शेठजींना तत्त्वज्ञानाची मनापासून आवड आहे ही गोष्ट पूर्णपणे माहीत आहे कारण, 'तत्त्वज्ञानमन्दिर' हे त्याच्या आवडीचे मूर्त व जिवत प्रतीक तर आहेच, शिवाय, दररोज दोन तास सकाळ सध्याकाळ घरी खासगी रीत्या तत्त्वज्ञानचर्चा, त्याचप्रमाणे तत्त्वज्ञानमन्दिर या त्यान्या लाडक्या सस्थेत त्याची आज अनेक वर्षे नियमित रूपाने होणारी तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने, प्रसिद्ध झालेले तात्त्विक ग्रथ, तत्त्वज्ञान या विषयावर अधूनमधून 'नवभारत', 'कल्याण' इ० मासिकामध्ये प्रसिद्ध होणारे स्फुटलेख, त्याचप्रमाणे धार्मिक व तात्त्विक स्वरूपान्या कार्यात त्यानी

१ प्राचीन पद्धतीप्रमाणे कोणत्याहि ग्रंथाच्या प्रारभींच त्या ग्रथाचा विषय, त्याचें प्रयोजन, त्याचे अधिकारी, व संबध या चार गोष्टींचें स्पष्टीकरण करण्यात येते. यानाच ' अनुबधचतुष्टय ' म्हणतात.

वेळोवेळी सढळ हाताने केलेली मदत इ गोष्टीमुळे त्याची तत्त्वजिज्ञासा आणि तात्त्विक अभिरुचि सर्वान्च्या परिचयाची झालेली आहे तथापि त्याच्याशी निकट परिचय असलेल्या मडळीनाहि त्याचे तत्त्वज्ञान काय आहे याची नीटशी कल्पना नाही, असे म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाही व याचे कारण एकच की तत्त्वज्ञान हा विषयच मुळी गूढ आहे खुद्द भगवतानीच गीतेत म्हटले नाही का ? " हजारो मनुष्यात कोणी एखादाच ज्ञानप्राप्तिरूप सिद्धीसाठी प्रयत्न करितो, आणि अशा प्रयत्नशील सिद्ध पुरुषामध्येहि मला यथार्थ रूपाने जाणणारा विरळाच निघतो[1]" चागल्या चागल्याना हा आश्चर्याचा विषय होऊन बसतो,[2] व यामुळेच तत्त्वज्ञान म्हणजे आपणास अनाकलनीय अस काही तरी गौडबगाल आहे अशीच समजूत सर्वत्र रूढ असलेली दिसून येते या विषयाचा सबध आपणाशी व आपल्या दैनदिन जीवनाशी अति निकटचा व जिव्हाळ्याचा आहे किंवा असू शकेल याची कल्पनाच बहुसख्य लोकाना असत नाही आमच्या उक्त विधानाचा हेतु कोणावर दोषारोपण करण्याचा नसून वस्तुस्थिति आहे तशी दाखविणे एवढाच आहे त्यामुळे कोणाचाहि गैरसमज होणार नाही अशी आशा आहे, व असा गैरसमज करून घेऊ नये, अशी विनति पण आहे. तात्पर्य हे की, प्रस्तुत निबध अशा प्रकारच्या तत्त्वज्ञानाशी अनभिज्ञप्राय सामान्य व विविध क्षेत्रातील मडळीस उद्देशून लिहिला आहे, हे प्रथम नमूद केलेले बरे यामुळे श्रीमत प्रतापशेठजीन्च्या तत्त्वज्ञानाची साधक बाधक दृष्टीने चिकित्सा, त्याचप्रमाणे तुलनात्मक किंवा परीक्षणात्मक दृष्टीनेहि त्याचा विचार यात करता येण्याजोगा नसल्यामुळे अशा प्रकारचे विवेचन मुद्दाम टाळले आहे अशा प्रकारची चर्चा तत्त्वज्ञानमदिरात व इतर प्रसगी बरीच झालेली आहे व नित्य होत असतेच परतु येथे तसे करणे अनावश्यक असल्यामुळे प्रस्तुत प्रसगी तो मार्ग पत्करला नाही तेव्हा तत्त्वज्ञानात मुरलेल्या शास्त्री-पडित मडळीसाठीं, तद्वतच आधुनिक पद्धतीने तत्त्वज्ञानाचा अभ्यास केलेल्या विद्वान् मडळीसाठीहि हा लेख नाही, हा खुलासा सुरुवातीसच केलेला बरा नाही तर या मडळीचा प्रस्तुत निबध वाचून अपेक्षाभग व्हावयाचा केवळ या सर्व विद्वानाचा अधिकार मोठा असल्यामुळेच याना या निबधाच्या वाचक-वर्गातून वगळले पाहिजे त्याच्यासाठी श्री शेठजीचे मूळ ग्रथ किंवा खुद्द शेठजी आहेतच अर्थात् निव्वळ कुतूहलाने अथवा लेखकाबद्दल त्याच्या मनात वसत असलेल्या प्रेमभावनेने किंवा परीक्षक या नात्याने आम्ही स्वत निर्धारित केलेल्या मर्यादाचा विचार करून त्यानी हा निबध वाचावयास घेतला तर आम्ही त्याचे मोठ्या आनदाने स्वागतच करू

श्री शेठजींच्या तत्त्वज्ञानाबद्दल लिहिताना एक मोठी अडचण अशी की, जरी स्थूलमानाने त्याचे स्वरूप निश्चितप्राय झालेले असले तरी ते बाधलेल्या पाण्याप्रमाणे नसून वाहत्या झऱ्यासारखे

---

१ " मनुष्याणा सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धाना कश्चिन्मा वेत्ति तत्त्वत ॥ " श्रीमद्भगवद्गीता, अ ७-श्लोक ३

२ " आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्य ।
आश्चर्यवच्चैनमन्य शृणोति श्रुत्वाप्येन वेद न चैव कश्चित् ॥ " श्रीमद्भगवद्गीता, २-२९

ह्या दुर्विज्ञेय आत्मतत्त्वाला कोणी अद्भुतवस्तूप्रमाणें पाहतात, कोणी अद्भुतवस्तूप्रमाणे ह्याचें वर्णन करितात व कोणी तशाच बुद्धीनें याचे श्रवण करितात, तर कोणी श्रवण करूनहि याला जाणीत नाहींत हे मोठे आश्चर्य होय

त्याचे खरे स्वरूप आहे त्याच विषयाचे चिंतन निरंतर चालू असल्यामुळे त्यात शेठजींच्या तात्त्विक प्रतिभेचे नवनवोन्मेष व प्रत्यही निरनिराळ्या रंगाच्या सूक्ष्म व नाजुक छटा पाहावयास सापडतात हा क्रम अखंड चालू आहे, व पुढेहि तो तसाच राहील कारण तत्त्वचिंतन हे शेठजींचे आध्यात्मिक भोजनच होऊन बसले आहे [१] त्याचे महत्त्व श्री शेठजींना शारीरिक अथवा व्यावसायिक गरजांपेक्षाहि अधिक वाटते, कारण या सर्व गोष्टी एकीकडे ठेवून ते तत्त्वचिंतन करतील, परंतु तत्त्वचिंतनाच्या आड या गोष्टींना सहसा, अगदीच अगतिक झाल्याशिवाय ते येऊ देणार नाहीत [२] ही गोष्ट सर्वांच्या परिचयाची झालेली आहे तेव्हा प्रस्तुतसारख्या पृष्ठसंख्या मर्यादित असलेल्या निबंधाच्या रूपाने त्यांच्या तत्त्वज्ञानाचा यथार्थ परिचय करून देणे बरेच अवघड आहे, हे सहज लक्षात येण्यासारखे आहे या निबंधाच्या रूपाने त्यांच्या तत्त्वज्ञानरूपी मधाचे एखादे बोटच वाचकांना लावता येईल, किंवा त्याचा प्राथमिक परिचयच ( Introduction ) करून देता येईल त्याचे खरे स्वरूप श्री शेठजींच्या मूळ ग्रंथातून अथवा खुद्द त्यांच्याकडूनच समजून घ्यावे लागेल, म्हणजेच त्याचे अंतरंग लक्षात येईल याचे दुसरे व महत्त्वाचे कारण असे की, त्यांचे तत्त्वज्ञान नुसते पुस्तकी स्वरूपाचे अथवा बौद्धिक काथ्याकूट करणारे अथवा शब्दांचा कीस काढणारे-या स्वरूपाचे नव्हे त्यात पांडित्य अथवा तार्किकता दिसून येणार नाही या दृष्टीने पाहू जाणारास त्यात क्वचित् प्रमादहि आढळून येतील, व या गोष्टींची श्री शेठजींना जाणीव नाही असे नाही तथापि ते या गोष्टींना मुळीच किंमत द्यावयास तयार नाहीत कारण या गोष्टींहून अधिक महत्त्वाची वस्तु त्यांना मिळालेली आहे, अशी त्यांची ' आत्मप्रतीति ' आहे, व ही महत्त्वाची वस्तु म्हणजे अनुभव त्यांच्या तत्त्वज्ञानाचा महत्त्वाचा भाग होय त्यांच्या तत्त्वज्ञानात अथपासून इतिपर्यंत दिसून येणारी ही महत्त्वाची वस्तु म्हणजे जीवनाकडे पाहण्याची एक विशिष्ट अनुभवात्मक दृष्टि होय, व ही दृष्टि त्यांच्या तत्त्वज्ञानाचा गाभा किंवा अंतरात्मा आहे ही दृष्टि ग्रंथामधून, विशेषत प्रस्तुतसारख्या निबंधातून संक्रामित करणे अशक्य कोटींतले नसले तरी फारच अवघड आहे, हे कोणीहि कबूल करील ही दृष्टि प्रत्यक्ष त्यांच्याकडूनच प्राप्त करून घेण्याजोगी आहे त्यांना ती त्यांच्या गुरूकडून आध्यात्मिक वारसाच्या रूपाने मिळाली आहे, व हीच दृष्टि इतरांना देऊन अंशत तरी गुरूंच्या आध्यात्मिक ऋणातून उतराई होण्यास ते ती इतरांनाहि देण्याची सारखी खटपट अथवा धडपडच म्हणाना, करीत असतात ही दृष्टि 'एक्सरेज'

---

१ " Pratap Seth loves to talk on Vedanta in his own small Private Circle, almost daily That is just like food and drink to him The mantle of Master Savalaram has fallen upon him "

—A Life sketch of Shrimant Pratapseth by Prof G R Malkani, P 51

२ कित्येकदा शरीरप्रकृति अस्वस्थ असतानादेखील त्यांनी तत्त्वज्ञानमंदिरात तत्त्वज्ञानावर व्याख्यानें दिली आहेत किंवा ऐकली आहेत खुद्द लेखकाची दोन व्याख्यानें त्यांनीं याच परिस्थितीत ऐकलीं आहेत आणि शारीरिक त्रास व घरचा विरोध सहन करूनहि नेटाने कडेपर्यंत बसलेच

( X Rays ) 'क्ष'किरणाहूनहि आधिक सूक्ष्म व भेदक[1] असून, हिच्यामुळें सर्व लौकिक मूल्ये ढासळून जाऊन त्याची जागा नवीन शाश्वत स्वरूपाची आध्यात्मिक व तात्त्विक मूल्ये घेतात या दृष्टीमुळे तत्त्वातत्त्वान्या सरामिसळींतून नेमके तत्त्व वेगळे काढता येते

" सलिलीं पय जैसे । एकत्र मिनले असे । परी ते निवडूनी राजहसे । वेगळे कीजे ॥ "
ही दृष्टि म्हणजे तत्त्वदृष्टि आहे[2] या दृष्टीवाचूनचा माणूस डोळे असूनदेखील आधळा असतो, व या दृष्टीने सपन्न असलेली व्यक्ति डोळे ( चर्मचक्षु ) नसूनहि खऱ्या अर्थाने पाहणारी असते जीवनाकडे साकल्याने व खऱ्या अर्थाने पाहू जाणाऱ्या, तद्वतच अध्यात्मशास्त्राचे नेमके मर्म ग्रहण करणाऱ्या या दृष्टीचा परिचय म्हणजेच श्री शेठजीन्या तत्त्वज्ञानाचा परिचय, व अशाच प्रकारचा अल्पस्वल्प परिचय या लहानशा निबधाच्या रूपानें करून देणे हे आमचे प्रस्तुत प्रसगी ध्येय आहे यात कितपत यश येईल हे वाचकानींच ठरवावयाचे आहे मात्र या बाबतीत वाचकाचे पूर्ण सहकार्य अपेक्षित आहे कारण तत्त्वज्ञान हा विषय काहीं एखाद्या रम्य किंवा विनोदी कथेसारखा नाहीं तो श्रीतुकाराम महाराजाच्या शब्दात 'लोखडाचे चणे' या स्वरूपाचा आहे श्रीज्ञानेश्वर माउलीने आपला लोकोत्तर ग्रथ 'अमृतातेही' पैजा जिंकणाऱ्या[3] रसाळ व उपमा दृष्टान्त प्रचुर भाषेत सामान्यजनासाठी लिहून त्याच्या हवालीं करताना एक महत्त्वाची सूचना देऊन ठेविली आहे ही सूचना कमजास्त योग्यतेच्या सर्वच तात्त्विक लिखाणास लागू पडण्याजोगी आहे —

" तैसे अध्यात्मशास्त्री इये । अतरगचि अधिकारिये ।
परि लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ "

तद्वतच,

" जिहीं आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गससाराची कुरोंडी ।
तेवाचुनी एथिची गोडी । नेणती आणिक ॥ "

श्री शेठजीचे तत्त्वज्ञान म्हणजे त्याचे गुरुवर्य श्री स्व सावळाराम मास्तर साहेब याच्या जीवनव्यापी आध्यात्मिक साधनेचे एक सुमधुर फळ, व त्यात खुद्द शेठजीन्या आजीवन तात्त्विक चिंतनरूपी सुवासाची भर पडलेली – हे त्याचे स्वरूप आहे, व या सुदीर्घ चिंतनाची परिणति तत्त्व-दृष्टीत अथवा अत प्रज्ञेत ( Intuition ) झाली आहे वर उल्लेखिलेल्या सर्व मर्यादा लक्षात घेऊनच श्री शेठजीच्या तत्त्वज्ञानाचा ओझरता परिचय त्याचे मित्र, चहाते व हितचिंतक याना त्याच्याच सुपरिचित घरगुती भाषेत करून द्यावयाचा आहे यात कितपत यश येते ते वाचकावरच सोपविलेले

१ काठकोपनिषदात या दृष्टीचे वर्णन खालील श्लोकात आले आहे

एष सर्वेषु भूतेषु गूढोऽऽत्मा न प्रकाशते ।
दृश्यते त्वग्रया बुद्धया सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभि ॥ काठकोपनिषद्, १–३–१२

२ जें दिठीही न पविजे । ते दिठीवीण देखिजे । जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥ ज्ञानेश्वरी ६-३३

३ " माझा मराठाचि बोल कौतुकें । परि अमृतातेंही पेजा जिंके । ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ "
—ज्ञानेश्वरी, ६–१४

बरे कारण अव्याहत सत्त्वा तप तत्त्वज्ञानमंदिरात राहून शास्त्रचिंतनात घालविलेल्या माणसाची सहज घरगुती भाषादेखील नकळत सुपरिचित रूढ शास्त्रीय शब्दप्रणालीचा अंगीकार करू लागते, व या भाषारूपी रेलगाडीची ही साधेपालट अगदी बेमालूम होते तथापि या प्रसंगी आमचा प्रतिपाद्य विषय सुबोध करण्याची आमच्याकडून आम्ही पराकाष्ठा करू

## पूर्वपीठिका

" तस्माद् गुरु प्रपद्येत जिज्ञासु श्रेय उत्तमम् " -श्रीमद्भागवत, ११-३-२१ श्लोकार्ध

" म्हणोनि जाणतेनि गुरु भजिजे। तेणे कृतकार्य होइजे।
जैसे मूळसिंचने सहजे। शाखा पल्लव संतोषती "॥ -ज्ञानेश्वरी, १-२५.

" सद्‌गुरुविण सच्छिष्य। तो वाया जाय निशेष।
का सच्छिष्येविण विशेष। सद्‌गुरु सिणे॥ " -दासबोध, ५-३-२

श्रीमद्भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायात अर्जुनाने भगवान् श्रीकृष्णास असे विचारले आहे की, एखादा साधक परमार्थसाधन करीत असताना ज्ञानप्राप्तिरूप सिद्धि न मिळवितांच निवर्तला तर त्याला कोणती गति मिळते? यावर भगवान श्रीकृष्णांनी उत्तर दिले की, अशा प्रकारचा साधक पवित्र अशा श्रीमंतांच्या घरी किंवा ज्ञानवान् अशा योग्यांच्या कुळात जन्म घेतो तेथे त्याला पूर्वजन्मातला परमार्थमार्गाचा बुद्धिसंस्कार अनायासे प्राप्त होतो, आणि यामुळे तो परमात्मप्राप्तिरूप सिद्धि मिळविण्यासाठी पूर्वापेक्षाहि अधिक उत्साहाने प्रयत्न करतो [1] श्रीतुकाराम महाराजांनी हीच गोष्ट ' पूर्वीचा तो दोरा उगवेल। उगवेल दोरा सतसंगे करूनी '- या सोप्या भाषेत सांगितली आहे हा दोरा पूर्वीच्या अध्यात्मज्ञानाचे संस्कार या रूपाचाच होय श्री शेठजींच्या जीवनात हाच प्रकार दिसून येतो श्री सावळाराम मास्तरांची भेट हे य कश्चिन् निमित्त होताच त्यांचा ' पूर्वीचा दोरा ' उगवला ज्या चिंतामणदादा चौधरी यांनी सावळाराम मास्तरांची नियुक्ति शेटजींचे सतारशिक्षक म्हणून सुचविली त्यांना या लहानशा गोष्टीत भावी किती तरी मोठमोठाल्या गोष्टींचे बीज होते याची त्या वेळी कल्पनाहि नसेल [2]

श्री मास्तरसाहेब प्रारंभी ' नानावाद्ये सिकविती जन। तेहि येक गुरु ' [3] या श्रेणीतले लौकिक गुरु असले तरी शिष्याचा अधिकार पाहून त्यांनी सद्‌गुरूचे काम केले लौकिक गुरूत व सद्‌गुरूत महदंतर आहे लौकिकी प्रपंचोपयोगी विद्या शिकविणारा तो गुरु मात्र शिष्यास

---

१ श्रीमद्भगवद्गीता अ ६, श्लोक ३७-४५

२ " For who can tell how vast the plan Which this day's incident began "

३ दासबोध, ५-२-४

आत्मज्ञान देऊन प्रपचापासून कायमची सुटका करविणारा तो सद्गुरु[1] लौकिक गुरूचेहि महत्त्व कमी नाहीं, तथापि सद्गुरूचा महिमा निव्वळ अगाध आहे[2] सद्गुरूचा महिमा परब्रह्माहूनहि अधिक आहे, कारण सद्गुरूवाचून ते स्वप्रकाश, स्वयज्योति, परात्पर परब्रह्मतत्त्वहि अधारातच राहिले असते[3] म्हणून थोर थोर सदगुरुभक्ताना सद्गुरूसाठी एकहि उपमा सापडली नाहीं सद्गुरु निरुपम आणि अलौकिकच राहिला,[4] व पुढेहि तो तसाच राहील मात्र सद्गुरूच्याबरोबर सच्छिष्याचाहि महिमा तितकाच आहे, कारण सद्गुरु असला परतु त्याला सच्छिष्य न भेटला तर त्याचा उपयोग काय? म्हणून समर्थांनी सच्छिष्यावर दासबोधात ‘ शिष्यलक्षण ’ नावाचा एक पुरता समास खर्ची घातला आहे, कारण अयोग्य शिष्यावर कितीहि मेहनत घेतली तरी ती फुकट जाणार जमीनच जर खडकाळ असली तर उत्तम बी व मुबलक पाऊस याचा काय उपयोग? म्हणून समर्थांनीं निर्णय दिला "तैसे येकाविण एक । होत असे निरर्थक ॥" सावळाराम मास्तरामध्ये सुप्त असलेला सद्गुरु श्री प्रतापशेठजींसारखा सच्छिष्य भेटल्यामुळेच प्रकट झाला, किंबहुना सावळाराम मास्तराना उजेडात आणण्याचे श्रेय सर्वस्वी श्री प्रतापशेटजींसारख्या सच्छिष्यालाच दिले पाहिजे[5] जगात जेवढे म्हणून सबध व नातीगोती आहेत त्यात सद्गुरु व सच्छिष्य याच्यासारखे पवित्र

१ " जो शिष्यासी मेळवी सद्वस्तूते । सद्गुरु त्यातें श्रीकृष्ण मानी । "–एकनाथी भागवत " जो ब्रह्मज्ञान उपदेशी । अज्ञान अधार निरसी । जीवात्म्या शिवात्म्यासी । ऐक्यता करी तो सद्गुरु जाणावा । " –दासबोध ( ५–२–९ )

२ " अगाध गुरूचे महिमान । तो भाग्येवीण भेटेना ॥ " –ए भागवत

३ " ब्रह्म सर्वांचे प्रकाशक । सद्गुरु तयाचाहि प्रकाशक । " " ब्रह्मीं ब्रह्मत्व प्रमाण प्रभा । हे वाक्य महिमा गुरूची ॥ " " गुरु म्हणो देवासमान । तंव देवासी याचेनि देवपण । मग त्या सद्गुरुसमान । देवही जाण तुकेना ॥ "–ए भागवत " गुरुदेवास बरोबरी । करी तो शिष्य दुराचारी ॥ असो सद्गुरुपदापुढे । दुजें काहींच न चढे । देव सामर्थ्य ते केवढे । मायाजनित ॥ "–दासबोध

४ " दृष्टान्तो नैव दृष्टस्त्रिभुवनजठरे सद्गुरोर्ज्ञानदातु स्वीय साम्य विधत्ते भवति निरुपमस्तेन वाऽ लौकिकोऽपि ॥ "–शकराचार्यकृत शतश्लोकी, श्लोक १ " गुरूचे उपमे समान । पाहता जगी न दिसें आन ॥ यालागीं अगाध गुरुगरिमा । उपमा नाही निरुपमा ।"–ए भागवत " शिष्यास गुरुत्व प्राप्त होये । सुवर्ण सुवर्ण करिता नये । म्हणोनि उपमा न साहे । सद्गुरुसी परिसाची ॥ परिस आपणा ऐसें करीना । सुवर्णे लोहो पालटेना । उपदेश करी बहुत जना । अकित सद्गुरूचा ॥ "–दासबोध

५ " In this sense it is no exaggeration to say that Master Savalaram was discovered and made great through his disciple" —A life sketch of Shrimant Pratapseth by Prof G R Malkani, p 45

कै मास्तरसाहेबाच्या निधनानिमित्त भरलेल्या सभेत श्री प्रतापशेठजींनीं मोठ्या कळवळ्याने सागितलें कीं, " मास्तरसाहेबाची योग्यता वास्तविक काय होती हे फारच थोड्या लोकास कळून आलें "

नाते दुसरे कोणतेच नाहीं,[१] कारण यात लौकिक दृष्टीचा गधाहि नसतो समर्थांना कल्याण शिष्य भेटल्यामुळे जो आनद होई, किंवा कल्याणाना सद्गुरुसमर्थ भेटल्यामुळे जो आनद होई तो आनद शब्दानी निर्वचनीय नाही "खुण त्याची कळे जे तैसे असती। तुका म्हणे भ्रान्ति दूजियाला" श्री शेठजी हे सद्गुरुमास्तरसाहेबाचे कल्याणशिष्य श्री शेठजीना मास्तरसाहेबाबद्दल काय वाटत होते व अजूनहि वाटत आहे हे त्याच्या तत्त्वज्ञानावरील ५१ व्याख्यानाच्या प्रारभीच दिलेल्या समर्पणावरून सहज कळण्यासारखे आहे "ज्यानी मला ह्या पुस्तकात लिहिलेले तत्त्वज्ञान मोठ्या आस्थेने व कळकळीने शिकविले, व मला ज्ञानहीन पशूला मनुष्यात आणिले, ते माझे परमपूज्य सद्गुरु कै सावळाराम बाळाजी नाईक यान्च्या चरणीं हे पुस्तक मी मोठ्या भक्तीने व सद्भावनेने अर्पण करीत आहे –प्रताप" श्री शेठजी जगासाठी श्रीमत प्रतापशेठ असले तरी सद्गुरूसाठी त्याचे आवडते प्रतापच आहेत, व त्याच्या स्मृतीखातर प्रतापच राहतील गुरु व शिष्य याचे सबध कसे असावेत याबद्दल श्री शेठजींचे विचार एका सच्छिष्यास साजेसेच आहेत गुरूच्या योग्यतेपेक्षाहि ते शिष्याच्या योग्यतेसच अधिक महत्त्व देतात या बाबतीत ते नेहमी एकलव्याचें उदाहरण आपल्या नजरेसमोर ठेवितात खाजगी टिपणवही, भाग २ (पृ ८६) मध्ये त्यानी आपले विचार 'शिष्याची पात्रता' या शीर्षकाखाली प्रकट केले आहेत उदा० "ज्ञानाकरिता शिष्याच्या पात्रतेची खास जरूरी आहे एखाद्या वेळी गुरु अगदी जडमूढ असला तरी चालेल, परतु शिष्य मात्र चागलाच योग्य पाहिजे गुरूची पात्रता शिष्याच्या ज्ञानास आड येत नसून शिष्याची जडताच आड येते" आपल्या ठायी वसत असलेल्या या जिज्ञासु व विनम्र वृत्तीमुळेच ते श्री मास्तरसाहेबाचे तत्त्वज्ञान इतक्या उत्तम तऱ्हेने आत्मसात् करू शकले तात्पर्य हे कीं, योग्य अशा सद्गुरूस योग्य असा शिष्य भेटताच दोहोमधील सबध उत्तरोत्तर प्रेमाचे व जिव्हाळ्याचे होत गेले, व मास्तरसाहेबाच्या हयातीत यामध्ये व्यत्यय कधीच पडला नाही हा गुरुशिष्याचा सबध जडला आणि तेव्हापासून लौकिक शिक्षणाने प्रारभ होऊन त्याची थेट वेदान्त शास्त्रात परिणति होण्यापर्यतचे मधले दुवे खालीलप्रमाणे होत

प्रारभी श्री मास्तरसाहेबाची नियुक्ति बालवयात असलेल्या शेठजींना सतार शिकविण्यास्तव झाली तरी मास्तरामध्ये इतर सगीत शिक्षकाहून एक महत्त्वाचा विशेष होता इतर सगीतज्ञ साधारणपणे आपल्या कलेच्या परिसराबाहेर सहसा पाऊल टाकीत नाहीत परतु मास्तरानी सगीताला स्वतत्र अशी किंमत कधीच दिली नाही सगीताला आध्यात्मिक दृष्टीने चित्तैकाग्र्याचे एक उत्तम साधन म्हणून ते समजत "मनाची एकतानता करण्यास या गाण्याचा व वादनाचा फार उपयोग होतो असे त्याचे मत असे" तेव्हा त्यानी आपल्या शिष्याची तल्लखबुद्धि व योग्यता पाहून सतारीबरोबरच क्रमाक्रमाने विचारप्रवर्तक असे तात्त्विक वाङ्मयहि

---

१ "The relationship of the Guru and the disciple is the purest human relationship that I can think of It is the most self forgetting and disinterested, and withal the most passionate, relationship Arithmetic does not enter into it, nor does worldly greatness"– Ibid p 44

शिकविण्यास सुरुवात केली श्री शेठजींच्या या वेळच्या अभ्यासक्रमाचे वैशिष्ट्य म्हणजे हा कार्यक्रम आजकालच्या शिकवणीसारखा एखाद्या तासापुरताच मर्यादित नसून तो जवळ जवळ दिवसभर चाले मास्तरसाहेबानीं सागावयाचे व शेठजींनी तासनतास ‘ सर्व इद्रियाचे कान करून ’ श्रवण करावयाचे सॉक्रेटिसाचे चरित्र, रासेलस, बेकनचे निबध, अनेकविद्यामूलतत्त्वसग्रह, नशीब आणि उद्योग इ सारख्या भारदस्त ग्रथामुळे तात्त्विक स्वरूपाच्या गहन व अमूर्त विचारसरणीची ( Abstract thought ) गोडी शेठजीना लागली उच्च वैचारिक क्षेत्रात त्याचे मन रमू लागले अशा प्रकारे तात्त्विक विचारसरणीस अनुकूल भूमिका तयार होताच, श्री शेठजींचा मेदू कणखर होताच, मास्तरानी पुढचा सवाल टाकला, “ काय रे, तुला प्रवृत्ति शिकवू की निवृत्ति शिकवू ? ” व प्रथमत याचे स्वरूप स्पष्ट करून नतर शिष्याच्या इच्छे-नुसार यापैकी अधिक उत्तम जी निवृत्ति तिचेच धडे देत गेले कारण त्याच्या मते निवृत्ति चागली साधल्यास प्रवृत्ति सहज चागली साधते व्यापक जी निवृत्ति तिच्यात व्याप्य जी प्रवृत्ति तिचा सहज समावेश होतो याच्या उलट क्रम मात्र नाहीं प्रवृत्ति चागली साधल्यास निवृत्ति साधेलच असे नाहीं वरीलप्रमाणे निर्णय घेताच मास्तरानी शेठजींना ज्ञानेश्वरीकडे वळविले, व क्रमाक्रमाने शास्त्राच्या अरण्यात[१] स्वत वाटाडे बनून प्रविष्ट करावेले, व स्वानुभवाची दृष्टि देऊन त्याच्या बाहेर नेले ‘नैष्कर्म्यसिद्धि’ मास्तराचा आवडता ग्रथ तो शेठजींनी उत्तम तऱ्हेने आत्मसात् केला, व ‘ नैष्कर्म्यसिद्धी’च्या आधारावर ते महान् कर्मयोगी बनले, व ‘ वेदान्ताने देश बुडविला ’ ही तक्रार खोटी ठरविली तात्त्विक क्षेत्रात वेदान्ताचे परमोच्चज्ञान व व्यवहारात श्रेष्ठ प्रतीचा कर्मयोग याचा सुदर मिलाफ श्री शेठजींच्या जीवनात दिसून येईल सर्वसामान्य लोकाची समजूत अशीच आहे की मास्तरानी शेठजीना फक्त तत्त्वज्ञान शिकविले परतु खुद्द शेठजी मात्र तसे समजत नाहीत त्याच्याच शब्दात सागावयाचे म्हणजे, “ माझ्या व्यावहारिक उत्कर्षासमुद्धा त्यानी केलेली माझी मानसिक उन्नतीच कारण झाली आहे ” यावरून एक गोष्ट सिद्ध होते की, तात्त्विक दृष्टीने असलेला कर्मसन्यास व्यावहारिक स्वरूपाच्या कर्तबगारीच्या विरुद्ध नाही ही सर्व कर्तबगारी करीत असताना श्री शेठजीना मोठमोठ्या अडचणींना व सकटाना तोड द्यावें लागले व्यावसायिक दृष्टीने त्याच्या जीवनात एक वेळ अशीहि आली होती कीं, बाह्यत सर्वत्र निराशेचा काळोख पसरला होता व परिस्थिति सर्व तऱ्हेने अननुकूल होती परतु या बिकट परिस्थितीतदेखील त्याच्या चित्ताचा समतोलपणा अथवा भगवद्गीतोक्त ‘ साम्यावस्था ’ ढळली नाहीं, कारण त्याच्या चित्तात सद्गुरूनी प्रज्वलित केलेला ज्ञानदीप अखड प्रकाश देऊन निराशेचा काळोख दूर करीत होता, व या आत्मविश्वासाच्या जोरावरच ते यशस्वी झाले

---

१ शब्दजाल महारण्य चित्तभ्रमणकारणम् । अत प्रयत्नाज्ज्ञातव्य तत्त्वज्ञात्तत्त्वमात्मन ॥ ६२ ॥
अविज्ञाते परे तत्त्वे शास्त्राधीतिस्तु निष्फला । विज्ञातेऽपि परे तत्त्वे शास्त्राधीतिस्तु निष्फला ॥ ६१ ॥
—विवेकचूडामणि ( श्रीशकराचार्यकृत )

" ज्ञानदीपिका उजळली । नाही चिंतेची काजळी । "

मास्तरसाहेबानी शेठजीस आणखी एक महत्त्वाची गोष्ट शिकविली ती म्हणजे स्वत विचार करण्याची कला " मास्तरसाहेब याची शिकविण्याची पद्धति मोठी मार्मिक असे कोणतीहि गोष्ट नीट व नि शक रीतीने ते शिकवीत निरनिराळे प्रश्न मुलापुढे माडून त्याची उत्तरे त्यान्याकडून ते काढून घेण्याचा प्रयत्न करीत प्रश्नोत्तरात्मक अशी त्याची शिकविण्याची पद्धति होती ही पद्धति फार उपयुक्त व महत्त्वाची आहे असे तज्ज्ञ मानतात आपणच सर्व ज्ञान शिष्यासमोर ओतण्याऐवजी त्यान्या बुद्धीस, त्यान्या जिज्ञासेस, विचारशक्तीस जागृत करणे हे अत्यत महत्त्वाचे आहे विद्यार्थ्यान्या सुप्त मनोवृत्ति व बुद्धिशक्ति जागृत करणे हे शिक्षकाचे फार आवश्यक असे कर्तव्य होय मास्तरसाहेब हेच कार्य करीत असत ज्ञानाची निश्चितता असणे हें त्यान्या शिकवणुकीचे पहिले महत्त्वाचे अग "[1] विचारविरहित वाचनास मास्तरसाहेब मुळीच किंमत देत नसत त्यानी शेठजीस स्वत विचार करावयास लावले, प्रत्येक तात्त्विक प्रश्नावर स्वत विचार करावयास शिकविले यामुळेच श्री शेठजीचे तत्त्वज्ञान अद्वैत वेदान्तर्गत स्वत ची प्रक्रिया आहे, व ही प्रक्रिया स्वत न्या आनुभविक दृष्टीवर आधारलेली आहे ती कोणत्याहि शास्त्रीय ग्रथामधून जशीन्या तशी घेतलेली नाही, इतके तिन्यात स्वत चे वैशिष्ट्य आहे विचारविरहित व अनुभवविरहित शास्त्राध्ययनाची मास्तरसाहेबाप्रमाणेच शेठजीनाहि मनापासून चीड आहे अर्थातच शास्त्राध्ययनास त्याचा विरोध नाही मात्र स्वत ची स्वतत्र विचारशक्ति यापायी गमाविणे त्याना पसत नाही स्वत चा निश्चित दृष्टिकोन असल्याशिवाय इतरान्या विचाराचे अथवा ग्रथाचे यथार्थ मूल्यमापन करता येत नाही व स्वत न्या निर्णयशक्तीन्या अभावी व्यक्तीची मते निरनिराळ्या दिशानी हेलकावे खाऊ लागतात परतु स्वत चा दृष्टिकोन ठाम झाल्यावर इतरान्या विचाराचा—मग ते व्यक्तीचे असोत अथवा ग्रथातील असोत—साधकबाधक रीतीने योग्य तो उपयोग होतो, स्वत चेच विचार योग्य का व त्याहून इतर विचार कोणत्या अशी योग्य होत व कोणत्या विशिष्ट अशी अयोग्य होत याची चिकित्सा सहज करता येते तात्त्विक विचाराच्या क्षेत्रात निव्वळ तर्कान्या साह्याने मते ठरविली जात नसतात प्रथम जीवनाकडे पाहण्याचा आपला विशिष्ट दृष्टिकोन असतो व यास अनुसरूनच आपण अनुकूल तर्क धुडीत असतो[2] अशा प्रकारे स्वत चा दृष्टिकोन श्री शेठजीना मिळताच मास्तराची कल्पक बुद्धि दुसऱ्या उपक्रमास लागली

चोपड्यास दर वर्षी रोकडबालाजीचा उत्सव होत असे याला त्यानी वार्षिक ज्ञानसत्राची जोड दिली, व या प्रसगी प्राचीन व अर्वाचीन सर्व तऱ्हेचे सुप्रसिद्ध विद्वान्, प्रोफेसर, पडित आणि शास्त्री याना एकत्र करून त्याच्या विचाराचा स्वत लाभ घेऊन चोपडे येथील जनतेसाहि तो दिला कर्मयोग, पूर्वमीमासेचे महत्त्व, अध्यात्मात नीतीचे स्थान, 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' इ मोठमोठ्या तात्त्विक

१ " कै सावळाराममास्तर—चरित्र, आठवणी व तत्त्वविचार " या ग्रथात श्री साने गुरुजीनी लिहिलेले मास्तरसाहेबाचें चरित्र पृ. ३

2 "Metaphysics is the finding of bad reasons for what we believe upon instinct"—F H Bradley in 'Appearance and Reality'

प्रश्नाची भवति न भवति या प्रसगीं होत असे अशा रीतीनें श्री शेठजीचे ज्ञानभाडार समृद्ध होऊ लागले, व स्वत च्या विचारसरणीची महत्ता त्याना पटू लागली, त्याचा तात्त्विक विचाराबद्दलचा आत्मविश्वास वाढू लागला, व जीवनाकडे बघण्याची आपणास एक अभिनव व मौलिक स्वरूपाची दृष्टि लाभली आहे असे त्याची मनोदेवता त्याना सागू लागली "परतु जे आपणास पटले, जे आपणास तारक व सुखप्रद वाटले, त्याचा प्रसार सर्वत्र व्हावा असे साहाजिक मास्तरसाहेब व शेटजी यास वाटू लागले "[1] भारतवर्ष म्हणजे तत्त्वज्ञानाचे माहेरघर तेव्हा या देशात तत्त्वज्ञानाच्या अध्ययनास व प्रचारास अनुकूल वातावरण निर्माण करणारी एकहि सस्था नसावी याहून मोठे दुर्भाग्य ते कोणते ? ही उणीव दूर करण्याच्या हेतूने त्यानी "ज्ञानपिपासा तृप्त करण्याची ही पाणपोई" सन १९१६ मध्ये उघडली[2] "शकराचार्याचा जो ज्ञानमार्ग हा सर्व तत्त्वज्ञानात श्रेष्ठ असा मार्ग आहे तत्त्वज्ञानाचे ते परिणतफळ आहे" असे जरी सस्थेच्या सस्थापकाचे मत असले तरी या सस्थेत सर्व तऱ्हेच्या दार्शनिक विचारास स्वातत्र्य असते, कोणावरहि कोणत्याहि तऱ्हेच्या विचाराचे दडपण टाकण्यात येत नाही हा या सस्थेचा इतरत्र क्वचितच दिसून येणारा मोठा विशेष होय या दृष्टीने धार्मिक व तात्त्विक क्षेत्रात आम्हा भारतीयाची फार प्राचीन काळापासून चालत आलेली उदारतेची परपरा ही सस्था पुढे चालवीत आहे, ही गोष्ट मोठी भूषणावह होय या सस्थेत श्री शेठजी दर आठवड्यातून एक दोन वेळा येऊन आपले विचार माडीत असतात, व अनेक प्रसगी त्यावर होणारी निरनिराळ्या प्रकारची टीका निमूटपणे सहन करतात, व या टीकाचे उत्तर शान्तपणे पुन आपला अनुभवावर आधारलेले विचार माडूनच देतात

## श्रीमंत प्रतापशेठजी यांचा तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोन

श्री शेठजींच्या तत्त्वज्ञानाकडे वळण्यापूर्वी त्याचा तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोन समजून घेतला पाहिजे म्हणजे त्यातील मर्म चटकन लक्षात येईल त्याच्या तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोनाची थोडीफार कल्पना आतापर्यतच्या विवेचनावरून आली असेल तथापि हा मुद्दा महत्त्वाचा असल्यामुळे याचे अधिक स्पष्टीकरण आवश्यक वाटते श्री शेठजींना तात्त्विक प्रश्नाकडे बघण्याचा हा दृष्टिकोन अथवा ही जिवत कला त्याचे गुरु श्री सावळाराम मास्तर यान्याकडून मिळाली आहे, व ती त्यानी उत्तम रीतीने आत्मसात करून घेतली आहे स्वत ची 'वैचारिक जागृति' हा या दृष्टिकोनाचा मूलभूत असा पाया आहे कै मास्तर साहेबाची विचारशक्ति जागृत होती त्याची बुद्धि अतिशय तीव्र असून गूढ स्वरूपाच्या तात्त्विक प्रश्नाच्या विश्लेषणात त्याचा हातखडा होता मोठमोठे तात्त्विक प्रश्न अथवा समस्या त्याच्यापुढे सतत खेळत असत, व या समस्याची अथवा प्रश्नाची उत्तरे ते हसत खेळत देत असत कोणत्याहि वादग्रस्त प्रश्नाचे मर्म चटकन त्याच्या लक्षात येई त्यावर ते स्वतत्र

१ कै सावळाराममास्तर–चरित्र, आठवणी व तत्त्वविचार" पृ ६

२ ही सस्था उघडली तेव्हा महाराष्ट्रातील प्रतिष्ठित लोकाकडून या उपक्रमाबद्दल बराच विरोध झाला, तथापि तो हिच्या सस्थापकाना आपल्या निश्चयापासून परावृत्त करू शकला नाही

आणि अभिनव पद्धतीचा प्रकाश टाकून त्याचें स्वरूप करतलामलकवत् करीत [1] श्री शेठजींना त्यांच्या शिष्याला 'प्रश्न विचारण्याची तरी अक्कल आहे' हे पाहून त्याना फार समाधान वाटे त्यांच्या शिष्यातील कुशाग्र बुद्धीचे हे लहानसे रोपटे बघून मास्तरानी त्याची योग्य ती जोपासना करून, त्याला खतपाणी देऊन त्याचा प्रचड वटवृक्ष केला, श्री शेटजीना स्वत विचार करण्याची, मोठमोठे तात्त्विक स्वरूपाचे कूट प्रश्न उपस्थित करून त्याना स्वतत्र रीत्या सोडविण्याची हातोटी अथवा कला त्यानी शिकविली हा त्याचा विशेष होय श्री शेटजी स्वत च विचार करीत असल्यामुळे त्यांच्या तत्त्वज्ञानात स्वत चे वैशिष्ट्य असलेली स्वतत्र अशी विचारसरणी दिसून येईल श्री शेठजीच्या प्रक्रियेत दृष्टीत भरण्याजोगे नावीन्य व चमत्कृति या गोष्टी सहज दिसून येण्यासारख्या आहेत श्री शेठजींचे तत्त्वज्ञान सिद्धान्तत शाकर अद्वैत तत्त्वज्ञानच आहे तथापि अद्वैतवेदान्तातील सिद्धान्त स्वीकारण्यात त्याची भूमिका थोडी निराळी आहे अद्वैतवेदान्ताला श्रुतीचा वरदहस्त लाभला आहे म्हणून, किंवा श्रीशकराचार्यासारख्या महान तत्त्ववेत्त्याचा या सिद्धान्ताला पाठिबा लाभला आहे म्हणूनच केवळ अद्वैततत्त्व त्याना मान्य आहे असे नसून त्यात प्रतिपादिलेले मुख्य सिद्धान्त त्यांच्या स्वानुभवात ततोतत उतरतात, त्यांच्या अत करणाची पकड घेतात, आणि बुद्धीचे पूर्ण समाधान करू शकतात, म्हणून ते त्याना मान्य आहे अद्वैतवेदान्तातील मूलभूत प्रमेयाना स्वीकारतांनाहि ते त्यातील युक्तिवाद जसाचा तसा न स्वीकारता त्यात आपल्या अनुभवाची व विचाराची भर घालतात, किंवा स्वत च्या विचारास अनुसरून मूळ युक्तिवादाला नवीन कलाटणी देतात

श्री शेठजींच्या तात्त्विक प्रक्रियेत विचारावर व विचाराने बुद्धीच्या पूर्ण समाधानावर विशेष भर दिलेला आढळून येईल [2] अद्वैत वेदान्तानुयायी असल्यामुळे शेठजी ज्ञानमार्गी आहेत मनुष्याच्या बुद्धींत एक दैवी अश असा आहे की ज्यामुळे मनुष्याच्या मनाला सर्व भौतिक

1 " Master Savalaram had an acute intelligence, and a flare for philosophical reasoning He could get at the real issues behind any controversial point He was a man of reason and perception (p 35) He had a very convincing way of resolving a problem He would analyse its implications, and show the very sources of misunderstanding and error which gave rise to it He could analyse as few can analyse He had a highly critical and analytic mind But with all his intellectual subtlety and nimbleness, he combined what can be called a clear Vision This made him a kind of an artist (p 45) Master Savalaram could remove the veil from the face of truth and enable others to have a peep at it " (p 46)—A life Sketch of Shrimant Pratapseth by Prof G R Malkani

२ हा विचार म्हणजे आत्मानात्मविचार, तत्त्व, अतत्त्व याचा विचार या विचाराचें महत्त्व श्रीतुकाराममहाराजानीं आपल्या अभगात दाखविले आहे उदा० " विचारावाचून । न पविजे समाधान ।। " " विचार नाहीं नर खर तो तैसा । वाहे ज्ञान पाठी भार लगड जैसा ।। "

अपरोक्षानुभूतीत श्रीशंकराचार्य म्हणतात " नोत्पद्यते विना ज्ञान विचारेणान्यसाधनै । यथा पदार्थभान हि प्रकाशेन विना क्वचित् ।। "

सुखसाधने प्राप्त असूनहि समाधान मिळत नाही[1] या असमाधानातच मनुष्याच्या आध्यात्मिक उन्नतीचे बीज असते कित्येक वेळा तर मनुष्याची ऐहिक सुखसाधनेच त्याचे असमाधान तीव्र करण्यास कारणीभूत होतात, व मनुष्याला याचा वीट येऊन तो याना लाथ मारून निघून जातो, व अंतिम तत्त्वाचा ठाव घेतल्याशिवाय त्यान्या बुद्धीला समाधान होत नाही, तिची तळमळ शान्त होत नाही[2] मानवी बुद्धीन्या या असमाधानाचे खरे स्वरूप ओळखून त्या बुद्धीचे पूर्ण समाधान कशा रीतीने होईल यावर शेठजीन्या तत्त्वज्ञानात बराच भर दिलेला आढळून येईल[3]

१ मानवी बुद्धीच्या या असमाधानास इंग्रजीत ‘ Divine discontent ’ म्हणतात

२ गौतमबुद्धाची पराकाष्ठेला पोचलेली तळमळ खालील श्लोकात चागलीच व्यक्त झाली आहे —

इहासने शुष्यतु मे शरीरं त्वगस्थिमांसं प्रलय च यातु ।
अप्राप्य बोधिं बहुकल्प दुर्लभा नेवासनात्कायमेतच्चलिष्यति ।।

३ त्याच्या ‘ तत्त्वज्ञानावरील व्याख्याना’तील खालील अवतरणें पाहा —

“ बुद्धीस सत्याच्या ज्ञानाविषयी इतकी तळमळ लागलेली दिसून येते कीं, तीव्र जिज्ञासूला त्यावाचून जेवणदेखील गोड वाटत नाही उदाहरणार्थ, बुद्धानीं राज्यत्याग, गृहत्याग केला, व तपश्चर्या करतानादेखील त्यानीं शरीराची पर्वा केली नाही यावरून सत्यज्ञान करून घेण्याचा प्रश्न त्याना किती जाचत होता, किती छळत होता, हें दिसून येईल सत्य जिज्ञासु हा बौद्धिक समाधानापेक्षा कोणत्याहि गोष्टीस अधिक किंमत देत नाहीं बौद्धिक असमाधानाच्या दु खामुळें त्याला मृत्यूचे दु खहि दु ख वाटत नाहीं बुद्धाना प्रत्यक्ष मृत्यूपेक्षाहि मृत्यूचा प्रश्न म्हणजे सत्याचा प्रश्न सोडविणें अधिक महत्त्वाचे वाटले मृत्यूचा प्रश्न सोडविताना प्रत्यक्ष मृत्यु येईपर्यंत देहाची त्यानीं पर्वा केली नाही यावरून त्याना मृत्यूपेक्षाहि बौद्धिक असमाधानाचे शल्य अधिक छळीत होते, हें उघड होतें जिज्ञासु याप्रमाणे बौद्धिक असमाधान स्थितीचें दु ख हें महद्दु ख समजतो ”

“ बुद्धीची जिज्ञासा नैसर्गिक आहे म्हणून तिला कोठें ना कोठें तरी समाधान मिळालेच पाहिजे . या जिज्ञासेचें उत्तर कोठें तरी असलेच पाहिजे ”

“ ‘ प्रथमग्रासे मक्षिकापात ’—असें दिसून येतें कीं, प्रथमदर्शनी बुद्धि विचार-व्यापार करताना ज्या गोष्टी गृहीत धरते त्या धरतानाच तिची चूक होते, व म्हणून तिचे पुढील सर्व विचार चुकतच जातात वास्तविक गोष्ट अशी आहे कीं, भेदयुक्त ज्ञान हे नैसर्गिक म्हणजे सत्य नाही, तें विचारव्यापाराचें फळ आहे आपण ते भेद मुळात म्हणजे नैसर्गिक किंवा सत्य आहेत असे समजतो आणि ह्या समजुतीमुळेच आपणास जगाचे किंवा जगातील वस्तूचें भेदयुक्त ज्ञान होते परतु हादेखील आपला नुसता समज आहे वास्तविक भेदयुक्त ज्ञान आपणास होत नाही ही समजूत जर पूर्णत अजिबात बदलली गेली तर बुद्धीलाच सत्याचें ज्ञान होईल सर्प बुद्धीमुळेच सर्प डोळ्यानी दिसतो वास्तविक सर्प तर तेथे नसतोच मग तो इंद्रियाना कसा दिसणार ? त्याच-प्रमाणें जगद्बुद्धि आहे तर जग दिसते, व त्याच ठिकाणी ब्रह्मबुद्धि झाली तर ब्रह्मच दिसावयास लागेल वस्तु-स्थिति अशी आहे कीं, जग हे इंद्रियास मुळी दिसतच नाहीं ते दिसतें असें वाटणें हा एक बुद्धीचा गैरसमज आहे, व त्या गैरसमजामुळेंच जग हे सत्य वाटतें सत्याचें खरें लक्षण बुद्धीच्या ध्यानात येत नाही म्हणून जग खरें आहे असें तिला वाटते सत्याचें वास्तविक लक्षण तिच्या ध्यानात आल्यावर मग तिला जग सत्य वाटणार नाहीं व इंद्रियानाहि दिसणार नाहीं, ब्रह्मच दिसेल ”—व्याख्यान तिसरे, पृ १५–२०

अद्वैतवेदान्ताचा मुख्य सिद्धान्त असा आहे कीं, आपणास जी काही प्राप्ति महत्प्रयासाने करून घ्यावयाची आहे ती एखाद्या अप्राप्त वस्तूची नसून ती नित्यप्राप्त वस्तूचीच प्राप्ति आहे, व जी निवृत्ति साधावयाची आहे ती खरोखरच अस्तित्वात असलेल्या वस्तूची नसून नित्यनिवृत्त-वास्तविक दृष्टीने कालत्रयात नसलेल्याचीच निवृत्ति करावयाची आहे यावर कोणास असे वाटण्याचा संभव आहे की, ही प्राप्ति कसली व ही निवृत्तीहि कसली ? कारण, व्यवहारात तर जी वस्तु आपणाजवळ नाही तीच मिळवावयाची असते, व जी वस्तु आपणाजवळ खरोखरच असते तीच अनिष्टकर असल्यास सोडावयाची असते याचे उत्तर हेच की, वेदान्तशास्त्राचा इतर शास्त्राहून सर्वात मोठा विशेष हाच की, ते आपणास नित्य उपलब्ध असलेला आपलाच खजिना ( जो आज अज्ञानामुळे असून नसल्यासारखा झाला आहे ) त्याचे ज्ञान देऊन आपल्या स्वाधीन करते, व जी ससारोपाधि कालत्रयात नाही, परतु स्वस्वरूपाच्या अज्ञानामुळे जिला आपण वास्तविक समजून बसलो आहोत तिची वरील ज्ञानानेच आत्यतिक निवृत्ति करते म्हणजे एका ज्ञानानेच दोन कामे साधतात, जे असून नसल्यासारखे झाले आहे तेच तत्त्वज्ञानामुळे मिळते असा व्यवहार होतो, व जे नसून बोकाडी बसले आहे तेच ज्ञानाने नाहींसे होते असा व्यवहार होतो येथे ज्ञान होणे व मिळणे एकच गोष्ट आहे, कारण नवीन काहीचमिळवावयाचे नाही, व खरोखरीच जे नसून असल्यासारखे झाले आहे, व आमच्या बोकाडी बसले आहे तेच घालवावयाचे आहे जे झालेच नाही अथवा मुळात जे नाहीच तेहि अनेक वेळा फारच उपद्रव देऊ शकते व महान् अनर्थ निर्माण करू शकते असते दोरी, आपण समजतो साप, असते सावली, आपण समजतो भूत, याच्या उलट प्रत्यक्ष आपल्या जिवलग मित्रासहि आपण डोळ्यानी पाहतो, परतु कोणी जर आधीच अशी विपरीत भावना करून दिली की, तुझा मित्र मेला व भूत झाला आहे, तर खरोखरीच्या जिवत मित्रापासूनहि आपण लाब पळतो व नको हे लचाड असे समजतों तद्वतच असते ब्रह्म, परतु विपर्यस्त बुद्धीमुळे आपण समजतो जग या सर्व गोष्टी शेठजी आपल्या रोजच्या साध्यासुध्या अनुभवाकडेच बोट दाखवून विपर्यस्त बुद्धि नाना तऱ्हेचे अनर्थ प्रत्यहीं कसे निर्माण करते, व या विपर्यस्त बुद्धीची परिणति तत्त्वबुद्धीत कशी करता येईल इ गोष्टी मोठ्या खुबीने पटवून देतात सहजावस्थेवर शेठजींचा विशेष भर, कारण जी वस्तु सहज असते तिचीच आपणास किंमत नसते जी गोष्ट अगदीं सहज आहे तीच एका अज्ञानामुळे किती अवघड होऊन बसली आहे या सहजनित्य उपलब्ध अनुभवाकडे पाहण्यास व त्याची खरी किंमत ओळखण्यास शेठजींचे तत्त्वज्ञान शिकविते प्रत्येकास स्वत च्या ब्रह्मस्वरूपाचा अनुभव तर सदोदित आहेच बुद्धीचे विपर्यास घालवून त्याच्याकडे पाहण्याची खरी दृष्टि म्हणजे तत्त्वदृष्टि आली की झाले काम यासाठीं व्याकरणाचे खोल अध्ययन नको, न्यायाची घटपटादि खटपट नको [1] चारी वेद व साही शास्त्रे याची सार्थकता एका ब्रह्मपदाकडे नेण्यातच आहे [2] सर्व शास्त्रामधून नेमके सारभूत तत्त्व काढण्याची कला अधिक महत्त्वाची आहे ‘ यत्सारभूत तदुपासितव्य ’ श्री शेठजी मोठे विद्वान पडित नाहीत त्याच्या ग्रथात पाडित्य दिसून येणार नाहीं

१ ‘ प्राप्ते सन्निहिते मरणे न हि न हि रक्षति डुकृञ् करणे ’ चर्पटपजरिकास्तोत्र (श्रीशकराचार्यविरचित) ‘ न लगे व्याकरणाची न्यायाची घटपटादि खटपट ती ॥ ’–मोरोपंत २ ‘ सर्वे वेदा यत्पदमामनन्ति । ’

तत्त्वज्ञानाविषयक व्याख्यानाच्या प्रास्ताविक स्वरूपाच्या निवेदनात ते स्वत च म्हणतात " माझा व्यवसाय व्यापाराविषयक असून वेदान्तशास्त्राचे माझे सागोपाग अध्ययन नाही त्यामुळे माझे व्याख्यानात वापरले गेलेले पारिभाषिक शब्द शास्त्रशुद्ध रीतीनेच वापरले गेले असतील असे सागता येत नाही " परतु शेठजींचे ग्रथ त्यान्या विशिष्ट अशा दृष्टिकोनाने शास्त्राचे मर्म नेमके ओळखतात आनुभविक दृष्टि त्यात ओतप्रोत भरलेली दिसून येईल अनेक ग्रथ पाडित्यप्रचुर असूनाहि अनुभवान्या दृष्टीने पूज्य असू शकतात १ अशा ग्रथाची तत्त्वजिज्ञासून्या दृष्टीने फारशी किंमत नसते पुष्कळ वेळा तार्किकतेचा अथवा पाडित्याचा बोजडपणाच तत्त्वदृष्टीचा लोप करण्यास कारणीभूत होतो पाडित्य मुळीच नसूनहि अनुभवाची तत्त्वदृष्टि पुरेपूर असू शकते अधिकाश सताच्या वाङ्मयाकडे या दृष्टीने बोट दाखविता येईल याचे कारण इतकेच की, पारमार्थिक सत्य जितके गहन तितकेच सरळ व सहज असते इग्रजींत म्हण आहे ना 'Nothing is simpler than truth' सत्याहून अधिक सरळ दुसरे काहींच नाहीं मात्र या सत्याला पाहण्याची दृष्टि पाहिजे ही दृष्टि पुस्तकी पाडित्यावर अवलबून नसते तसे

१ 'Our two philosophers (Master Sivalaram and Pratapseth) had no pretensions to any extensive study of the originals either They simply lacked the academic quality and the academic way Master Sivalaram could at least read and explain the less complicated and simpler Sanskrit texts He was more at home with the sense and the spirit of thought, where he yielded to none however learned he might be Pratapseth had no such pretensions But it was not part of their objective to teach through books They discounted too much book-learning It killed the spirit it is not the whole thing, or even the main thing No one can see the truth through books alone If books could achieve this all shastris would be seers and sages As it is, no-one expects such union of learning with vision In fact, greater the learning, less is the aptitude for that free dom of thought which seeks new ways of understanding the truth The shastris take pride in asserting that their shastras have exhausted all possible points of view, and that there is nothing new that could be formulated by them or by anyone else thinking on those lines They have put up an effective mantra for themselves and others of their kind against all originality and novelty of thought They get stuck up in the world and in tortuous argument, and do not seek a simpler and more direct approach to the truth How can books be a substitute for personal communication, a communication from a person who sees to one who aspires to see ? "—A Life-sketch of shrimant Pratapseth by prof G R Malkani, pp 13-14

" Too many technicalities and logical subtleties unnecessary I am one of those who believe that philosophy should be freed from unnecessary technicalities and made intelligible to all It should cease to become a purely academic affair, and descend into the life of the people Simplicity here, as perhaps nowhere else, is of the essence of truth Abstruseness in philosophy is a sin A philosopher also need not be very learned What is required of him is only a certain earnestness of mind and a capacity for thought The ideals of scholarship are different from the ideals of philosophic truth "

—Shri G R Malkani's Presidential Address at the XXIV Session of the Indian Philosophical Congress, Patna

असते तर सर्वच शास्त्राध्ययन करणारे 'द्रष्टे' या पदवीला पोचले असते श्री शेठजींच्या ग्रथात ही दृष्टि पदोपदी दिसून येईल पाडित्य-प्रदर्शन, तार्किक स्वरूपाच्या उलटसुलट कोट्या, अथवा इतर दार्शनिक सप्रदायाचे खडनमडन त्याच्या तात्त्विक ग्रथामध्ये दिसून येणार नाही मात्र त्यात अगदी सोप्या व सरळ भाषेत अनुभवाचे रोकडे बोल दिसून येतील त्यात बुद्धि-प्रदर्शनाकडे लक्ष नसून तत्त्वाविष्करणाकडे मुख्य कटाक्ष दिसून येईल, व आध्यात्मिक अनुभवावर मुख्य भर आढळून येईल हा अनुभव लोकाविलक्षण नसून रोजचा साधा अनुभवच त्याकडे पाहण्याची दृष्टि मात्र अभिनव स्वरूपाची असते ही दृष्टि म्हणजे तत्त्वदृष्टि अथवा तत्त्वज्ञान हिच्यामुळे हृदयातील सर्व सशयाचा उच्छेद होऊन मोक्ष करतलामलकवत् होतो, व जिज्ञासु कर्मबधापासून मुक्त होतो

काही लोक प्रकृतित च असे असतात की, तात्त्विक गोष्टीचा विचार करताना त्याना नाना प्रकारच्या तार्किक स्वरूपाच्या शकाकुशका भेडसावून सोडतात आणि दृष्टि वगैरे सब झूट बात असे त्याना वाटते अशा लोकाना त्याची स्वाभाविक मनोरचना लक्षात घेता दोष देण्यात अर्थ नाही अशा लोकासाठी 'खडन,' 'चित्सुखी,' 'अद्वैतसिद्धि' यासारखे तर्ककर्कश, प्रखर प्रक्रिया ग्रथ आहेतच 'खडना'पुढे तर चागल्या चागल्या तार्किकाचीदेखील मति कुठित होते या ग्रथाचे आजपर्यत कोणासहि खडन करता आले नाही शेठजी या सर्व भानगडीत पडत नाहीत अद्वैतवेदान्तातील मुख्य प्रमेय अधिकाशी गृहीत धरून ते आपल्या रोजच्या अनुभवात कसे उतरतील, त्यापासून आपले जीवन आमूलाग्र कसे पालटू शकेल इकडेच त्याचे विशेषत लक्ष असते यासाठी ते अगदी सुटसुटीत व गुतागुत नसलेली प्रक्रिया दाखवितात त्याच्या प्रक्रियेस जवळची पाऊल वाट म्हणता येईल ती इकडे तिकडे वळसे न घेता सरळ मूळ तत्त्वाप्रत नेऊन पोचविते, हे तिचे मुख्य वैशिष्ट्य होय

शेठजीच्या दार्शनिक प्रक्रियेचा आणखी एक विशेष दाखवून या मुद्याचा उपसहार करू आपल्या आजीवन चालू राहणाऱ्या तत्त्वज्ञानाच्या साधनेंत ज्या मार्गाचा अवलब श्री सावळाराम मास्तरसाहेबानी स्वत केला, व आपल्या शिष्यासहि ज्या मार्गात प्रवृत्त केले त्या मार्गाचे स्वरूप श्रीमद्भगवद्गीतेत सागितल्याप्रमाणे 'तो (ज्ञानी) व्यावहारिक दृष्टीने कर्मात गढून गेला तरी (परमार्थत) काहीच करीत नाही[1]'—हे होय श्रीएकनाथमहाराजानी व त्याच्या गुरूनीहि याच मार्गाचा अवलब केला होता "कर्म करूनि अकर्ता तोचि अकर्तात्मबोधु जाला देता। देही असोनि विदेहता। तेही तत्त्वता आकळिली॥ गृहाश्रमू न साडिता। कर्मरेखा नोलाडिता। निज व्यापारी वर्तता। बोधू सर्वथा न मैळे।" —एकनाथी भागवत, ३-९-४३४-५

या मार्गात सायास लागत नाहींत, वनान्तरा जाण्याचे कारण उरत नाही, फलप्राप्तींत मात्र कोणत्याहि तऱ्हेची न्यूनता नाहीं, श्रीतुकोबारायाच्या शब्दात 'सुखे येतो घरा नारायण'[2]

१ "कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति स" ॥ ४—२०, गेला गढूनि कर्मात तरी काहीं करीचिना ॥"—आचार्य विनोबा–गीताई

२ "ज्ञानसमकालमुक्तः कैवल्यं याति हतशोक ॥"

अद्वैत वेदान्ताचे मुख्य तात्पर्य आत्मज्ञानात आहे[1] ते सपादन केल्यावर अथवा करीत असताना-देखील कर्में करण्यास या शास्त्राचा यत्किंचित्‌देखील विरोध नाहीं श्रीविद्यारण्य स्वामींनी याच आशयाने पचदशींत स्पष्टपणे म्हटले आहे की, दृढबोध झाल्यावर पाहिजे तर तर्क शिका, अथवा शेती करा[2] कर्म स्वत अविद्याकार्य असल्यामुळे ते अविद्येला घालवून मोक्ष सपादन करण्याच्या कामीं असमर्थ होय, अविद्या विरोधी जे ज्ञान त्यानेच मोक्ष मिळणे शक्य आहे एवढेच अद्वैतवेदान्त-शास्त्राचे म्हणणे ज्ञान्याला कर्माचा विटाळहि होता कामा नये असे वेदान्तशास्त्र सागत नाही उलट ज्ञानी माणसाने काही केले तरी चालेल, इतका ज्ञानाचा महिमा वर्णिला आहे[3] सर्व विधि-निषेध अज्ञानी माणसासच असतात, ज्ञानी निस्त्रैगुण्य असतो[4] भगवतांनीदेखील अर्जुनास ही त्रिगुणातीत अवस्था सपादण्यास उपदेशिले[5] मात्र वरील विधानाचा खरा आशय ज्ञानी माणसाने वाटेल तसे करावे असा नसून ज्ञानाचा महिमा दाखविण्यात आहे मानवी विकासाच्या सर्वोच्च अवस्थेप्रत पोचलेला पुरुष भलतेसलते आचरण ठेवील ही कल्पनाच करवत नाही[6] लौकिक दृष्टीने कर्में करीत असतानादेखील ती ज्ञानी माणसास स्पर्श करीत नाहीत, कारण तत्त्वज्ञानाचा प्रभावच असा आहे की, शरीरेंद्रियांच्या योगाने होणाऱ्या कोणत्याहि कर्माचा परिणाम अत स्थिती-वर होत नाही 'पद्मपत्रमिवाम्भसा'-पाण्यातील कमलपत्राप्रमाणे तो अलिप्त राहतो ज्या मानाने उक्तबोध दृढ होत जाईल त्यामानाने ही अलिप्तता वाढत जाईल श्री शेठजींनी सुरुवातीपासूनच हा गुरूपदिष्ट मार्ग पत्करला, म्हणूनच त्यांच्या जीवनात प्रपच व परमार्थ या दोन्ही गोष्टींचा सुदर समन्वय दिसून येतो

## कांहीं पारिभाषिक शब्द

अद्वैतवेदान्तर्गत श्री शेठजींची स्वत ची स्वतत्र अशी प्रक्रिया आहे हे वर आम्ही सागितले आहे म्हणून त्यांच्या तत्त्वज्ञानात वापरण्यात आलेल्या पारिभाषिक शब्दाचा खुलासा सुरुवातीसच केलेला बरा

'अनुभव' व 'ज्ञान'—हे दोन शब्द शेठजींच्या तत्त्वज्ञानात महत्त्वाचे आहेत

---

१ "आत्मलाभात् न परो लाभ ।"

२ जनकादे कथ राज्यमिति चेद्दृढबोधत । तथा तवापि चेत्तर्कं पठ यद्वा कृषिं कुरु ॥

—पंचदशी, तृप्तिदीप, १३०

३ यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वाऽपि स इमाल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥

भगवद्गीता १८–१७

"नसे ज्यास अहभाव नसे बुद्धींत लिप्तता । मारी विश्व जरी सार न मारीचि न बाधिला ॥—गीताई

४ "निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधि को निषेध ।"

५ "निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।"

६ कै लोकमान्यांनीं 'गीतारहस्यां'त या विषयाचें बहारदार स्पष्टीकरण केले आहे

शेठजींच्या प्रक्रियेनुसार अनुभव ब्रह्माचाच पर्याय शब्द आहे अनुभव हा नेहमी अपरोक्षस्वरूप (प्रत्यक्ष) असतो, त्यात बुद्धीच्या कोणत्याहि प्रकारच्या कार्याची लुडबुड नसते, म्हणून तो परब्रह्मा-इतकाच शुद्ध असतो तो प्रत्येकास नित्य उपलब्ध असतो तो नव्याने मिळवावयाचा नसतो बुद्धीचे सर्व विचार व्यापार आणि बुद्धीने केलेले भेद या शुद्ध अनुभवावरच केलेले असतात व्यवहारात ही सरमिसळ अथवा हा परस्पराध्यास[1] इतका बेमालूम असतो की, तो सहज लक्षात येत नाहीं आपले बुद्धिविषयक कार्य वगळून जे शिल्लक राहते तेच अनुभवाचे स्वरूप होय ज्ञान बुद्धीच्या द्वारा होत असते व हे नेहमी अनुभवाचे अधिष्ठान घेऊन होत असते सर्व भेद उदा० द्रष्टा, दृश्य, दर्शनरूपत्रिपुट्यात्मक भेद बुद्धीमुळेच उत्पन्न होत असतात व ते अनुभवावरच आधारलेले असतात म्हणून ज्ञान नेहमी परोक्ष-स्वरूपच असते यामुळे शेठजी ज्ञानात परोक्ष आणि अपरोक्ष असे भेद करीत नाहीत त्यांच्या मते अनुभवच काय तो अपरोक्ष ज्ञानमात्र परोक्ष असते हा या प्रक्रियेतील महत्त्वाचा विशेष लक्षात घेतला पाहिजे

केवल इद्रिये व बुद्धिविशिष्ट इद्रिये—आपणास पाच ज्ञानेद्रिये आहेत डोळे, कान, नाक, त्वचा व जिव्हा यांच्या द्वारा आपण पाहतो, ऐकतो, हुगतो, स्पर्श करतो व स्वाद घेतो. साधारणपणे आपण असे समजतो की, या इद्रियांच्या द्वारा आपण वर दाखविलेल्या क्रिया करतो परतु आपल्या या सुपरिचित अनुभवाचे विश्लेषण शेठजी निराळ्या तऱ्हेने करतात त्यांच्या मते वरील कामे आपण बुद्धिविशिष्ट इद्रियांच्या द्वारा करीत असतो, शुद्ध इद्रियांच्या द्वारा नव्हे शुद्ध इद्रियाना फक्त सत्ताच प्रत्यक्ष होत असते. बुद्धीला ही सत्ता कधीच प्रत्यक्ष होत नसते सत्ता म्हणजे 'अमुक आहे,' 'तमुक आहे' यात 'आहेपणा' हा सत्तेचा असतो व तो फक्त इद्रियानाच ग्रहण करता येतो हा बुद्धीला कधीच प्रत्यक्ष व्हावयाचा नाही याच्या उलट या शुद्ध सत्तेवर निरनिराळ्या प्रकारचे गुण उदा० रूप, रस, गध, शब्द, स्पर्श इ० बुद्धि आरोपित करीत असते व एकाच शुद्ध ब्रह्मस्वरूप सत्तेत नानात्वाचा आभास निर्माण करीत राहते बुद्धीचे हे गुण इद्रियाना कधीच कळावयाचे नाहीत, कारण इद्रिये फक्त सत्ताच ग्रहण करू शकतात आपणास त्या त्या ज्ञानेद्रियाने त्यांच्या त्यांच्या विषयाचे ज्ञान होते असे वाटते तेव्हा हे बुद्धिविशिष्ट इद्रियाचे काम असते, बुद्धिविरहित केवळ इद्रियाचे नव्हे बुद्धिविशिष्ट इद्रियात बुद्धीच्या व इद्रियांच्या कामाचे मिश्रण असते आपले डोळे उघडे असले, पण त्याशी बुद्धीचा सयोग नसेल तर समोर वस्तु असूनहि ती आपणास दिसत नाही याच्या उलट बुद्धि असली आणि इद्रियानी सत्ता ग्रहण करण्याचे काम केले नाही तरी आपणास विषयज्ञान होत नाही यावरून बुद्धि व इद्रिये यांची कामे निरनिराळी कशी आहेत हे लक्षात येण्यासारखे आहे शेठजींची दार्शनिक प्रक्रिया समजण्याचे कामी उक्त भेद लक्षात घेणे आवश्यक आहे

१. "आता सर्व जगतातच आत्मसरणी व विषयसरणी ह्या दोन्हींची भेसळ झाली आहे त्यामुळे सर्व जगाचें स्वरूप भूलभुलैय्याच्या खेळाप्रमाणे कसें भ्रामक आहे हे पाहणें फार बोधप्रद होईल आणि त्याच्यायोगाने जगाविषयींच्या, आपल्या स्वत विषयींच्या, तसेंच सत्याविषयींच्या सर्व प्रश्नाचा उलगडा उत्तम प्रकारें होऊन जाईल" शेठजींचीं तत्त्वज्ञानविषयक व्याख्यानें पृ. १९४

परोक्ष व अपरोक्ष—जे बुद्धीच्या मध्यस्थीने जाणिले जाते व जाणणाऱ्याहून निराळे असते ते परोक्ष जे इतर कशानेहि जाणले जात नसून स्वसंवेद्य, स्वप्रकाश असते ते अपरोक्ष जग हे परोक्ष आहे व 'मी' पदलक्ष्य म्हणजे शुद्ध 'मी' हा अनुभवस्वरूप असून अपरोक्ष आहे 'मी' कोणास कधीच परोक्ष नाही तो सदोदित अपरोक्षच असतो 'शुद्ध मी' व ब्रह्म एकच आहेत [१]

सापेक्ष व निरपेक्ष—ज्याच्या अस्तित्वाला स्वत हून दुसऱ्या पदार्थाची किंवा वस्तूची गरज लागते तो पदार्थ सापेक्ष होय ज्याच्या अस्तित्वाला स्वत हून इतर पदार्थाची जरूर लागत नाही तो पदार्थ निरपेक्ष होय

निरपेक्ष व वर्तमानकाल—खरे पाहू जाता काल हा एकच असून तो ब्रह्मरूप आहे परतु बुद्धि त्याच्याकडे भेदयुक्त दृष्टीने पाहते यामुळे एकाच काळाचे भूत, भविष्य व वर्तमान असे तीन विभाग झालेले दिसतात हे विभाग बुद्धीने केलेले असल्यामुळे वास्तविक नाहीत जेव्हा बुद्धीचे विचारव्यापार बद असतात तेव्हा अशा सहजस्थितीत वरील त्रिविध भेद दिसून येत नाहीत त्रिविध भेदविरहित जो शुद्ध काळ तोच निरपेक्ष वर्तमानकाल आहे, कारण त्यात बुद्धीच्या सापेक्षतेच्या अटी लागून भेद उत्पन्न झालेले नसतात शुद्ध काल परब्रह्मरूपच असतो [२] "निरपेक्ष वर्तमान हा ब्रह्माचाच पर्याय शब्द आहे"[३]

साक्षात्कार—इद्रियाना शुद्ध सत्ता अथवा परब्रह्मच कळत असते इद्रियाना दिसते त्याच अर्थाने जर बुद्धीला ज्ञान झाले तर त्यास साक्षात्कार म्हणावे इद्रियाना दिसत असलेली ब्रह्मरूप वस्तु व तिला ज्ञानाने दिलेला अर्थ म्हणजे दुजोरा या दोन्ही गोष्टी अनुभवात एक होतात तोच साक्षात्कार होय

काही एकार्थवाचक शब्द—'मी', 'आत्मा', 'परमात्मा', 'निसर्ग', 'विश्व', 'अपरोक्ष अनुभव', 'मूळवस्तु' 'वस्तु' हे सर्व शब्द परब्रह्म ह्या एकाच अर्थाने वापरले आहेत मात्र विषयप्रतिपादनाच्या ओघात सदर्भ-भेदाने निरनिराळ्या छटानी परमात्म्याचा निर्देश केलेला असल्यामुळे वरील निरनिराळे शब्द वापरण्यात आले आहेत [४]

बध—आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळे जगाविषयी व जगातील विषयाविषयी सत्यत्व बुद्धि असणे हाच बध

मोक्ष—शुद्धात्मस्वरूपाच्या ज्ञानामुळे साक्षात्काराची स्थिति प्राप्त होऊन अविद्याकृत बध नाहीसे होणे म्हणजे मोक्ष [५]

१ "अहशब्देन विख्यात एक एव स्थित पर —अह द्रष्टृतया सिद्धो देहो दृश्यतया स्थित ॥
—श्रीशकराचार्यकृत अपरोक्षानुभूति ३१–३२

२ "कालशब्देन निर्दिष्टोऽह्यखण्डानन्द अद्वय ॥"–अपरोक्षानुभूति–१११

३ श्री प्रतापशेठ यांची खाजगी टिपणवही भाग २, पृ १०१

४ "असख्यात नावे जया देत लोक । परी नित्य जो सच्चिदानन्द एक ॥"

५ या पारिभाषिक शब्दाचे स्पष्टीकरण खुद्द शेठजीनीच आपल्या 'तत्त्वज्ञानावरील व्याख्याना'च्या प्रास्ताविक स्वरूपाच्या 'निवेदनात' केले आहे त्याच्याच आधारे आमचे प्रस्तुतचे विवेचन आहे

श्री शेठजींच्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने वरील पारिभाषिक शब्दांचे महत्त्व फारच आहे या शब्दांचा अर्थ चांगल्या तऱ्हेने लक्षात आल्याखेरीज त्यांच्या प्रक्रियेचा उलगडा होणार नाही, हे तर खरेच, परंतु वरील शब्दांचा अर्थ उत्तम रीतीने लक्षात आला तर त्यांची सर्वच प्रक्रिया सूत्ररूपाने लक्षात आली असे म्हणावयास हरकत नाही वरील शब्द इतक्या सूचक अर्थाने भरलेले आहेत म्हणून पुढचा भाग वाचण्याच्यापूर्वी या पारिभाषिक शब्दांचे मर्म अंगी बाणणे आवश्यक आहे, ही सूचना पुनश्च एकदा देऊन पुढील मुद्द्याकडे वळतो

## आत्मस्वरूपाचा विचार : आत्मा म्हणजे सर्वांच्या परिचयाचा 'मी'

"ॐ नमोजी आद्या। वेदप्रतिपाद्या।
जय जय स्वसंवेद्या। आत्मरूपा॥"—ज्ञानेश्वरी १–१

वेदान्त शास्त्रात प्रथमत च 'संवित' किंवा 'अनुभूति' म्हणजे स्वरूपज्ञान (जन्य-वृत्तिरूप ज्ञान नव्हे) याची स्वप्रकाशता सिद्ध करून ही स्वप्रकाश, ज्ञानस्वरूप वस्तु आत्माच आहे हे दाखविले जाते नंतर त्याचे सत् व आनंदरूप दाखवून सच्चिदानंदरूप परब्रह्माशी त्याचे ऐक्य प्रस्थापित करण्यात येते श्रीज्ञानेश्वर माउलीने उपनिषद्गम्य परब्रह्मस्वरूप जो ॐकार त्याचे स्वप्रकाश आत्म्याशी ऐक्य दाखवूनच आपल्या सुप्रसिद्ध ज्ञानेश्वरीचा प्रारंभ केला आहे या तत्त्वचिंतनरूप मंगलाचरणापासून या तात्त्विक ग्रंथाचा प्रारंभ होणे सर्वथा उचितच वाटते श्री चित्सुखाचार्य अनुभूतीच्या स्वप्रकाशत्वाच्या सिद्धीपासून आपल्या 'तत्त्वप्रदीपिका'–चित्सुखी नावाच्या ग्रंथास प्रारंभ करून आत्म्याचे स्वप्रकाशत्व सिद्ध करतात श्री पंचदशीकार 'संवित्'ची एकरूपता व तिचे स्वयंप्रकाशत्व सिद्ध करून, त्याच युक्त्यांचा आत्म्यात अतिदेश करतात, व लगेच स्वप्रकाश परमप्रेमास्पद आत्म्याचे सच्चिदानंदरूप परब्रह्माशी ऐक्य श्रुतीने व युक्तीने सिद्ध करतात भारतीय दार्शनिक वाङ्मयात मंगलाचरणाचे फार महत्त्व आहे मंगलाचरणावरून त्या त्या ग्रंथाचे स्वरूप चटकन लक्षात येते, व त्यातील प्रतिपाद्य विषयाची कल्पना येते कित्येकदा तर संपूर्ण ग्रंथच सूत्ररूप आद्यश्लोकावर भाष्य या स्वरूपाचा असतो श्री शेठजींच्या तात्त्विक ग्रंथाचे मंगल या दृष्टीने लक्षात घेण्याजोगे आहे 'जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप' याचे मंगल असे आहे —

"श्रीगणेशाप्रति। करितो नमन यथामति। जो असे आत्मज्योति। माझीचिया॥१॥
नमुनी सद्गुरुदेवा। आणिक सर्वही भूदेवा। ज्याचेपासुनी घ्यावा। आत्मबोध॥२॥"

श्री शेठजींनी या मंगलाचरणात पहिल्या ओवीत परंपरेस अनुसरून श्रीगणेशाचे वंदन केले असले तरी त्याचे खरे स्वरूप 'जो असे आत्मज्योति। माझीचिया' या रूपाने दाखविले आहे आपल्या आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळे श्रीगणेश निराळा वाटत असला तरी त्याचे खरे स्वरूप आपल्या

आत्मस्वरूपाहून निराळे नाहीं अनादि अविद्येचे कार्य जी बुद्धि ती अद्वैतात (अद्वैत आत्मस्वरूपात) द्वैताभास किंवा नानात्वाचा आभास निर्माण करीत असते[1] एका आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळेच सर्व अनर्थ निर्माण होतात म्हणून आत्मज्ञान संपादन करून सर्व अनर्थाची त्यांच्या मुळासकट (अविद्येसहित) निवृत्ति करणे हीच मनुष्यजीवनाची इतिकर्तव्यता होय हाच परमपुरुषार्थ होय म्हणून दुसऱ्या ओवींत श्री शेठजी 'आत्मबोधा'वर भर देतात 'आत्मलाभात् न परो लाभ' असे शास्त्रवचन आहे याचा अर्थ असा की, आत्म्याच्या प्राप्तीहून अधिक मोठी प्राप्ति कोणतीच नाहीं आत्मा नित्यप्राप्त असल्यामुळे त्याचे ज्ञान हीच त्याची प्राप्ति आहे अज्ञान हेच सर्वात मोठे पाप आहे[2] कारण यामुळे आपण स्वत बद्दल भलत्यासलत्या कल्पना करून बसतो व उगाच दु ख भोगतो वस्तुत आपण सच्चिदानंदरूपच आहोत, परात्पर परब्रह्म तेच आपले खरे स्वरूप आहे

या सच्चिदानंदरूप, परब्रह्मस्वरूप आत्म्याचा उल्लेख श्री शेठजी आपल्या ग्रंथामध्ये सर्वांच्या परिचयाचा जो 'मी' त्याच्या द्वारे प्रामुख्याने करतात वर पारिभाषिक शब्दांच्या विवेचनात दाखविल्याप्रमाणे श्री शेठजी 'मी', 'आत्मा', 'परमात्मा', 'निसर्ग', 'विश्व', 'अपरोक्ष अनुभव' 'अनुभव', 'मूळ वस्तु', 'वस्तु' इत्यादि शब्द एकाच परमात्मवस्तूस उद्देशून संदर्भभेदाने निरनिराळ्या छटांनीं वापरीत असले तरी त्यांचा मुख्य भर 'मी'वर आहे त्यांचे तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ वाचणारास या 'मी'वर त्यांनी दिलेला भर सहज लक्षात येण्यासारखा आहे याचे एक कारण हे की, 'मी' हा सर्वांच्या परिचयाचा आहे सामान्य माणसास इतर शब्द कदाचित् ऐकूनहि माहीत नसतील, मग त्यांचे अर्थ कळणे तर दूरच राहिले मात्र 'मी'ची गोष्ट तशी नाहीं 'मी' कोणास माहीत नाहीं असे नाहीं, मग तो अज्ञानी असो की सज्ञान असो शिवाय, 'मी'बद्दल आपणापैकी प्रत्येकास जितका जिव्हाळा सहज असतो तितका आत्मा, ब्रह्म, संवित्, अनुभूति, इ० शब्दांबद्दल नसतो 'मी' या शब्दातील जादू इतर कोणत्याहि शब्दात नाहीं इतर सर्व शब्दांचे सार्थक 'मी'चे सामान्यरूपाने ज्ञात असलेले स्वरूपच अधिक विशद करण्यात असते 'मी'ला सोडून या शब्दांना फारशी किंमत उरणार नाही अद्वैतवेदान्ताची मोहिनी सर्व जगभर दिसून येते याचे कारण हेच कीं, हेच एक शास्त्र असे आहे जे परात्पर परब्रह्म दुसरे तिसरे कोणी नसून माझा 'मी'च आहे असे सांगते इतर दर्शने परमार्थ वस्तूत व जीवात भेद मानतात परब्रह्म कितीहि मोठे, मोठ्याहून मोठे असले, परंतु माझ्याहून निराळे असले तर प्रत्येकाच्या या 'मी'चा सुप्त मत्सर जागृत होऊन त्याचे आबट तोंड होईल 'मी' परमप्रेमास्पद आहे 'मी'बद्दल जितकी प्रीति स्वभावत च प्रत्येकास असते तितकी परब्रह्मावरहि असणे शक्य नाहीं ईश्वरावर अथवा परब्रह्मावर 'मी'चे असलेले प्रेम ईश्वरासाठीं अथवा परब्रह्मासाठीं नसून आत्म्यासाठीं

१ "स्वाज्ञानकल्पितजगत्परमेश्वरत्वजीवत्वभेदकलुषीकृतभूमभावा ।–स्वाभाविकस्वमहिमस्थितिरस्तमोहा प्रत्यक्चितिर्विजयते भुवनैकयोनि ॥"–संक्षेपशारीरक १–२

२ किं तेन न कृतं पापं चौरेणात्मापहारिणा । यो अन्यथासन्तमात्मानं अन्यथा प्रतिपद्यते ॥"

म्हणजेच 'मी'साठीं असते भगवान् याज्ञवल्क्यानीं ही गोष्ट अथवा हा शाश्वत सिद्धान्त आपल्या अमरवाणीच्या रूपाने बृहदारण्यक उपनिषदात ग्रथित करून ठेवला आहे [1] "हे मैत्रेयि, पतीसाठीं पत्नीला पति प्रिय होत नाहीं, तर स्वत साठी, आपल्या आत्म्यासाठी (म्हणजेच 'मी'साठी) पति प्रिय होतो त्याचप्रमाणे पत्नीसाठी पत्नी प्रिय होत नसून आत्म्यासाठी ती प्रिय होते पुत्रासाठी पुत्र प्रिय होत नाहीत, तर ते आत्म्यासाठी प्रिय होतात धनासाठी धन प्रिय होत नाही तर आत्म्यासाठी ते प्रिय होते देवाच्या प्रयोजनासाठी देव प्रिय होत नसून स्वत च्या प्रयोजनासाठी ते प्रिय होतात वेदासाठी वेद प्रिय होत नाहीत, तर आत्म्यासाठी वेद प्रिय होतात किंबहुना अगे मैत्रेयि, सर्वासाठी सर्व प्रिय होत नसून आत्म्यासाठीच सर्व प्रिय होत असते यास्तव सर्वात अधिक प्रिय असलेला हा आत्माच दर्शनार्ह आहे, तोच श्रवणार्ह आहे, तोच मननार्ह आहे व निदिध्यासनार्हहि तोच आहे हे मैत्रेयि, खरोखरच (या आत्म्याचे इतके माहात्म्य आहे की) आत्म्याला पाहिले असता, ऐकले असता, त्याचे मनन केले असता व त्याला विशेषत जाणले असता हे सर्व विदित होते" (जाणावयाचे काहीच शिल्लक राहत नाही कारण सर्वाचे तत्त्व हा आत्माच आहे)

'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति-' 'आत्म्यासाठीं सर्व प्रिय होते,' या विधानाचा रूढार्थ फारच विलक्षण होऊन बसला आहे मूळचा उदात्त व तात्त्विक अर्थ बाजूला राहून स्वार्थी वृत्ति दाखविण्यासाठीं याचा उपयोग केला जातो प्राध्यापक रा द रानडे यानीं आपल्या औपनिषद् दर्शनावरील ग्रथात या विपरीत अर्थाची दखल घेऊन या भ्रमाचे निराकरण केले आहे [2] वर दाखविल्याप्रमाणे श्री शेठजींच्या ग्रथामध्ये 'मी', 'मद्रूप' 'मदर्थ' या शब्दावर विशेष भर दिलेला आढळून येतो खरा तथापि हा 'मी' प्रथम पुरुष एकवचन या अर्थाचा, अहकाराने

---

१ "स होवाच न वा अरे पत्यु कामाय पति प्रियो भवत्यात्मनस्तु कामाय पति प्रियो भवति। न वा अरे जायायै कामाय जाया प्रिया भवत्यात्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति। न वा अरे पुत्राणा कामाय पुत्रा प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय पुत्रा प्रिया भवन्ति। न वा अरे वित्तस्य कामाय वित्त प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय वित्तं प्रियं भवति। न वा अरे देवाना कामाय देवा प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय देवा प्रिया भवन्ति। न वा अरे वेदाना कामाय वेदा प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय वेदा प्रिया भवन्ति। न वा अरे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति। आत्मा वा अरे द्रष्टव्य श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेय्यात्मनि खल्वरे दृष्टे श्रुते मते विज्ञात इद सर्वं विदितम।" बृहदारण्यकोपनिषद् ४-५-६

२ "It is important to remember that this passage is not to be interpreted in the interest of an egoistic theory of morals, *as some have done* (Italics ours), but only in the interest of the theory of Self-realization The word Atman forbids an egoistic interpretation We are thus obliged to interpret the word Atman throughout the passage in the sense of the Self-proper, the ultimate Reality"

—A Constructive Survey of Upanishadic Philosophy,

by Prof R D Ranade, P 304

लडबडलेला नसून तो 'मी' पदलक्ष्य शुद्ध 'मी' आहे, तो 'उत्तम पुरुष' नसून 'पुरुषोत्तम' आहे व्यवहारातले 'मी', 'तू' हे सर्व सापेक्षभाव श्री शेठजींच्या प्रक्रियेनुसार बुद्धिनिर्मित असून मिथ्या आहेत शुद्ध 'मी'ला याचा कालत्रयातहि स्पर्श नसतो 'मी' परब्रह्म, परमात्म तत्त्वच आहे हाच खरा 'मी' शेठजींना विवक्षित आहे अहकाररूप 'मी'ला शेठजी 'तोतया मी' म्हणून हेटाळतात [१] 'मी' अहकाररूप नाही, याबद्दल श्री शेठजी म्हणतात [२]

"'मी' अहकार नसे कधी।
हा तर केवळ अज्ञानाचा व्याधि।
'मी'ला लाविती दृश्यसबधी।
म्हणूनिया" ॥ १२० ॥

'मी'ला अहकार समजणे म्हणजे त्या खऱ्या 'मी'चा खून करणेच आहे, अशी कडक भाषा शेठजी वापरतात —

'मी' अपरोक्ष असून।
तया खोटी सापेक्षता लावून।[३]
'मी'चा करिती खून।
अहकार म्हणूनी" ॥ ११९ ॥

या अहवृत्तीचा उगम कसा व कोठे होतो या गोष्टीची कारणमीमासा शेठजींनी खालील ओवीत केली आहे —

अहवृत्ती ही सापेक्ष असे।[३]
विषयानुरोधे तिचे ज्ञान असे।
म्हणोनि तीही विषयरूप असे।
तया सापेक्षे विषया विषयता ॥ ३३ ॥

शेठजींना विवक्षित असलेला खरा 'मी' कसा आहे याबद्दल ते स्वत च लिहितात —

"आमच्या सर्व व्याख्यानामध्ये हेच 'मी' रूपी म्हणजे परमात्मरूपी तत्त्व सिद्ध करण्याचा आम्ही प्रयत्न केलेला आहे"[४] हा परब्रह्मस्वरूप 'मी' सर्वव्यापक आहे, सर्वदा अपरोक्ष आहे, किंबहुना एका 'मी' वाचून जगात दुसरा पदार्थच नाही 'साराश—'मी नाही' असे कोणालाच म्हणता येणार नाही व तो 'अपरोक्ष नाही' असेहि कोणाला म्हणता येणार नाही कारण जे जे पदार्थ आपल्या विचाराचे विषय होतात ते ते आपण नसतो असे सर्वच लोक समजतात, यावरून तो 'मी' परोक्ष नाही, हे उघड आहे मी हा अपरोक्ष असल्यामुळे त्याचे

---

१ श्री प्रतापशेठ याची खाजगी टिपणवही भाग २, पृ ९४

२ पाहा श्री प्रतापशेठजींचे 'जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप,' ओवी १२०

३ श्री प्रताप शेठजींचे 'जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप'

४ श्री प्रतापशेठजींची तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने पृ २३१

जोडीला दुसरा पदार्थ ठेविता येत नाही व 'मी' हा मर्यादारहित असल्यामुळे जगात दुसरा पदार्थच नाही व सर्व ठिकाणी 'मी' च 'मी' भरलेला आहे असे सिद्ध होते "

'मी' हा खरोखर पाहू जाता परमार्थ सत्य आहे, तो अहंकाररूप 'मी' हून अगदी निराळा आहे, या खऱ्या 'मी' चे अज्ञान हेच बंधन, व याचे ज्ञान हाच मोक्ष, याविषयी श्री शेठजी म्हणतात —'

' सत्य हा प्रत्येक वस्तूचा आत्मा असला पाहिजे आपल्यामध्ये अहंकार सोडून म्हणजे बुद्धिविशिष्ट 'मी' सोडून जो 'मी' आहे तोच[2] 'मी' सत्य होय, हे जाणले म्हणजे आपण मद्रूप म्हणजे सत्यस्वरूपच होऊन जाऊ असत्य असा पदार्थच राहणार नाही, मग "सर्वबंधै प्रमुच्यते" अशी आपली स्थिति होईल म्हणजे आपण जीवन्मुक्त होऊ '

या सत्यस्वरूप 'मी'ला शुद्धस्वरूपात पाहणे म्हणजे काय याबद्दल श्री शेठजी लिहितात – " 'मी'ला शुद्ध करून पाहणे म्हणजे 'मी'ला दुसरे कोणतेहि संस्कार लागू न देता तो जसा असेल तसाच्या तसाच अकृत्रिम स्थितीतच 'मी'ला पाहणे होय, आणि असा शुद्ध म्हणजे अहंकाररहित 'मी' हा तत्त्वबुद्धीला सहजस्थितीतच दिसून येईल हा 'मी'च शुद्ध स्वरूपात पाहिला म्हणजे तोच सर्वव्यापी आहे आणि तेच सत्य आहे म्हणजे सत्याचे स्वरूपच 'मी' आहे, अशी तत्त्वबुद्धीची खात्री होते "[3]

उक्त परमार्थ सत्याचे स्वरूप शास्त्रामध्ये शुद्ध, बुद्ध, नित्यमुक्त, अखंड, एकरस, अनाद्यनंत, दिक्कालाद्यनवच्छिन्न इत्यादि शब्दांनी सांगितले जाते श्री शेठजी त्याचे स्वरूप घरगुती सोप्या भाषेत खालीलप्रमाणे दाखवितात —' सत्य हे एकच एक म्हणजे एकमेवाद्वितीय असले पाहिजे व त्याच्या स्वरूपात बदल होता कामा नये ते दुःखरूप नसले पाहिजे ते अविनाशी असले पाहिजे ते सर्वकाळी, सर्वस्थळी व्यापक असले पाहिजे, म्हणजे ते अनंत असले पाहिजे ते आकाररहित असले पाहिजे म्हणजे परमाणुघटित नसले पाहिजे ते केवलस्वरूपी असले पाहिजे, ते स्वतःसिद्ध

१ वरील ग्रंथ पृ ९७

२ "आम्ही अहंकाराला 'मी' म्हणतो असे आम्हास लोक दूषण देतात, परंतु वास्तविक तसा प्रकार नसून, लोकच अज्ञानानें 'मी'ला अहंकार समजतात कारण 'मी' हा खरोखर अहंकार नसून तो आत्माच आहे, परंतु लोक अज्ञानामुळे दृश्य संसर्गाने त्याला कर्ता, भोक्ता समजतात "——श्री. प्रतापशेठजी यांची खाजगी टिपणवही भाग १, पृ, ६,७

' 'मी'ला सोडताच येत नाही या 'मी'च्या खाली आपणास जाताच येत नाही 'मी'ला सोडून दुसरे काहीं तत्त्व आहे असे मानताच येत नाही मात्र येथे हा 'मी' अहंकाररूप धरावयाचा नाही हा मी' सर्वांचाच आत्मा आहे त्यात हा अमक्याचा 'मी' आणि तो तमक्याचा 'मी' असा भेद नाही तो 'मी' सर्वांचे अविभाज्य सत्त्व आहे, तो केवळ सत्तारूप आहे, तो निरपेक्ष वर्तमान स्वरूपच आहे त्या वर्तमानात कालच राहत नाही या निरपेक्ष वर्तमानातील 'मी'लाच परमात्मा म्हणतात ५१ व्याख्याने पृ ८० (प्रतापशेठजींची)

३ श्री प्रतापशेठजींचीं तत्त्वज्ञानावरील व्याख्याने पृ. ८८.

व अकृत्रिम असले पाहिजे म्हणजे ते बनावट नसले पाहिजे ते कोणत्याहि साधनाने सिद्ध झालेले नसले पाहिजे, ते दुसऱ्या पदार्थाच्या सापेक्षतेने सिद्ध झालेले नसले पाहिजे, वगैरे वगैरे लक्षणाने युक्त असे असले पाहिजे "[1] हे सत्य म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून आपल्या सर्वांचा नित्यपरिचयाचा 'मी'च आहे, हे विसरता कामा नये,

शास्त्रकाराप्रमाणेच शेठजी अनुभवाचे व आत्म्याचे म्हणजे 'मी चे ऐक्य खालील शब्दात दाखवितात[2] —

"अनुभव हा समुद्रासारखा अमर्यादित आहे तो अनुभव आपल्या सर्वांचा व सर्व गुणाचा एकमेवाद्वितीय असे सारसर्वस्व आहे तो पूर्ण आहे सत्यरूप आहे सर्व ज्ञानाचा शेवट आहे ज्ञानाचा अवधि आहे सर्वज्ञान त्या अनुभवरूपी 'मी'मध्ये केंद्रीभूत होत असते "

[3]"अनुभव फक्त आत्म्याचाच असतो अनुभव आत्मरूप आहे आणि आत्मा अनुभवरूप आहे आणि तो येणारा जाणारा नसतो, तो सदोदित एकसारखा असतो आम्हास दुसऱ्या वस्तूचे जितके म्हणून येणारे जाणारे अनुभव येतात त्यात अनुभव हा आत्म्याचाच असतो परंतु दुसऱ्या वस्तूचे ज्ञान येणारें जाणारे असल्यामुळे अनुभव देखील जातो येतो असे आपण समजतो मात्र "

भामतीकारानी वरील गोष्टच (म्हणजे अनुभव येणारा जाणारा नाही ही गोष्ट) 'अनागतुकप्रकाश' या सुदर शब्दानी व्यक्त केली आहे[4] आगतुक म्हणजे नेहमी न राहणारा, अनित्य, नैसर्गिक नसणारा यांच्या उलट अनागतुक म्हणजे स्वाभाविक, सदोदित असणारा, कोणत्याहि बाह्य निमित्ताने न येणारा असा प्रकाश-विवक्षित आहे अनुभवाचा, साक्षीचा किंवा आत्म्याचा म्हणजेच 'मी'चा अनागतुक प्रकाश आहे म्हणूनच त्याला 'नित्यसाक्षात्कारत्व' आहे या स्वाभाविक अनागतुक प्रकाशत्वामुळेच साक्षीच्या नित्यसाक्षात्कारत्वाचे प्रत्याख्यान म्हणजे निषेध करता येत नाही

आता आपण शेठजींच्या शब्दातच 'मी'ची सच्चिदानंदरूपता पाहू 'मी' हा केवळ सत्तारूप आहे जगात 'आहे' 'आहे' हा सर्व व्यवहार 'मी'च्या सत्तेमुळे होतो 'मी' व 'सत्ता' हे दोन पदार्थ नाहींत मी हा शुद्धसत्तारूप आहे, हीच गोष्ट शेठजींनी खालील बहारदार ओव्यामध्ये सागितली आहे —[5]

'मी' 'ऐसा' न 'तैसा'।
'मी' 'वोखटा' न 'खासा'।
'मी' असे जगाचा तसा।
केवळ सत्तारूप ॥ २९ ॥

---

१ तोच ग्रंथ पृ ९४ २ तोच ग्रंथ पृ १०५ ३ तोच ग्रंथ पृ १३६

४ अस्य साक्षिण सदाऽसंदिग्धाविपरीतस्य नित्यसाक्षात्कारताऽनागन्तुकप्रकाशत्वे घटते "। भामती–२–२–२८

"नित्यसाक्षात्कारताऽनागन्तुकप्रकाशत्वे हेतु "।–वेदान्तकल्पतरु २–२–२८.

५ श्री प्रतापशेठजीकृत 'जग मिथ्या कीं पुरुषोत्तमरूप'

विषयाचा सबध इद्रियाशीं असे । इद्रियाशीं सत्ता ' मी 'ची असे ॥
म्हणूनि ' मी 'हून स्वतत्र नसे । बाह्य विषय ॥३०॥

सत्ता सर्व विश्वाची । ती असे ' मी ' स्वरूपाची ॥
म्हणोनि तियेचे स्वरूप ' मी ' हेचि । शक्य असे सर्वदा ॥१७८॥

' मी 'वाचूनि सत्तेशी । ठावो नसे दुजा तिशी ॥
तयाचे विभक्तपण बुद्धीशी । भावेना ॥१७९॥

याप्रमाणे ' मी 'चे सद्रूप दाखवून शेठजी पुढील ओव्यामध्ये ' मी 'ची चिद्रूपता दाखवितात, आणि सद्रूपता, चिद्रूपता व 'मी' याची अखड एकरसता त्याबरोबरच सिद्ध करतात [1]–

सत्ता आणि ' मी 'पण । अपरोक्षता आणि ज्ञान ॥
ही एकाच वस्तूची नावे जाण । निश्चयेसी ॥१८०॥

अपरोक्षता आणि ज्ञानवत्ता । ' मी 'पण आणि सत्ता ॥
तयामध्ये भेद घेऊ जाता । हातीं नये पुरुषोत्तम ॥१८१॥

' मी 'ची आनदरूपता तात्त्विक स्वरूपाच्या दृष्टीने शेठजींनी ' समाधान ' या शब्दाने व्यक्त केली आहे बाह्य सुखसाधने असूनहि मनुष्यास असमाधानाचे शल्य बेचैन करू शकते ही बेचैनी आत्मज्ञानाशिवाय नाहीशी होणे शक्य नाही वस्तुत विषयापासून मिळणारा क्षणिक आनद किंवा समाधान ' मी 'चेच असते अज्ञानामुळे आपण समजतो की हा आनद विषयापासून मिळत आहे विषयात खरोखरीच जर आनद असता तर त्यापासून तो नेहमीच मिळावयास हवा, उलट विषयोपभोगानतर त्याबद्दल एक प्रकारची ग्लानि उत्पन्न होते वेदान्तशास्त्राच्या दृष्टीने हिची उत्पत्ति अशी की, विषयोपभोग-कालात चित्त एकाग्र होते व ते सत्त्वगुणाचे कार्य असल्यामुळे त्यात आनदरूप आत्म्याचे प्रतिबिंब पडते व मनुष्यास आनदाचा अनुभव होतो अज्ञानामुळे या आनदाचे उगमस्थान मात्र आपण भलतेच समजतो व पुन्हा चित्तवृत्ति व्यग्र होताच आनद नाहीसा झाल्यावर त्या आनदासाठी विषयाकडे धाव घेतो याचे उलट ज्ञानी व योगी विषयापासून परावृत्त होऊनहि ज्ञानामुळे व योगामुळे आत्मस्वरूपाचा शुद्ध निर्भेळ आनद सारखाच अनुभवितात त्याचे समाधान कधीच भग पावत नाही या सर्व गोष्टी लक्षात घेऊन शेठजी 'मी'ची आनदरूपता प्रस्थापित करतात —

" समाधानाचे मुख्य स्थळ ' मी ' हेच होय ' मी ' हा समाधानरूपच आहे [2] " इतरत्र शेठजी म्हणतात,[3] " ज्या अर्थी आपला नाश आपणास कधीच भाववत नाही त्या अर्थी ' मी ' हा

१ जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप शिवाय पाहा खाजगी टिपणवही, भाग, १ पृ ४२ " ज्ञान ही वस्तु आत्मरूप आहे "

२ श्री प्रतापशेठजींची तत्त्वज्ञानावरील व्याख्याने, पृ ११७.

३ श्री प्रतापशेठ याची खाजगी टिपणवही, भाग २, पृ २१

सुखरूप असलाच पाहिजे 'मी' सुखरूप असल्यावाचून 'मी'चा नाश होऊ नये, अशी इच्छा झाली नसती यावरून आत्म्याचा आनद हा धर्म अगदी स्पष्ट आहे[1]।"

निस्सीम सुख हे आत्म्याचे सहज स्वरूप आहे, व दु ख हे बुद्धिविशिष्ट व सापेक्ष आहे याबद्दल शेठजी असे लिहितात[2] "आपण सुखस्वरूपच असतो त्या सुखाचे स्वरूप पाहिले असता ते इतके घनदाट, अमर्याद, निर्विषयक, केवलस्वरूप व इतके सहज असते, ते इतके सुखस्वरूप असते की ते आपल्या लक्षातहि येत नाही, व ते आपल्या बुद्धीचा विषयाहि होऊ शकत नाही दु खाचे स्वरूप बुद्धिविशिष्ट आहे म्हणून आपणाला जेव्हा दु ख होत असते त्या वेळेस हे सुख नाहीसे झालेले नसते उलट त्या सुखाच्या आधारावरच दु खाची प्रचीति आपणास होत असते मात्र अशा वेळी बुद्धि या सुखास आपल्या अटी लावून मर्यादित करते, व त्याला सापेक्ष रूप देते, व त्या सापेक्ष स्वरूपाला धरूनच आपणास दु ख वाटत असते हे बुद्धिविशिष्ट सुखाचे व दुःखाचे स्वरूप सापेक्ष आहे म्हणूनच आपणास दु खाचे ज्ञान होते आपल्या ज्ञानातून जर सापेक्षता अजिबात काढून टाकली व निस्सीम, निरपेक्ष, आनदघन अशा परमात्मस्वरूपालाच आपले ज्ञान साक्षात करीत राहिले तर आपणास दु ख असे कधीच भासणार नाही "

आतापर्यंत आपण शुद्धात्मस्वरूप 'मी'ची अनुभवरूपता व सच्चिदानदरूपता पाहिली आता याच 'मी'बद्दल निराळ्या दृष्टीने विचार करावयाचा आहे या 'मी'बद्दल कधीच कोणालाहि संदेह इ नसतो या आत्मस्वरूपाचा 'अनुभव' प्राणिमात्रास असतो 'मी नाही' असे कोणासहि कधीच वाटत नाही आता प्रश्न असा की या आत्मस्वरूपाचा अनुभव सदोदित आहेच, तर मग वेदान्तशास्त्र निरुपयोगी ठरेल या प्रश्नाचे उत्तर पुढील प्रतिपादनात द्यावयाचे आहे

## 'मी'ची निस्संदिग्धता, अपरोक्षता, स्वयंप्रकाशता इत्यादि

'मी'ला जाणू जाता। तो 'मी' न राही तत्त्वता।
नसे 'मी'ला जाणण्याची आवश्यकता। मीचि म्हणूनि[3] ॥ —श्रीज्ञानेश्वर महाराज

श्रीज्ञानेश्वर महाराजाची वरील ओवी वेदान्तशास्त्राच्या दृष्टीने फारच अर्थपूर्ण आहे या एकाच आपातत सरळ दिसणाऱ्या ओवीत आत्म्याची निस्संदिग्धता, त्याची अविषयता, आणि

१ श्रीशंकराचार्यांनी आत्म्याची परम प्रेमास्पदता खालील दोन श्लोकामध्ये दाखविली आहे—
पुत्रवित्तादयो भावा यस्य शेषतया प्रिया । द्रष्टा सर्वप्रियतम सोऽहमित्यवधारय ॥
परप्रेमास्पदतया मा न भूवमह सदा । भूयासमिति यो द्रष्टा सोऽहमित्यवधारय ॥
—वाक्यवृत्ति, २४, २५

२ श्री प्रतापशेठजी याची खाजगी टिपणवही, भाग २, पृ ७१–७२

३ श्री प्रतापशेठजी याच्या 'तत्त्वज्ञानावरील व्याख्याने' या ग्रथात ही ओवी तीनदा उद्धृत केलेली आहे श्री शेठजींची ही अतिशय आवडती ओवी आहे

स्वप्रकाशता थोडक्यात, सोप्या भाषेत फारच सुंदर रीतीने दाखविली आहे. शास्त्रकारांना या गोष्टीचे विवेचन करताना बरीच पाने चर्चा घालावी लागली आहेत. यापैकी पहिली गोष्ट म्हणजे आत्म्याची निस्संदिग्धता. 'मी आहे' याबद्दल कधींहि, कोणासहि 'मी आहे किंवा नाहीं' असा संदेह उद्भवतो का? अर्थात् नाहीं. जर कोणास तसा संदेह उद्भवला तर त्याचे डोके ठिकाणावर नाहीं असेच आपण समजतो. श्रीशंकराचार्य स्वात्मनिरूपणात एका सुंदर श्लोकात हीच गोष्ट लिहितात—

> "अस्ति स्वयमित्यस्मिन्नर्थे कस्यास्ति संशयः पुंसः ।
> अत्रापि संशयश्चेत् संशयिता यः स एव भवसि त्वम्" ॥ ४ ॥

म्हणजे आपण स्वतः आहोत या गोष्टीबद्दल कोणत्या माणसाला संशय असतो? अर्थात् कोणासहि तशा प्रकारचा संशय नसतो. समजा, यदाकदाचित् तसा संशय उद्भवलाच तर त्यास असे सांगावे की, बाबा रे, हा संशय घेणाराच तू आहेस. जर आपणा स्वतःबद्दल संशयच संभवत नाही तर 'मी नाहीं' असा विपर्यास तरी कसा संभवेल? किंवा मी नाहींच असे निश्चयात्मक ज्ञान तरी कसे शक्य होईल[१]? व्यवहारात आपण असे पाहतो की ज्या एखाद्या गोष्टीबद्दल आपणास संशय, विपर्यय (भ्रम) किंवा विरुद्धनिश्चय यापैकीं एकहि गोष्ट नसते त्या गोष्टीचे आपणास पुरेपूर निश्चयात्मक ज्ञान असते. आत्म्याबद्दल यापैकीं एकहि गोष्ट (संदेहादि) संभवत नसल्यामुळे आत्म्याबद्दल प्रत्येकास निस्संदिग्ध ज्ञान असते, हे निर्विवाद होय. भामतीकार म्हणतात,[२] "प्रमाता इतर वस्तूबद्दल संदेह घेत असला तरी स्वतःबद्दल असंदिग्ध असतो, बाह्यविषयाबद्दल भ्रमात पडत असला तरी स्वतःबद्दल अभ्रांत असतो, अप्रत्यक्ष विषयाबद्दल अनुमानादि करीत असला तरी स्वतः नेहमी अपरोक्षच असतो. त्याला स्वतःचे परोक्ष ज्ञान कधीच नसते. दुसऱ्या वस्तूचे स्मरण करीत असला तरी स्वतःचे तो स्मरण कधीच करीत नाही, कारण त्यास स्वतःचा नेहमी अनुभवच असतो, मग स्मरणाची काय जरूर? ही स्थिति एखाद्दुसऱ्या व्यक्तीची नसून प्राणिमात्राची आहे. आत्मा सदोदित असंदिग्ध असतो, त्याबद्दल संदेह येणे कधीच शक्य नाहीं--या हेतूने आत्म्याची

(अ) १ "'तथा हि बृहत्त्वाद्बृंहणत्वाद्वाऽऽत्मैव ब्रह्मेति गीयते,' स चायमाकीटपतङ्गेभ्य आचदेवर्षिभ्यः प्राणभृन्मात्रस्येदङ्कारास्पदेभ्यो देहेन्द्रियमनोबुद्धिविषयेभ्यो विवेकेन 'अहं' इत्यसंदिग्धाविपर्यस्तापरोक्षानुभवसिद्ध इति न जिज्ञासास्पदम्। न हि जातु कश्चिदत्र संदिग्धेऽहं वा नाहं वेति, नच विपर्यस्यति, नाहमेवेति।"

—भामती, १-१-१

(ब) "प्रसिद्धिरात्मनोऽस्त्यस्य न कस्यापि च दृश्यते। प्रत्ययो नाहमस्मीति न ह्यस्ति प्रत्यगात्मनि ॥"

--श्रीशंकराचार्यकृत सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह, ४७४

(क) "यत्र जिज्ञासो संशयविपर्ययव्यतिरेकप्रमाणामन्यतममपि नास्ति तत्र तद्विरोधिज्ञानमिति सर्वत्र दृष्टम्। अन्यथा त्रितयान्यतमापत्ते। आत्मनि चाहं वा नाहं वेति न कस्यचित्संशयः, नापि नाहमिति विपर्ययो व्यतिरेकः प्रमा वेति तत्स्वरूपप्रमा सर्वदाऽस्तीति वाच्यः तस्य सर्वसंशयविपर्ययधर्मित्वात्, "धर्म्यंशे सर्वमभ्रान्तं प्रकारे तु विपर्ययः" इति न्यायात्।

२ "प्रमाता संदिहानोऽप्यसंदिग्धो विपर्यस्यन्नप्यविपरीतः परोक्षमर्थमुत्प्रेक्षमाणोऽप्यपरोक्षः स्मरन्नप्यानुभविकः प्राणभृन्मात्रस्य" --भामती २-२-२८

सदा अपरोक्षता सिद्ध होते, कारण ज्या ज्या पदार्थाबद्दल ते आहेत किंवा नाही, असा सदेह सभवतो ते नित्य अपरोक्ष नसतात उदाहरणार्थ खुर्ची, टेबल इत्यादि पदार्थ तद्वतच आत्मा सदोदित अपरोक्ष आहे म्हणून तो स्वयप्रकाशहि असला पाहिजे, हेहि सिद्ध होते कारण जे पदार्थ सदोदित अपरोक्ष नसतात ते स्वयप्रकाशहि नसतात, असा आपला अनुभव आहे

आत्मा किंवा 'मी' नित्य अपरोक्ष किंवा स्वयप्रकाश आहे म्हणून त्याला प्रमाणाने सिद्ध करण्याची गरज नाहीं स्वत चा देह जाणण्यासाठीच जर अशा प्रमाणाची गरज लागत नाही तर सर्वान्च्या आतून आत ( अतरतम ) राहात असलेल्या आत्म्याला दुसऱ्या प्रमाणाने जाणण्याची जरूर काय[1] ? प्रमाता जर आधी असेल तरच प्रमेयाला जाणण्याच्या इच्छेने त्याची प्रमाणविषयक प्रवृत्ति सुरू होते, एरव्ही नाही, कारण स्वत स न जाणता कोणीहि विषयाला जाणण्यास प्रवृत्त होत नाही यावरून हे सिद्ध होते की आत्मा कोणाला कधीच अप्रसिद्ध नसतो[2]

आत्मा स्वयसिद्ध, स्वयप्रकाश, नित्य अपरोक्ष असल्यामुळे त्याला प्रमाणाची अपेक्षा नाहीं हे तर खरेच, परतु वार्तिककार याच्याहि पुढे जाऊन म्हणतात[3] की, आत्म्याच्या बाबतींत प्रमाण, अप्रमाण, भ्रम सर्व सारख्याच किंमतीचे आहेत, कारण प्रमाण अत करणाची वृत्ति आहे व वृत्ति जड आहे, म्हणून प्रमाण स्वप्रकाश स्वयज्योति आत्म्याचा प्रकाश तो काय करणार ? जो सर्वांचा विज्ञाता-जाणणारा त्याला कशाने जाणणार ? बरे, प्रमाणाने जितका आत्मा प्रकाशित होतो तितकाच तो भ्रम आणि अप्रमाण यान्च्याहि द्वारा होतो, कारण आत्मा सर्वांचा धर्मी आहे सर्व भ्रम, विपर्यास इ प्रकाराबद्दल असतात, धर्माविषयक ते केव्हाच नसतात

आपल्या रोजच्या साध्या अनुभवात आत्मा कसा प्रकाशतो हे बघण्यासारखे आहे 'मी हे जाणले' यात 'मी' अप्रकाशित राहून 'मी हे जाणले' असा व्यवहार होणे शक्य नाही[4] कारण यात 'मी' प्रकाशमान झाला नसता तर हे मी जाणले किंवा इतरानी, असा सशय उद्भवला

१ (अ) "यथा स्वदेहस्य परिच्छेदाय न प्रमाणान्तरापेक्षा तत अपि आत्मन अन्तरतमत्वात् तदवगतिं प्रति न प्रमाणान्तरापेक्षा" —श्रीशकराचार्यांचे गीताभाष्य, १८–५०

(आ) "न कस्यापि स्वसद्भावे प्रमाणमभिकाङ्क्ष्यते । प्रमाणाना च प्रामाण्य यन्मूल किं तु बोधयेत् ।।" —श्रीशंकराचार्यकृत सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह, ४७५

२ "आत्मन स्वत सिद्धत्वात् । सिद्धे हि आत्मनि प्रमातरि प्रमित्सो प्रमाणान्वेषणा भवति । न हि पूर्व इत्थं अह इति आत्मानमप्रमाय पश्चात् प्रमेयपरिच्छेदाय प्रवर्तते । न हि आत्मा नाम कस्यचिद् अप्रसिद्धो भवति ।" गीता–शाङ्करभाष्य, २–१८

३ "प्रमाणमप्रमाण च प्रमाभासस्तथैव च । कुर्वन्त्येव प्रमा यत्र तदसभावना कुत"
प्रमाभास सशय । स्वप्रकाशे सद्रूपे धर्मिणि प्रमाणाप्रमाणयोर्विशेषो नास्तीत्यर्थ ।
—मधुसूदनी गीता, २–१८.

४. "आत्मनोऽभासमानत्वे च घटज्ञान मयि जातं न वेत्यादि संशय स्यात्"
—उक्त ग्रथ, २–१८.

असता तसा संशय तर कोणास कधीच येत नाही यावरून प्रत्येक ज्ञानात 'मी' अवश्य प्रकाशतो, असेच मानले पाहिजे 'हे मी जाणले' यात 'हे' हा विषय होय, 'जाणले' ही ज्ञानक्रिया होय, आणि 'मी'चा या दोहोंशी संबंध असतो सर्वथा अप्रकाशित अशा 'मी'चा यान्याशी संबंध आहे असे म्हणता येणार नाही, कारण मग रामाने जाणले काय व गोविंदाने जाणले काय या दोन्ही गोष्टी सारख्याच होऊ लागतील यावरून साध्या दररोजच्या बाह्य विषयज्ञानामध्ये 'मी' प्रकाशित होत असतो हे सिद्ध होते

आता प्रश्न असा की, आत्मा सर्वांना सदोदित प्रकाशितच आहे, सर्वांना त्याचे ज्ञान आहे, तर मग सर्वच आत्मज्ञानी होऊ लागतील मग वेदान्तशास्त्राचे प्रयोजन काय ? वेदान्तशास्त्र व्यर्थ होऊ लागेल याचे उत्तर थोडक्यात असे की, वर दाखविलेले आत्म्याचे ज्ञान (अनुभव) अज्ञानविरोधी नाही ते अज्ञानाचे बाधक नसून साधकच आहे श्री शेठजी याला 'ते शेषशायी भगवानाप्रमाणे आहे' असे म्हणतात[1] शेषशायी भगवान अवतार धारण केल्याखेरीज दुष्टाचा वध करू शकत नाही, उलट त्या दुष्टाचा दुष्टपणा त्याच्या सत्तेमुळेच सिद्ध होत असतो, तद्वतच आत्म्याचे स्वरूपज्ञान अज्ञानाचा आश्रयहि असते व विषयहि असते[2], म्हणजे अज्ञान आत्म्याच्या आश्रयानेच राहते व त्यालाच आच्छादितहि करते मात्र वेदान्तशास्त्रामुळे उत्पन्न होणाऱ्या वृत्तीत उपारूढ होऊन तेच आत्मचैतन्य अज्ञानाचा उच्छेद करते याला उदाहरण म्हणजे, सामान्य स्वरूपाचा सूर्यप्रकाश, गवत, कापूस इ पदार्थांना न जाळता त्यांना प्रकाशितच करतो, परंतु तोच सूर्यप्रकाश सूर्यकान्तमण्याने केंद्रित होताच स्वभास्य जे गवत, कापूस इ पदार्थ त्यांना जाळून भस्म करतो तोच न्याय आत्म्याबद्दलहि लागू होतो म्हणून आत्म्याचे स्वप्रकाशत्वहि सिद्ध होते, व वेदान्त-शास्त्रालाहि वैयर्थ्य येत नाही[3]

आत्मा स्वप्रकाश आहे याचा अर्थ असा की, आत्मा अज्ञेय असतो,[4] म्हणजे तो दुसऱ्या ज्ञानाचाहि विषय होत नाही व स्वतःचाहि विषय होत नाही तो दुसऱ्या ज्ञानाचा विषय झाला तर खुर्ची, टेबल इ पदार्थांप्रमाणे जड होऊ लागेल शिवाय ते प्रकाशक ज्ञानहि दुसऱ्या

१ "सत्तारूप ब्रह्म हे 'रामाय स्वस्ति, रावणाय स्वस्ति' सारखे असते ते अज्ञानाचा नाश करू शकत नाही रावणाला मारण्याकरिता तर सापेक्षतारूपी रामाच्या अवताराचीच आवश्यकता आहे—" तत्त्वज्ञानावरील व्याख्याने, (प्रतापशेठजींची, पृ ७४)

२ आश्रयत्वविषयत्वभागिनी निर्विभागचितिरेव केवला— ॥ —संक्षेपशारीरक

३ ननु कथं चैतन्यं अज्ञानाश्रयः ? तस्य प्रकाशस्वरूपत्वात्, तयोश्च तमःप्रकाशवद्विरुद्धस्वभावत्वादिति चेन्न, अज्ञानविरोधि ज्ञानं हि न चैतन्यमात्रम्, किंतु वृत्तिप्रतिबिंबितं तच्च नाविद्याश्रयः, यच्चाविद्याश्रयः, तच्च नाज्ञानविरोधि। वृत्त्यवच्छेदेन तस्या एव अज्ञानविरोधित्वात्, स्वतस्तृणतूलादिभासकस्य सौरालोकस्य सूर्यकान्तावच्छेदेन स्वभास्य तृणतूलादिदाहकत्ववत् स्वतोऽविद्या तत्कार्यभासकस्य चैतन्यस्य वृत्त्यवच्छेदेन तद्दाहकत्वात् "–अद्वैतसिद्धि, पृ ५७७ "तृणादेर्भासिकाप्येषा सूर्यदीप्तिस्तृणं दहेत्। सूर्यकान्तमुपारुह्य तन्न्यायं तत्र योजयेत् ॥"

४ "न सावयव एकस्य नात्मा विषय इष्यते। अस्यास्मत्प्रत्ययार्थत्वादपरोक्षाच्च सर्वशः ॥—
सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रह, ४७३

ज्ञानाने प्रकाशित होत असल्यास दुसरे ज्ञान तिसऱ्या ज्ञानाने प्रकाशित होऊन ही परपरा कधीच न सपल्याने अनवस्था दोष येईल आत्मा स्वत चा विषय होऊ शकत नाही, कारण यात एकच आत्मा कर्ता व कर्म होऊन कर्तृकर्मविरोध हा दोष येतो म्हणून स्वप्रकाशत्वाची व्याख्या' 'अज्ञेय असून भासमान–प्रकाशमान असणे' अशी करण्यात आली आहे त्यावर अशी शका येणे शक्य आहे की, जर आत्मा सर्वथा अज्ञेय आहे तर वेदान्त शास्त्रानेच तो कळतो असे म्हणणे कसे सभवेल? तो फक्त उपनिषदानेच कळतो असे कसे म्हणता येईल? या शकेचे समाधान शास्त्रकारानी निरनिराळ्या तऱ्हेने केले आहे एक समाधान असे की, निरुपाधि शुद्ध आत्माच अज्ञेय आहे याचा अनुभव तत्त्वज्ञानकाळातच होणे शक्य आहे त्या वेळी तो ज्ञेय नसतोच मात्र वृत्ति या उपाधीने युक्त असलेला सोपाधिक आत्मा ज्ञेय आहे असे म्हणावयास हरकत नाही[2] याचा अर्थ असा की, जो ज्ञेय तो स्वप्रकाश नाही, जो स्वप्रकाश आहे तो ज्ञेय नाही. मात्र वृत्तीने सोपाधिकाचे ज्ञान शुद्धब्रह्म या स्वरूपाचेच होते वरील शकेचे दुसरे समाधान असे की, आत्मा ज्ञानाचा विषय होत नाही, याचा अर्थ तो वृत्तीचाहि विषय होत नाही, असे नाही नाही तर आपण त्याच्याबद्दल विचार तरी कसा करू? वृत्ति स्वत जड आहे "तुझिया प्रकाशामुळे। वृत्तीलागी ज्ञान कळे ॥"—(हसस्वामी) त्यामुळे ती आत्म्याचा प्रकाश करू शकत नाही, व आत्म्याच्या बाबतीत तसा प्रकाश करण्याची गरज पण नाही, कारण आत्मा स्वप्रकाश आहे मग वृत्तीचे प्रयोजन काय? वृत्तीचे प्रयोजन फक्त आत्मस्वरूपावरच्या अज्ञानरूप आवरणाचा भग करणे इतकेच होय आत्म्याचे स्वरूपज्ञान अज्ञानविरोधी नाही, ते अज्ञानाचे साधक आहे, हे वर दाखविलेच आहे हे अज्ञान वेदान्तशास्त्रापासून होणाऱ्या वृत्तीशिवाय जाणार नाही, म्हणून वेदान्तशास्त्रालाहि वैयर्थ्य येत नाही व आत्मा ज्ञानाचा अविषयहि राहतो यालाच शास्त्रकार असे म्हणतात की, आत्म्यात वृत्तिव्याप्ति आहे, फलव्याप्ति नाही[3] बाह्य पदार्थाच्या

१ 'अज्ञेयत्वे सति भासमानत्वं स्वप्रकाशत्वं इति निरुक्तम'। –कल्पतरु, २–२–२८ [ 'अवेद्यत्वे सति अपरोक्षव्यवहारयोग्यत्वम् स्वप्रकाशत्व' –अद्वैतसिद्धि ] 'इतराप्रकाश्यत्वे सविदविषयत्वे वा सति प्रकाशमानत्वम् –अद्वैतदीपिका

२ 'नच वेदान्तज्ञेयत्वाविरोध । निरुपाधेरज्ञेयत्वाद्वेदान्तजन्यवृत्त्युपाधा तज्ज्ञेयत्वमपीति ह्युक्त तत्र प्रस्मर्तव्यम —कल्पतरु, २–२–२८

"तथा च यदुपहित ज्ञेय न तत्स्वप्रकाशत्वेनेष्यते, यत्वनुपहित तथेष्यते न तज्ज्ञेयमिति नासभव इत्यर्थ।"
—परिमल, २–२–२८

३ "वृत्तिव्याप्यत्वमेवास्तु फलव्याप्ति कथ भवेत् । स्वप्रकाशस्वरूपत्वात्सिद्धत्वाच्च चिदात्मन"॥३५॥
—श्रीशकराचार्यकृत सदाचार

ब्रह्मण्यज्ञाननाशाय वृत्तिव्याप्तिरपेक्षिता ।
स्वयस्फुरणरूपत्वान्नाभास उपयुज्यते ॥ पचदशी, तृप्तिदीप, ९२
स्वप्रकाशोऽपि साक्ष्येव धीवृत्त्या व्याप्यतेऽन्यवत् ।
फलव्याप्यत्वमेवास्य शास्त्रकृद्भिर्निवारितम् ॥ —उक्तग्रथ, ९०

ज्ञानासाठी ते जड असल्यामुळे वृत्ति आणि प्रकाश ह्या दोहोंची गरज असते, परंतु स्वप्रकाश आत्म्याला प्रकाशाची गरज नाही त्याच्यावर असलेले अज्ञानाचे आवरण भंग झाले की झाले काम, कारण प्रकाशरूप तो स्वतःच आहे याच आशयाने 'सदाचाराच्या टीके'त हंसस्वामी म्हणतात

"तथापि फिटावया अज्ञान । वृत्तिव्याप्तीचे प्रयोजन । ऐसी वृत्तीची व्यापकता । बाध नसे अंगीकारिता । परी जीवरूपे जो प्रमाता । न लगे व्याप्तीसी ॥"

श्री शेठजींच्या निरनिराळ्या ग्रंथामध्ये वर उल्लेखिलेले मुद्दे सारग्राही रूपाने व सोप्या शब्दात पाहावयास सापडतील खालील अवतरणावरून त्याची थोडीफार कल्पना येईल —

प्राणिमात्रास 'मी'ची सहजच निस्संदिग्ध प्रतीति असते याबद्दल श्री शेठजी म्हणतात "मी हल्ली आहे की नाही याबद्दल बुद्धीलाहि शंका नाही कारण 'मी' आहे ही इतकी प्रत्यक्ष व सिद्ध वस्तु आहे कीं, तिचे अस्तित्वाबद्दल बुद्धीला कोणत्याहि प्रकारची शंका येणेच शक्य नाही 'मी'च्या अस्तित्वाबद्दल बुद्धीला शंका नसून त्या 'मी'ला जन्ममृत्यु वगैरे जे सापेक्ष गुण बुद्धीला वाटतात, त्याबद्दलचीच शंका बुद्धीला असते 'मी'च्या अस्तित्वाबद्दल नसते हे जन्ममृत्यु वगैरे सापेक्ष गुण दुसऱ्या अज, अमर वगैरे सापेक्ष गुणानेच नाहीसे करावयाचे असतात ते नाहीसे करण्याकरिता त्या 'मी'च्या स्वरूपाच्या अनुभवाची जरूरी नाही, कारण तो अनुभव म्हणजे आपण स्वतःच आहोत, आणि अनुभव बुद्धीमध्ये तर कधींच येणे शक्य नाही

"'मी' म्हणजे परमात्मा हा अपरोक्षस्वरूप व स्वयंसिद्ध असल्यामुळे बुद्धीच्या खात्री-करिता त्याची सिद्धि करीत बसण्याचे कारण नाही ती खात्री बुद्धीला आहेच आहे कारण 'मी' बुद्धीचा चालक आधी असल्याशिवाय बुद्धि काहीच करू शकत नाही, व तो 'मी' बुद्धीमध्ये कधी येणारहि नाही, कारण तेथे कर्तृकर्मविरोध येतो बुद्धीला शंका असते ती 'मी'च्या अज, अमरादि गुणाबद्दल असते ते अज, अमरादि गुण सापेक्षच असल्यामुळे त्याना अर्थ येण्याकरिता त्या गुणाना सापेक्ष असे जन्ममृत्यु आदि गुण त्यांच्या जोडीला ठेवूनच त्याना अर्थ आणावा लागतो, व 'मी' हा जन्ममृत्युवान् नसून अज, अमरच आहे असे सिद्ध झाले म्हणजे बुद्धीला समाधान होते व बुद्धीचे काम संपते [१]" अन्यत्र म्हणजे एका अप्रकाशित व्याख्यानात श्री शेठजी म्हणतात— "प्राणिमात्रास 'मी' आहे अशी जी निःशंक पुरेपूर खात्री असते ती कोणत्याहि कारणाने म्हणजे विचार करून असते असे नाही ही खात्री स्वरूपतःच, कोणत्याहि प्रकारचे बुद्धि वगैरे साधन न लावताच असते "'मी' हल्ली आहेच," हे विचाराने सिद्ध करण्याची जरूर नाही हा 'मी' विचारनिरपेक्ष, स्वतःसिद्ध या रूपाचा असतो, आणि स्वतःसिद्ध असल्यामुळेच तो ज्ञानाचा विषय होऊ शकत नाही व त्याला ज्ञानाचा विषय करण्याची काडीइतकीहि गरज पण नाही याचे कारण असे की, त्याला ज्ञानाचा विषय करू गेल्यास तो 'मी', 'मी' या स्वरूपाचा

१ श्री प्रतापशेठजींची तत्त्वज्ञानावरील व्याख्यानें, पृ ७७–७८

न राहता एखाद्या जड, दृश्य, अतएव काल्पनिक स्वरूपाचा होऊन जाईल किंबहुना त्याला विचारविषय करणेच अशक्य आहे याच कारणामुळे या 'मी'बद्दल 'हल्ली तर 'मी' आहे' परंतु भविष्यकाळात 'मी मरेन' अशीहि शंका उद्भवणे शक्य नाही ज्या प्रकारचे अस्तित्व (स्वयसिद्ध) या 'मी'चे आहे ते इतके निस्संदिग्ध आहे की, त्याबद्दल 'भूतकाळात तो होता किंवा नाही, आणि भविष्यकाळात तो राहील किंवा नाही' अशा प्रकारच्या संशयाला थोडा-देखील अवकाश नाही याचे कारण असे की, 'मी'च्या अस्तित्वाच्या सरणीमध्ये "'मी' पुढे राहील किंवा नाही" या शंकेबद्दलचा लवलेशहि नाही याशिवाय दुसरा पुरावा असा की, अशा प्रकारचा संशय घेणारा हाच तर तो 'मी' आहे, आणि ही गोष्ट लक्षात घेणे म्हणजेच 'मी'चे ज्ञान होय [१]"

प्रस्तुत स्थळी, या संदर्भात, आत्म्याच्या निस्संदिग्ध प्रतीतिविषयी विचार करीत असताना एका सुप्रसिद्ध पाश्चात्य दार्शनिकाच्या विचाराचे स्मरण झाल्यावाचून राहात नाही श्री शेठजींचे विचार या दार्शनिकापेक्षाहि अधिक मूलग्राही व पुढे गेलेले असल्यामुळे दोहोंची तुलना अप्रासंगिक होणार नाही किंबहुना या दोन विचारकांमध्ये हा जो महत्त्वाचा फरक दिसून येतो तो वेदान्त (अद्वैत)शास्त्राच्या गांभीर्यामुळे व खोलीमुळे आहे, असेहि म्हणावयास हरकत नाही आताच उल्लेखिलेला दार्शनिक डेकार्ट होय हा आधुनिक पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा आद्यप्रवर्तक समजला जातो ('Father of Modern Philosophy') डेकार्टची इच्छा आपल्या दार्शनिक प्रक्रियेची इमारत भरभक्कम पायावर उभारावयाची होती यासाठी त्याने सर्व रूढ विश्वासांना खो दिला आणि चिकित्सक पद्धतीच्या संशयाचा अवलंब केला (Critical doubt) ज्या ज्या गोष्टींबद्दल संशय घेणे शक्य आहे त्या सर्व गोष्टी त्याने संदिग्ध कोटीत ढकलल्या या गोष्टींमध्ये आपल्या जगत्‌विषयक ज्ञानाचा व त्या ज्ञानाच्या विषयाचा समावेश होतो अतींद्रिय, अलौकिक गोष्टींबद्दल तर संशयाच्या या प्राथमिक भूमिकेवरून बोलावयासच नको परंतु डेकार्ट खरा विचारक होता, नाश पावणाऱ्या संशयात्म्यांपैकी तो नव्हता[२] म्हणून त्याने संशयाच्या मर्यादा ओळखल्या भारतीय तत्त्वविचारकांनी फार प्राचीन काळापासून संशयाच्या मर्यादा ओळखल्या आहेत बृहदारण्यकोपनिषदात भगवान याज्ञवल्क्यांनी गार्गीला तिच्या प्रश्नाच्या मर्यादेचे अतिक्रमण होताच 'हे गार्गी, न्यायाला सोडून अतिप्रश्न करू नकोस,' असे रोखठोक बजावले[3] व नंतर गार्गी लगेच गप्प बसली श्रीउदयना-

१ वरील उतारा श्री शेठजींच्या तत्त्वज्ञानमंदिरात अलीकडे दिलेल्या अप्रकाशित व्याख्यानातून घेतला आहे मूळ व्याख्यान हिंदीत आहे त्याचा आम्ही वाचकांच्या सोयीसाठी मराठी अनुवाद केला आहे

२ अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति । नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥
—श्रीमद्भगवद्गीता ४०

३. स होवाच गार्गि माऽतिप्राक्षीर्मा ते मूर्धा व्यपप्तदनतिप्रश्न्यां वै देवतामतिपृच्छसि गार्गि माऽति प्राक्षीरिति ततो ह गार्गी वाचक्नव्युपरराम" —बृहदारण्यक, अ ३—६—१

चार्यांनी न्यायकुसुमांजलींत सर्व शंकांची शेवटली सीमा म्हणजे 'तर्क' आहे, असे सांगितले आहे, व तर्कमूलक व्याप्तीतहि कोणी शंका घेईल तर स्वक्रियाव्याघातरूप दोष येत असल्यामुळे शंकेला अवकाशच उरत नाहीं, असा पुढे निर्णय दिला[1] आधुनिक पाश्चात्य तत्त्वविचारक बर्ट्रंड रसेल ( Bertrand Russell ) यानेदेखील 'संशयाला तार्किक दृष्टीने काहीं मर्यादा हव्या' ही गोष्ट कबूल केली आहे[2] डेकार्टच्या चिकित्सक पद्धतीच्या संशयाबद्दल विचार करतानाच त्याने ही कबुली दिली आहे तात्पर्य असे कीं, सर्वंकष संशयाचा आश्रय घेणारा डेकार्टहि आपल्या संशयरूपी हत्याराचा इतरत्र विजयी प्रयोग करीत असताना एका अशा जागी येऊन थडकला की जेथे त्याचे संशयरूप हत्यार कुंठित झाले ते स्थळ म्हणजे 'मी' डेकार्टने असा विचार केला की, जगातील यच्चयावत् पदार्थांबद्दल संशय घेत असताना आपण विचार करतो ही गोष्ट निर्विवाद होय संशय, विपर्ययहि विचारात अंतर्भूत होतात म्हणून जितका अधिक मी संशयित होतो, तितकाच अधिक मी विचार करतो हेहि निश्चित होय, आणि त्याहूनहि अधिक निश्चयात्मक प्रतीति त्याच वेळी मला या विचारांच्या 'मी'रूप अधिष्ठानाची असते संशय किंवा विचारांच्या आधिक्यामुळे अधिष्ठानरूप 'मी'च्या अस्तित्वाचा प्रत्यय अधिकच दृढ होतो याप्रमाणे विचार करून डेकार्टने आपल्या तत्त्वविचाराचा आद्य किंवा मूलभूत सिद्धान्त 'मी विचार करतो, म्हणून मी आहे' हा ठरविला[3] या 'मी'ची प्रतीति अतिशय निस्संदिग्ध, स्पष्ट व अभ्रान्त आहे यावरून डेकार्टने स्पष्टता, स्फुटता, निस्संदिग्धता ही सत्याची कसोटी ठरविली[4] आम्हांस प्रस्तुत प्रसंगी श्री शेठजींच्या दृष्टिकोनातून 'मी विचार करतो, म्हणून मी आहे' या डेकार्टच्या विधानाचा विचार करावयाचा आहे या विधानाचा खरा अर्थ 'मी आहे म्हणून मी विचार करतो' असाच केला पाहिजे, याचे कारण असे कीं, 'मी' विचारावर अवलंबून नसून विचार मात्र सर्वस्वी 'मी'वर अवलंबून असतो 'मी' विचारावाचूनहि राहू शकतो, विचार मात्र 'मी'वाचून राहू शकत नाहीं 'मी' व्यापक आहे,

१ "व्याघातावधिराशङ्का तर्क शङ्कावधिर्मत" —न्यायकुसुमांजलि, ३-७

२ The methods of critical doubt, though Descartes himself applied it only half heartedly, was of great philosophic importance It is clear, as a matter of logic, that it can only yield positive results if scepticism is to stop somewhere "

—History of Western Philosophy by B Russell P 589

३ "While I wanted to think everything false, it must necessarily be that I who thought was something, and remarking that this truth, I think, therefore I am, was so solid and so certain that all the most extravagant suppositions of the sceptics were incapable of upsetting it, I judged that I could receive it without scruple as the first principle of the philosophy that I sought "

' The more I doubt, the more I think, and the more certain I am of my existence " —Rene Descartes

"This passage is the Kernel of Descarte's theory of Knowledge, and contains what is most important in his philosophy—" Comment on the above passage by B Russell in the History of Western Philosophy, P 586

४ "All things that we conceive very clearly and very distinctly are true "

विचार व्याप्य आहे याच दृष्टीने श्री शेठजी म्हणतात,—" आपले अस्तित्व म्हणजे आपणास 'मी' असे जे स्वसंवेद्यत्वाने वाटते ते शरीर आहे तर 'मी' आहे, शरीराच्या अभावी 'मी'हि नाही, ही आपली सर्वसामान्य समजूत आहे, आणि म्हणूनच आपण मरणास भीत असतो असा हा 'मी' शरीरावर तर अवलंबून नाहीच, परंतु उलट 'मी' च्या भानामुळेच शरीराचे किंवा दुसऱ्या कोणत्याहि वस्तूचे भान आपणास होते भान हे फक्त 'मी'लाच असते 'मी' व्यतिरिक्त इतर दृश्य, जड वस्तूला भान कुठले ? आणि भान हेच अस्तित्वाचे मूळ लक्षण होय आपणाला जे अस्तित्वाचे बुद्धि-व्यापार-रहित 'भान' आहे, ते आपण बुद्धीच्या योगाने शरीरास लावून देतो, आणि शरीर आहे तर भान आहे असा आपला विपरीत ग्रह होऊन बसतो बुद्धीला निरपेक्ष आत्मस्वरूपाचे ज्ञान होणे अशक्य असल्यामुळे शरीराव्यतिरिक्त किंवा शरीरक्रियेव्यतिरिक्त तिला 'केवळ' भानाचे ज्ञान होत नाही, म्हणून ती " आधी मी आहे तर मी विचार करू शकतो " असे न घेता " मी विचार करतो म्हणून मी आहे ", " मी खातो म्हणून मी आहे ", " मी अमुक अमुक क्रिया करतो म्हणून मी आहे " असा उलटा समज करून घेते [१] " श्री शेठजींनी डेकार्टचे कदाचित नावहि ऐकले नसेल तथापि त्यांच्या ग्रंथातील आम्ही चिन्हित केलेल्या वरील पंक्त्या डेकार्टच्या विधानाचा खरपूस समाचार घेणाऱ्या आहेत, हे खास 'मी'च्या सदोदित सर्वांना असणाऱ्या एक सारख्या अनुभवावरूनच 'मी'ची निस्संदिग्धता डेकार्ट व शेठजी दोघेहि ठरवितात तथापि दोघांच्या 'मी'बद्दलच्या बाकीच्या निष्कर्षांमध्ये महत्त्वाचा फरक आहे, हे वरील विवेचनावरून कोणाच्याहि लक्षात येईल परंतु हे विषयान्तर येथेच संपविलेले बरे

आता, 'मी' कोणत्याहि ज्ञानाचा विषय होत नाही याबद्दल शेठजी काय म्हणतात ते आपण त्यांच्याच शब्दात पाहू —

" आत्मस्वरूप हे कधीहि दृश्यसरणीत येणे शक्य नाही व म्हणूनच शास्त्रात ब्रह्माला अज्ञेय म्हटले आहे [२] "

" हा 'मी' सर्व भावाभावरूपी जगास विषय करू शकतो परंतु तो मात्र कोणाचाच विषय होऊ शकत नाही स्वत च्या ज्ञानाचाहि तो विषय होत नाही म्हणूनच त्यास अतिविलक्षण म्हणावयाचे तो बुद्धीच्या पूर्वी असतो म्हणून तो बुद्धीचा विषय होत नाही हा 'मी' ज्ञानाचा विषय होत नाही, म्हणून तो नाहीच असे मात्र म्हणता येत नाही, कारण मी हा स्वत च जाणीवस्वरूप, ज्ञानरूप, बोधरूप, अनुभवरूप असा स्वत सिद्ध पदार्थ आहे तो मी सदा अविलुप्तसाक्षित्व अशा अर्थाचा असतो 'मी' हा अनुभवाने असतोच [३] "

'मी'ची विलक्षणता —'मी' हा असा विलक्षण पदार्थ आहे की, तो विचाराचे आधी असल्यामुळे म्हणजे विचार करणारा असल्यामुळे तो आपल्या विचारात कधीच येणार नाही म्हणजे तो कधीच आपले विचाराचा विषय होणार नाही जर त्या 'मी'ला आपल्या विचाराचा विषय

१ श्री प्रतापशेठजी यांची खाजगी टिपणवही, भाग १, पृ. १–२

२ श्री प्रतापशेठजी यांचीं तत्त्वज्ञानविषयक व्याख्यानें, पृ १५

३ वर उल्लेखिलेला ग्रंथ, पृ. १०५.

करण्याचा प्रयत्न केला तर तो 'मी' 'मी' न राहता तो 'तू' होईल याकरिता तो विलक्षण पदार्थ आहे [१] "

'मी'ची अतिविलक्षणता —'मी' नुसता विलक्षणच आहे असे नसून तो अतिविलक्षणहि आहे, याबद्दल शेठजी लिहितात.—"आत्मसत्ता म्हणजे 'मी' इतर विषयाप्रमाणे विचाराचा विषय होत नसल्यामुळे तो विलक्षण पदार्थ आहे, हे तर ठीकच आहे, परतु त्याला अतिविलक्षण पदार्थ का म्हटले असा प्रश्न आहे त्याला उत्तर असे कीं, ज्या दोन पदार्थांमध्ये विलक्षणता असते, त्यात सत्ता एकच असते, आणि ते पदार्थ विषयरूप असतात परतु 'मी'चे ठिकाणी तर दुसरी सत्ता म्हणून काही ठरूच शकत नाहीं, कारण दोन ही सख्याच मूळ विषयसरणीतील आहे जर दुसरी सत्ता मानली तर 'मी' 'मी' न राहता तो 'तू' म्हणजे विषयरूप होऊन जाईल याकरिता जेथे दुसरा कोणताहि पदार्थ राहूच शकत नाही, जेथे फक्त एक 'मी'चीच सत्ता असते त्याला अतिविलक्षणता म्हणतात [२] "

या विषयाचे श्री शेठजींनीं आपल्या 'जग मिथ्या कीं पुरुषोत्तमरूप' या अतिशय बहारदार व प्रासादिक[३] ग्रथात फारच सुदर विवेचन केले आहे, ते वाचकानी मुळातच बघावे अशी आमची आग्रहाची विनती आहे येथे विस्तारभयास्तव निवडक ओव्याच देत आहोत --

'मी'चे ज्ञान बुद्धीशीं । होणें असभवचि असे तिशी ।
हे दावी वैलक्षण्याचे लक्षणाशीं । 'मी' आणि 'दृश्या'मध्ये ॥५१॥
'मी'ला पकडू जाता । ज्याशी पकडू न शके बुद्धिमत्ता ।
तयाशी पकडले अशा खोट्याच बाता । आपण मारीत असो ॥ ७० ॥
जो मी विषयरूप । तो जाणावा उपाधिरूप ।
उपाधिवाचूनि विषयरूप । होणे नाहीं ॥ ९८ ॥
सापेक्षता हीच उपाधि । तियेवाचूनि दुजी नसे कधीं ।
'मी' ला सापेक्ष समजू जधीं । तेव्हाच लागे उपाधी ॥
'मी' नसे द्रष्टरूप । 'मी' नसे विषयरूप ।
द्रष्टा हाही विषयरूप । दृश्यससर्गें ॥ १०० ॥
आपण विषय पाहतो । यात मला मी जाणतो ।
ऐसे खोटेच आपण समजतो । अज्ञानाने ॥ १०३ ॥
द्रष्टा आणि दृश्य । हीं दोन्हीही असती दृश्य ।
'मी' तर असे अदृश्य । आणि अद्रष्टाही ॥ १०९ ॥

१ श्री प्रतापशेठजी याची तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने, ग्रथ पृ १९७ २ तोच ग्रंथ, पृ १९७

३ या ग्रथाला 'प्रासादिक' म्हणण्याचे कारण असें कीं, खुद्द शेठजीच असे म्हणतात कीं, 'एकनाथी भागवता'चें वाचन, चिंतन, मनन करीत असताना श्रीएकनाथ महाराजाच्या कृपेनेच आपणास हा ओवीबद्ध ग्रथ करण्याची विलक्षण स्फूर्ति झाली

दोन पदार्थांचे स्वरूप । केव्हाही असे विषयरूप ।
तैसे नसे 'मी'चे रूप । म्हणोनि 'मी' विलक्षण ।। ५३ ।।
जैसा विरोध अभावाचा भावाते । तैसे नोहे 'मी' आणि दृश्याचे नाते ।
तेथ अतिवैलक्षण्याचे भाते । जाळी भावाऽभावरूपी द्वद्वाते ।। ६८ ।।
'मी' आणि दृश्यातील विलक्षणतेला । दृष्टान्त नसे जगतान्तरी तिला ।
तम प्रकाश आणि भावाऽभावाला । नसे 'मी'चे वैलक्षण्य ।। ७५ ।।
जन सर्व अहो, अहो ! । ही 'मी'ची विलक्षणता पहाहो ।
कैसे तया तोलावे दृश्यासगे हो । तुम्हीच सागा ।। ७७ ।।

आत्मस्वरूपाचा विचार करून आता आपण सहजस्थितीकडे वळू

## सहजस्थिति

गुणदोषी चित्तवृत्ती । साडोनिया सहजस्थिति ।
बालके जेवी क्रीडती । तैशी स्थिति ज्ञात्याची ।।

—एकनाथी भागवत

सहज केवळ ते न तुम्हा कळे । बहुत तर्केलेहि न आकळे ।।
गुरुमुखाविण ते न कळे गति । म्हणुनि बोलाति येच रितीश्रुति ।।

----श्री वामनपडित

'ऐक्यरूपे आभिन्न । सहजस्थिति" ।। —श्रीसमर्थ स्वामी रामदास ( दासबोध )

सहजस्थिति श्री शेठजींच्या तत्त्वज्ञानाचा गाभा होय ज्या रीतीने शेठजी सहजस्थितीचा विचार करतात तसा विचार इतरत्र क्वचितच आढळून येईल 'सहजस्थिति' श्री शेठजींच्या तात्त्विक प्रक्रियेचा महत्त्वाचा विशेष होय या सहजस्थितीचे वर्णन अतिशय हृदयगम असून उद्बोधक पण तितकेच आहे सहजस्थितीचे स्वरूप जर चागले लक्षात आले तर श्री शेठजींचे तत्त्वज्ञान आत्मसात झाले असे म्हणावयास हरकत नाही यामुळे आपल्या दैनदिन जीवनाच्या साध्यासुध्या व नित्य परिचयाच्या अनुभवाकडे पाहण्याचा नवीन दृष्टिकोन मिळेल, व जगाविषयी, आपल्या स्वत विषयी, व परमात्म्याविषयीच्या आपल्या रूढ कल्पना आमूलाग्र पालटून जातील, व त्याबरोबरच जुनी मूल्ये ढासळून जाऊन त्याची जागा नवीन शाश्वत स्वरूपाची तात्त्विक मूल्ये घेतील यामुळे जीवनाकडे बघण्याची नवीन दृष्टि मिळेल, आणि रोजचे जग व त्यातील सामान्य विषय परब्रह्मरूप भासू लागतील आपले सर्व व्यवहार ज्ञानाधीन आहेत जसे ज्याचे ज्ञान, तसा त्याचा व्यवहार, व हे ज्ञान पालटले की व्यवहारहि पालटतो, किंबहुना ज्ञानामुळे सपूर्ण माणूसच पालटून जातो ज्ञानापूर्वीचे गौतमबुद्ध, किंवा स्वामी रामतीर्थ, अथवा विवेकानद व

ज्ञानानतरच्या याच व्यक्तीमध्ये किती तरी फरक दिसून येतो ज्या मानाने हे ज्ञान पालटत जाईल त्या मानाने व्यक्तीचा व्यवहार व स्वत व्यक्तीहि पालटत जाते याच आशयाने शेठजी वारवार म्हणत असतात की, जगत्‌बुद्धीमुळे जग दिसते, परतु त्याच ठिकाणी ब्रह्मबुद्धि झाली तर ब्रह्मच दिसावयास लागेल, व ब्रह्माला जाणणारी व्यक्ति ब्रह्मच होते [1] आपणास बुद्धीच्या अज्ञानयुक्त समजुती-मुळेच जग हे सत्य वाटत असते अविद्येचा प्रभावच असा आहे की, जी वस्तु निरतर आहे व भासमानाहि आहे, तीच अविद्येमुळे नाही व भासताहि नाही, अशा व्यवहाराचा विषय होते, [2] व वस्तुत कालत्रयातहि नसलेले जगत् एकमेव खरे होऊन बसते शेठजी यासाठी मारुतीचे उदाहरण देत असतात एका प्रसगी मारुतीने लकेत देवीला बाजूस ढकलले व आपणच देवी होऊन बसला, व खऱ्या देवीचा नैवेद्य मटकावला परतु ही स्थिति पालटणेहि आपल्या हातात आहे, व ती तशी पालटणे यातच परम पुरुषार्थ आहे यास एकमेव उपाय म्हणजे ज्ञान अन्य साधने याविषयी साक्षात् उपयोगी पडणार नाहीत, कारण अज्ञानाचा साक्षात् विरोध ज्ञानाशीच आहे अविद्याकार्य जे कर्मादि, ते अविद्येचे पोसलेले असल्यामुळे आपली आई जी अविद्या तिला कशी घालविणार [3] ? आपण आत्मरूप म्हणजे ब्रह्मरूप तर स्वरूपत आहोच आपणास ब्रह्म नव्याने व्हावयाचे नाही मात्र आपली ही निरतर अखड एकरस सहजच असलेली ब्रह्मरूपता ज्ञानाने समजून घ्यावयाची आहे श्री शेठजीचे 'सहजस्थिती'चे विवेचन या दृष्टीने वाचकास खात्रीने मार्गदर्शक ठरेल

सहजस्थितीचा विचार करण्याचे पूर्वी एका गोष्टीचे स्पष्टीकरण करणे आवश्यक वाटते या सहजस्थितीचा अपरपर्याय 'सहजावस्था' व 'सहजसमाधि' पण आहे परतु 'स्थिति' व 'अवस्था' इ शेठजी निराळयाच अर्थाने वापरीत असतात, मुख्यार्थाने नव्हे, हे विसरता कामा नये स्थिति किंवा अवस्था मुख्यार्थाने सापेक्ष व येणाऱ्या जाणाऱ्या आहेत परतु शेठजीना या शब्दाचा वस्तुत लक्ष्यार्थ विवक्षित आहे, म्हणजे आपले आत्मस्वरूपच विवक्षित आहे हे सहजच असते, बाह्य निमित्तावाचूनच असते सर्व व्यवहार करीत असतानाहि यात तिळमात्रदेखील फरक पडत नाही ज्या वेळी आपण कोणताहि व्यवहार करीत असतो त्या वेळी त्याना कोणतेहि रूप नसते आणि अर्थ नसतो असख्य क्रिया आपण थोड्या वेळातच करीत असतो परतु त्या करताना आपले लक्ष त्याच्याकडे नसते मागाहून बुद्धीचा विचार-व्यापार सुरू झाल्यावर म्हणजे त्याना विषय केल्या-नतर त्याना ज्ञानातच अर्थ मिळतो व ज्ञानातच त्याना रूप येते आपण आपल्या स्वरूपानुभवात असताना त्याना कोणताहि अर्थ नसतो व स्वरूपाहि नसते याच अर्थाच्या 'जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप' या शेठजीच्या ग्रथात फार सुदर ओव्या आहेत त्यात सहजस्थितीचे सर्व रहस्य थोडक्यात साठविलेले आहे —

१ "ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति"—श्रुति २ "सति भात्यपि वस्तुनि नास्ति न भाति इति व्यवहार "
३ चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये । वस्तुसिद्धिर्विचारेण न किंचित्कर्मकोटिभि ॥ ११ ॥
—विवेकचूडामणि

सहज क्रिया घडती । त्या पुरुषोत्तमरूप असती ।
परि विचार तया बिघडविती । जडरूप देऊनी ॥ १११ ॥
सहज क्रियेत । नसे जडरूपता तींत ।
फरक न होय पुरुषोत्तमात । सहज क्रियेमध्ये ॥ ११२ ॥
सहज क्रिया ही अपरोक्षरूप । ते पुरुषोत्तमाचे स्वरूप ।
तया भेदाचे रूप । विचारान्ती येतसे ॥ ११३ ॥
क्रिया विषयरूप नसे कदा । विचार करिता तिला ये विषयरूपता ।
मग तेथ भेदाची सत्यता । वाटू लागे ॥ ११४ ॥
आपण आत्मस्वरूपाकडे । देशकालादि विशेष दृष्टीने पाहतो त्याकडे ।
तेव्हाच भेदाशी स्वरूप चढे । नको सहज क्रियेत ॥ ११५ ॥
इद्रियाची क्रिया सहजरूप असे । तेथ द्वैतभाव खचित नसे ।
क्रियेविषयी विचार करिता येत असे । तिला परोक्षता ॥ ११६ ॥
म्हणूनि मी कर्ता नसे । हा तर केवळ भ्रम असे ।
माया ती हीच असे । जी भुलवी सर्वा ॥ ११७ ॥

शेठजींच्या तत्त्वज्ञानविषयक दृष्टिकोनासबधीं विवेचन करताना आम्हीं त्याचा एक विशेष असाहि दाखविला होता कीं, त्याचा भर ' करून--अकर्तात्मस्थिती 'वर आहे व्यावहारिक दृष्टीने कर्मत्यागाची त्याना जरूर वाटत नाहीं म्हणजेच कर्मयोग व कर्मसन्यास याचा सुदर मिलाफ त्याच्या तत्त्वज्ञानात दिसून येतो, व त्याप्रमाणे ते प्रत्यक्ष जीवनात वागण्याचाहि पूर्ण प्रयत्न करतात शेठजींना आम्ही सिद्ध पुरुष समजत नाही, कारण ते स्वत हि आपणास तसे समजत नाहींत. मात्र ते उच्च कोटीचे साधक आहेत, यात सशय नाही आत्मज्ञानाची जितकी तळमळ शेठजींना आहे, तितकी इतरत्र क्वचितच आढळून येईल 'आत्मज्ञान', 'आत्मा' हे शब्द ऐकताच शेठजींची जी स्थिति होते ती ज्यानीं स्वत च शेठजीजवळ राहून पाहिली आहे, तेच सागू शकतील हे शब्द ऐकताच त्याना असे काही गहिंवरून येते की, ही अद्वैत भक्तिभावना जागृत होताच त्याच्यात जणु अष्टसात्त्विकभाव प्रकट होतात रामकृष्ण परमहसाची किंवा चैतन्यमहाप्रभूंची परमेश्वराचे नाव ऐकताच समाधि लागे, असे म्हणतात. शेठजींची वरील शब्द ऐकताच ज्ञानमय समाधि लागते आत्मस्वरूपाचे चिंतन ही अतिशय उच्च कोटीची तात्त्विक स्वरूपाची भक्ति आहे श्री शकराचार्य म्हणतात, "स्वस्वरूपानुसधान हीच खरी भक्ति आहे[१]" शेठजींची ही तात्त्विक भक्ति बरीच प्रगल्भावस्थेस पोचली आहे तथापि ही शेठजींच्या व्यावहारिक कर्तबगारीच्या कधींच आड आली नाही उलट हिच्यामुळे त्याचा व्यवहारहि फारच उच्च कोटीचा व

१ "मोक्षकारणसामग्र्या भक्तिरेव गरीयसी । स्वस्वरूपानुसधान भक्तिरित्यभिधीयते" ॥
—विवेकचूडामणि, ३२

परोपकारार्थ होण्यास मदत झाली आहे करून अकर्तेपणाच्या स्थितीवर त्याचा मुख्य भर आहे याच आशयाने ते म्हणतात [1]--

" आत्मस्वरूपाची कल्पना आपण निष्क्रियतेची, म्हणजे क्रियेच्या अभावस्वरूपाची करतो, परतु ती चूक आहे खरे आत्मस्वरूप नैष्कर्म्यातच म्हणजे करून अकर्तेपणातच आहे क्रियेचा अभाव म्हणजे नैष्कर्म्य नव्हे आपण ज्या वेळी जे करतो तें त्या वेळी आत्मरूपच असते, व त्याला आपण बुद्धीने समजतो तसे स्वरूप नसते क्रियेत आणि आपल्यामध्ये क्रिया चालू असताना भेद काढता येत नाही आपण मागाहून क्रियेला विषय करतो त्या वेळी देखील ती विषय करण्याची क्रिया अपरोक्षच म्हणजे आत्मरूपच असते विषय करते वेळींदेखील आपली बुद्धि अपरोक्षातच, सहज-स्थितींतच काम करते, म्हणून तिला द्रष्टेपणाचे स्वरूप येत नाही, व दृश्यास दृश्याचे स्वरूप येत नाही जेथे द्रष्टाच नाही तेथे दृश्य कोठून येणार ? नेहमीं सहज स्थितींतच व निरपेक्ष वर्तमान-कालात क्रिया होत असतात, आणि त्या होताना त्याना क्रियेचे स्वरूप नसते व म्हणून त्यात भेदहि नसतात "

यापुढच्या उताऱ्यात शेठजीना विवक्षित असलेल्या सहजस्थितीचे मूर्तिमत चित्र पाहा-वयास सापडेल --

" आपल्या सर्व क्रिया अथवा व्यवहार सहजस्थितीत म्हणजे अपरोक्षतेतच होत असतात व्यवहाराचे वेळी व्यवहाराला व्यवहाराचे म्हणजे क्रियेचे रूप तर असतच नाही, परतु व्यवहार ज्या वस्तूशी केला जातो त्या वस्तूत आणि आमच्यात भेददेखील असत नाही सहजस्थितींतील व्यवहाराच्या वस्तूमध्ये भेद असत नाही सहजस्थितीत सर्वच पदार्थांना नाम – रूप असत नाहींत, फक्त पदार्थाचा अस्तित्वभाव राहतो भेदासाठीं तर देशकालाची अपेक्षा आहे आणि देशकाल तर बुद्धीचे घटक आहेत म्हणजे ज्या ज्या वेळी व्यवहाराला आपण आपल्या बुद्धीचा विषय करू तेव्हाच भेद होतील भेद तर परोक्षतेत म्हणजे विषयसरणींत, विषयदृष्टीतच होतात 'दृष्टि सृष्टि' ती हीच नाही तर सर्व व्यवहार ब्रह्ममयच आहेत आपण ब्रह्मातच खातो पितो, ब्रह्मातच चालतो फिरतो, ब्रह्मातच झोपतो, जागे होतो, आणि ब्रह्मातच देणे घेणे करतो परतु ज्या वस्तूचे आपण घेणें देणे करतो त्या वस्तूत आणि आपणात भेद आहे किंवा नाही असा प्रश्नच सहजस्थितीत उद्भवत नाहीं " जीव ब्रह्मैक्य " ते हेच, आणि हेच त्या पुरुषोत्तमाचे स्वरूप जर मुळी आमच्यात आणि दृश्य विषयातच भेद असत नाहीं तर दुसऱ्या दृश्य विषयात परस्पर भेद असणे शक्य नाहीं प्रथम दृश्यादृश्यात भेद असल्याखेरीज एक दृश्य आणि दुसऱ्या दृश्यात भेद असणे असभवनीय आहे, कारण द्रष्टा–दृश्य हे भेदच जर नसतील तर दृश्य ही वस्तूच काही राहणार नाही, तर मग त्यात भेद कुठले ?

अशी वस्तुस्थिति आहे तरी, व्यवहारकाली आपली बुद्धि 'बुद्धि' या सज्ञेस पात्र नसता-नाहि त्या व्यवहाराकडे तिरप्या नजरेने पाहते, आणि चक्क ठोकून देते की " व्यवहारकालातहि

१ श्री शेठजींचीं तत्त्वज्ञानावरील व्याख्यानें, पृ २७-८

भेद तर होतेच ' बुद्धीच्या या तिरप्या नजरेला चागल्या तऱ्हेने समजून घेतले पाहिजे, नाहीं तर ती खड्ड्यात नेऊन सोडल्याशिवाय राहणार नाही प्रथम तर भेद विषयदृष्टीतच असतात ही एक गोष्ट, आणि सहजस्थितीकडे तिरप्या नजरेने पाहण्याची चूक आपल्या हातून नेहमीं घडत असते ही दुसरी गोष्ट या दोन्ही गोष्टी चागल्या तऱ्हेने लक्षात ठेविल्या तरच आपण आणि आपला व्यवहार असा भेद न होता दोन्ही ब्रह्मस्वरूप कसे आहेत हे ध्यानात येईल, आणि या अनुभवाचे परोक्ष ज्ञान होऊन त्याला अर्थहि येईल आणि प्रत्यक्षीकरण म्हणजे अनुभव तर आहेच आहे [1] ''

वरील उताऱ्यात वेदान्तशास्त्राची किती तरी महत्त्वाची प्रमेये ग्रथित झाली आहेत ती वाचकानी नीट लक्षात घ्यावीत अशी विनती आहे कारण हे वेदान्तशास्त्राचे, विशेषत शेठजींच्या तात्त्विक प्रक्रियेचे मूलभूत सिद्धान्त आहेत यात भेदाचे स्वरूप, भेदाची उत्पत्ति हा मुद्दा तर अतिशय महत्त्वाचा आहे, कारण अद्वैतवेदान्ताची सर्व इमारत भेदाच्या मिथ्यात्वावर अवलबून आहे [2] नानात्व वस्तुत नाही, असे श्रुति म्हणते [3] ब्रह्मच एकमेव खरे आहे ब्रह्माचा अभाव कालत्रयात नाहीं जगताचा अभाव मात्र जगत् ज्या वेळी दिसते त्या वेळीहि असतो अज्ञानी जनाना अविचारामुळे फक्त जगत् दिसते, त्याचा अभाव दिसत नाही श्री शेठजींच्या प्रक्रियेनुसार भाव, अभाव इ सापेक्ष गोष्टी सर्व बुद्धिकृतच आहेत ज्ञानी पुरुषास जगताहि ब्रह्म दिसते कारण जगाची सत्ता ब्रह्मच आहे परब्रह्मस्वरूप अखड एक रस आहे त्यात भेद नाही भेद सर्व अज्ञानामुळे बुद्धींत उत्पन्न होतात बुद्धि आपल्या स्वत च्या विकृत दृष्टीने, स्वत च्या देशकाल, सापेक्षता इ अटी लावून त्या ब्रह्माच्या सत्तेकडे पाहते, व तिला एकात अनेकत्व दिसू लागते [4] बुद्धि व तिच्या अटी यानी विरहित जी शुद्ध सत्ता तिच्यात नानात्वाचा गधहि नाही तिलाच शेठजी सहजस्थिति, पुरुषोत्तमाचे स्वरूप इ अनेकविध नावानी प्रसगानुसार सबोधीत असतात बुद्धीची लुडबुड मध्ये ज्या ज्या वेळी नसते, त्या त्या वेळी नानात्व व भेदयुक्त प्रतीति आपणास असत नाही मात्र बुद्धीचा लाडा कारभार सुरू होताच निर्दोष सहजस्थिति विकृतस्वरूपास प्राप्त होते वस्तुत सहजस्थिति कधीच विकृत होत नाही, ती तशी विकृत झालेली बुद्धीच्या दोषामुळे तिला भासते, इतकेच म्हणून शेठजी सर्वाना आग्रहाने सागत असतात, '' आपल्या जीवितातील सर्व गोष्टीकडे आपण बुद्धीच्या दृष्टीनेच पाहता निसर्गाच्या म्हणजेच सहजस्थितीच्या दृष्टीने त्याचेकडे पाहिले पाहिजे कारण 'क्रिया होते' किंवा 'होत नाही' यापैकी कोणतेहि वाक्य सहजस्थितीची कल्पना करून देण्यास समर्थ नाही ही करून अकर्तेपणाची स्थिति आहे त्या सहजस्थितीलाच ब्राह्मी स्थिति म्हणतात ही ब्राह्मी स्थिति आम्ही

---

१ श्री प्रतापशेठजी याची तत्त्वज्ञानावरील व्याख्याने, पृ १७५–१७६

२ 'तत्राद्वैतसिद्धेर्द्वैतमिथ्यात्वसिद्धिपूर्वकत्वात्' —अद्वैतसिद्धि

३ 'नेह नानास्ति किंचन'

४ मायामात्रमिद द्वैत अद्वैत परमार्थत । इति ब्रूते श्रुति साक्षात्सुषुप्तावनुभूयते ॥ ४०६ ॥
चित्तमूलो विकल्पोऽय चित्ताभावे न कश्चन । अतश्चित्त समाधेहि प्रत्यग्रूपे परात्मनि ॥ ४०८ ॥
—श्रीशंकराचार्यकृत विवेकचूडामणि ।

प्रत्यक्ष आताच अनुभवीत आहोत या सहजस्थितीत क्रिया होत असताना ती ब्राह्मी स्थितिच असते, परंतु ती बुद्धीत आली म्हणजे ज्याप्रमाणे दारूखाना उडत असताना तो प्रकाशमय असतो, पण त्याचा गुल पडतो तो काळा ठिक्कर असतो, त्याप्रमाणे सहजक्रिया बुद्धीत आली म्हणजे ती जड होते या सहजस्थितीला 'विश्व' असे म्हणतात [1] ते परमात्म्याचेच स्वरूप आहे विश्वाचा कधी अभाव होत नाहीं तेथे भावाभावाचा प्रश्नच नसतो [2] "

'निरपेक्ष वर्तमान' या शीर्षकाखाली सहजस्थितीचे वर्णन निराळ्या छटानी पाहावयास सापडेल — "बुद्धिविशिष्ट इंद्रियांचे संस्कार किंवा देशकालादी-या अटी अन्वय व्यतिरेकाने काढून टाकणे म्हणजेच वर्तमानात राहणे होय वर्तमानात राहणे याचा अर्थ बौद्धिक क्रिया बंद करून बसणे असा नसून बौद्धिक क्रिया होत असतानाच तिला वर्तमानात क्रियेचे स्वरूप कसे नसते, तेथे आपणास मी, बुद्धि आणि क्रिया अशा त्रिपुटीचा प्रत्यय कसा येत नाही, आणि तेच आपले व जगाचे खरे अद्वैत स्वरूप कसे आहे हे उत्तम निस्संशय रीतीने जाणून घेणे होय वर्तमानात याप्रमाणे त्रिपुटीचा भाव नसतो व अभावहि नसतो, हे निश्चयात्मक बुद्धीने जाणल्यानंतर मग आपणास कोणतेच द्वंद्वात्मक सापेक्ष भाव मोह पाडू शकत नाहीत, व मुळातच जर द्वैत नाही तर जगास सत्य किंवा मिथ्या तरी कसे म्हणावे असा प्रश्न तेथे उत्पन्न होतो मूळ स्थितीत वर्तमानाला काळाचे स्वरूप नाही, क्रियेला क्रियेचे स्वरूप नाही, द्रष्ट्याला द्रष्ट्याचे स्वरूप नाही, व दृश्याला दृश्याचे स्वरूप नाही अशी ही कालरहित व द्रष्टा-दृश्य-दर्शन त्रिपुटीरहित सदैव वर्तमान परिस्थिति हीच आपले व सृष्टीचेहि अन्तस्तत्त्व होय, व तेथे कसल्याच भेदाची प्रतीति नसल्याने ते सर्व चराचराचे सहज व अकृत्रिम सत्त्व असून ते आत्मरूपहि आहे ही आत्मरूप, निरपेक्ष वर्तमान परिस्थिति हीच ब्रह्मस्थिति होय ही सर्व विश्वाचे सारसर्वस्व आहे येथे कशाचाहि अभाव नाही ही स्थिति कधी नाहीशी होणारी नाही निरपेक्ष वर्तमान हा ब्रह्माचाच पर्याय शब्द आहे [3] "

इतरत्र शेठजी म्हणतात — ' आपल्या सर्व स्वाभाविक क्रिया बाह्यरूपच असतात त्या क्रियांना सहजस्थितिदेखील म्हणतात या सहजस्थितीत क्रियाचा भावहि असत नाही अगर अभावहि असत नाही पशु, पक्षी इ मनुष्येतर प्राण्याना फक्त इंद्रियेच असतात, बुद्धि असत नाही त्यांच्या सर्व क्रिया स्वाभाविकच होत असतात पण त्याना त्याचे ज्ञान नसल्यामुळे ते बद्ध असतात स्वाभाविक क्रिया ही वस्तुस्थिति आहे, आणि त्याना जाणणे हे त्याचे ज्ञान आहे, आणि या ज्ञानानेच मनुष्य मुक्त होतो [4] "

१ 'देखे विश्व मद्रूप पार्थ' —श्री प्रतापशेठजी याची 'भगवद्गीतेची गुरुकिल्ली'

२ श्री शेठजींचीं तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने, पृ १९२

३ श्री प्रतापशेठजी याची खाजगी टिपणवही, भाग २ रा, पृ १०१

४ श्री प्रतापशेठजी याचीं तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने, पृ ११९.

## सहजस्थितीच्या नजरेतून जन्ममृत्यूचा विचार

'जगा काळ खाय । आम्ही माथा दिले पाय[1]' ॥ —संत तुकाराम

"एव मृत्यु आणि जन्म । दोहींचे एक वर्म ॥

आत्मा तेथे सम । उभयातीत ॥" —शिवकल्याण, श्रीमद्भागवत, दशम स्कंध

श्रीमद्भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायात भगवंतांनी अर्जुनास असे म्हटले आहे की, आत्मा जन्मत नाही किंवा मरतहि नाही हा जन्मला होता किंवा पुढे जन्मेल असेहि नाही हा अज, नित्य, शाश्वत व पुरातन असा आहे शरीराचा नाश झाला तरी ह्याचा नाश होत नाही[2] आत्मस्वरूपाचा विचार करतांना आपण पाहिले की, आत्मा म्हणजेच सर्वांच्या परिचयाचा 'मी' सच्चिदानंद रूप आहे तो अज अमर आहे आपण हेहि पाहिले की, आत्म्यासाठी सर्व प्रिय असते, आत्मा मात्र इतर कोणासाठी प्रिय नसून स्वत साठीच प्रिय असतो या आत्मप्रीतीचाच एक नित्य परिचयाचा भाग म्हणजे आपण निरंतर हल्ली आहोत याच स्वरूपाने राहावे, हा आहे मनुष्याचे मरणभय याच आत्मप्रीतीत उगम पावत असते[3] आत्महत्येच्या मुळाशीदेखील हीच निरतिशय आत्मप्रीतीच दिसून येईल आपले वास्तविक स्वरूप अज, अमर असून मग मरणाचे इतके भय का? याचे उत्तर 'अज्ञान' हेच द्यावे लागेल आपल्या अमरत्वाचे ज्ञान आपणास नाही, तसे स्वरूपाने आपण अमर आहोतच, हे ज्ञान ज्याना झाले त्या त्या थोर संतानी आपले मरणच मरून गेले असे नमूद करून ठेविले आहे इतकेच नव्हे, तर जगाला त्राहि भगवन् करून सोडणाऱ्या काळाच्या मस्तकावर आम्ही पाय दिला आहे, असेहि ते म्हणतात ज्ञानच हा सर्व चमत्कार घडवून आणते

---

१ तव परि ये चरन्त्यखिलसत्त्वनिकेततया त उत पदाऽऽक्रमन्त्यविगणय्य शिरो निर्ऋतेः ।
—भागवत, वेदस्तुति ( १०–८७–२७ )

२ न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ —भगवद्गीता, २–२०

३ "प्राण्याचे सर्व व्यवहार 'मी अज, अमर, अविनाशी आहे' ही भावना न कळत गृहीत धरूनच चाललेले असतात ही भावना न कळत जरी असली तरी इतकी दृढ असते की ती काहीं केल्या आपल्यातून काढून टाकता येणार नाही या दृढ भावनेवरच मृत्यु वगैरेसंबंधाचे प्रश्न उत्पन्न होणें शक्य आहे या भावनेच्या अभावीं मृत्यूला काहीच स्वरूप येत नाहीं, कारण आपल्यास कशाचेहि ज्ञान होते तें सापेक्ष स्वरूपाचेच होतें मृत्यूच्या ज्ञानाला मृत्युरहित अशा अमरस्थितीचे सांकेतिक ज्ञान असणे अपरिहार्य आहे " श्री प्रतापशेठजी यांची खाजगी टिपणवही, भाग २, पृ ७२ 'अमरत्वाच्या भावनेवरच आपले सर्व व्यवहार चालले असतात' या शीर्षकाखालीं

आता आपण श्री शेठजींच्या प्रक्रियेनुसार जन्ममृत्यूचा विचार करू 'मी'च्या विवेचनात आपण पाहिले की, 'आपण आहोत' याबद्दल कोणासहि शंका नाहीं म्हणजे आपले अस्तित्व विचारावाचूनच सिद्ध आहे ते सिद्ध करावयास प्रमाणाची गरज नाही आपली आत्मप्रीतीहि तितकीच स्वाभाविक आहे ती कोणत्याहि बाह्य निमित्ताने सिद्ध नाही मृत्यूची मात्र याच्या अगदी उलट स्थिति आहे मृत्यूच्या तर नुसत्या कल्पनेनेच आपण थरारतो मृत्यूची आपणास कल्पनाच सहन होत नाही यावरून असे दिसून येते की, मृत्यूचे स्वरूप आपल्या अस्तित्वाप्रमाणे स्वत सिद्ध नाही 'मी' म्हणजे जगातील यच्चयावत् अस्तित्वाची खाण असून अस्तित्वाची खरी कसोटीहि 'मी'च आहे 'मी'इतके निस्संदिग्ध अस्तित्व कोणत्याहि वस्तूचे नाहीं अस्तित्वाच्या या कसोटीवर घासून पाहिल्यास जगातील कोणताहि पदार्थ खरा ठरत नाहीं, मृत्यु तर नाहीच नाही, कारण विचारावाचून मृत्यूला कोणतेहि रूप नाही तद्वतच जन्मालादेखील विचारावाचून कोणतेहि रूप नाही व अर्थहि नाही सहजस्थितीत सुखदु ख, जन्ममरण इ भेद नाहीत सहजस्थितीत वस्तूना अथवा क्रियाना रूप व अर्थ नसतात ते तर बुद्धीने दिलेले असतात सुखदु ख, जन्ममृत्यु इ भाव आपल्या बुद्धीतच उगम पावतात आपण विचार करून कधींच जन्मास येत नाही 'आता जन्म घेऊ या,' असा विचार करून आपण जन्म घेत नसतो जन्म तर निसर्ग म्हणजे सहजस्थितीतला आहे त्या वेळी त्याला 'जन्म' हे स्वरूप असत नाहीं जन्मच नाही, तर मृत्यूला अवकाश कसा असणार? कारण 'सति कुडये चित्र,' भिंत असेल तर चित्र असणार नित्य व शुद्ध अज अमर अपरोक्षस्वरूप 'मी' वर बुद्धि त्याच्या खऱ्या स्वरूपाच्या अज्ञानामुळे जन्ममरण इ आरोपित करीत असते, इतकेच आपल्या स्वत च्या जन्माचा किंवा मृत्यूचा कोणासहि कधी अनुभव आहे काय? अर्थात नाही हा अनुभव पुढेहि कधी येणार नाही कारण जन्म, मृत्यु इ भाव आत्मसरणीतले म्हणजे सहजस्थितीतले, परमात्मस्थितीतले नाहीत ते विषयसरणीतले आहेत 'मृत्यु' हा आपल्या विचारातच उगम पावत असल्यामुळे तो नेहमी 'येणार येणार' याच स्वरूपाचा राहील, व एखाद्या बागुलबोवाप्रमाणे आपणास भयग्रस्त करीत राहील प्रत्यक्ष मृत्यूने आपण कधीच मरणार नाही तर मृत्यूच्या भीतीनेच आपण मरणप्राय होतो यास्तव शेठजी मृत्यूस 'कल्पनेचे भूत', 'मनोराज्य' किंवा 'बागुलबोवा' म्हणतात त्यांच्या ग्रंथातील खालील उतारे त्यांच्या जन्ममृत्युविषयक विचारांची चांगलीच कल्पना करून देतील —

"आपल्या बुद्धीस जन्ममृत्यूचे स्वरूप जसे वाटते त्याच स्वरूपाने जन्ममृत्यु जर खरे असते तर ते सर्व प्राणिमात्रास व लहान अर्भकासहि मोठ्या मनुष्याप्रमाणेच वाटावयास पाहिजे होते परंतु मनुष्येतर प्राणिमात्रास व लहान अर्भकास त्याची कल्पनाहि नसते यावरून मृत्यु हा काहीं सत्य पदार्थ नाही, कारण सत्य हे सर्वव्यापी असते

"आपण आता जीवंत आहोत ही गोष्ट जर खरी असेल तर मृत्यु ही मूळस्थिति होऊ शकणार नाही, कारण मूळस्थिति ही सर्वदेशी व सर्वकाळीहि असलीच पाहिजे मृत्यूची स्थिति तशी नाहीं सबब ती मूळस्थिति होऊ शकत नाही

"मृत्यूची कल्पना ही जर जीविताच्या सापेक्षच आहे तर सर्व सापेक्ष कल्पना जीवितातल्याच असल्यामुळे मृत्यु ही कल्पनाहि जीवितातलीच आहे खरोखर मृत्यु हा काही पदार्थ नाही. त्याचप्रमाणे आपले हल्लीचे जीविताहि मूळस्थिति होऊ शकणार नाही, कारण तेहि टिकणारे नाही, तर आपले हल्लीचे जीवित व मृत्यु या दोहोमध्ये जी गोष्ट सामान्य असेल तीच मूळस्थिति असली पाहिजे, हे उघड आहे

ज्या अर्थी मीच जन्मतो आणि मीच मरतो, म्हणजे जन्म व मरण ह्या दोन्ही स्थिति माझ्यावरच येतात, जातात, त्या अर्थी 'मी' हेच त्यातील सामान्यतत्त्व निघते मृत्यूमध्ये जर 'मी' नसेल तर त्या मृत्यूला कोणत्याहि प्रकारचा अर्थ येणार नाही [1]"

"आपण स्वत सिद्ध असून विनाकारण बुद्धीचे मागे लागून आपल्या मृत्यूची कल्पना करतो वास्तविक आपले अस्तित्व हे प्रत्यक्ष आहे, आणि आपण मरणार ही बुद्धीची कल्पना आहे मरणाची कल्पना ही प्रत्यक्षात कधीच अनुभवात येणे शक्य नाही, कारण प्रत्यक्ष व कल्पना याची जातच वेगळी आहे प्रत्यक्ष अपरोक्ष आहे व कल्पना ही परोक्ष असते प्रत्यक्षता ही निरपेक्षवर्तमानात असते, आणि कल्पना भूतभविष्यकालीन असते खरे पाहिले तर निरपेक्ष-वर्तमानकाळच निरतर असतो आपले अस्तित्व जर प्रत्यक्ष म्हणजे निरपेक्ष वर्तमानकाल स्वरूपाचे आहे तर त्याला मृत्यूची कल्पना विटाळ शकणार नाही मरणाची कल्पना करण्यास मी असावा लागतो, आणि कल्पनेच्या पलीकडे मृत्यूला अस्तित्व नाही आपण अमर असल्याशिवाय आपले अगर दुसरे कोणाचेहि मृत्यूचे ज्ञान होणार नाही मृत्यूच्या ज्ञानात मृत्यूचे आधीचे आणि नतरचेहि ज्ञान असावे लागते, तरच मृत्यूला मृत्यूचे स्वरूप येते

"मृत्यु ही एक शरीराची क्रिया आहे ती होत असताना आत्मस्वरूपच असते तेथे जीवितातील सापेक्षता नसल्यामुळे भेद होत नाही सबब मृत्यूला मृत्यूचे स्वरूप जीविताची कल्पना करण्यातच येते ज्या मृत्यूत जीविताची कल्पना नाही तेथे मृत्यूहि नाही [2]"

"आम्ही जन्मलो असे ज्ञान आम्हास जन्माचे वेळी होत नाही ते बऱ्याच वर्षानतर आईबाप व इतर लोकाच्या सागण्यावरून होते या जगात मनुष्याला सोडून जितके काही मनुष्येतर प्राणी आहेत, त्या सर्वाना जन्ममरण नाहीच जन्ममृत्यु फक्त मनुष्याच्या विचार-व्यापारात सापेक्षतेनेच बनतात, म्हणजे जन्ममृत्यूला जन्ममृत्यूचा अर्थ येतो निसर्गात जन्ममृत्यु नाहीच मृत्युदेखील एक मनोराज्य आहे अनुभवाचा आधार नसल्यामुळे त्याला ज्ञान-देखील म्हणता येत नाही आश्चर्याची गोष्ट तर ही की, मृत्यु निव्वळ मनोराज्य असून, त्याचा अनुभवाशी काही सबध नसूनहि त्याने सर्व जगताला त्राहि भगवान करून सोडले आहे या मृत्यूच्या मनोराज्यालाच भवसागर आणि भवदु ख म्हणतात यात मृत्यूच्या दु खाहून दुसरे मोठे दु ख मानण्यात येत नाही मृत्यूचे भय वास्तविक काही नसून ते फक्त बौद्धिक विचाराचे एक भूत आहे, जे अज्ञानी जनाना भिववीत असते [3]"

---

१ खाजगी टिपणवही, भाग २, पृ ८८ २ श्री शेठजीची तत्त्वज्ञानविषयक व्याख्यानें, पृ १४५–१४७

३ श्री शेठजी याजी खाजगी टिपणवही, भाग २, पृ ९२–९३

वर दाखविले की, जन्ममृत्यूचा अनुभव ज्याचा त्याला कधीच नसतो हे ज्ञान तर दुसऱ्याला व दुसऱ्याच्या जन्ममृत्यूचे असते आपल्या मृत्यूचे ज्ञान आपणास स्वत स असणे शक्य नाही, कारण ते तसे असेल तर आपण जिवत आहोत असेच म्हणावे लागेल याचा अर्थ शेठजी आपातत विरोधाभासात्मक दिसणा या शब्दात ये असा करतात की, जो कधी झालाच नाही तोच जन्मतो, आणि जो कधीच नव्हता तोच मरतो याचा अर्थ असा की, जन्ममृत्यु इ सापेक्ष-भाव आत्मसरणीतले नसून विषयसरणीतले असल्यामुळे ते आत्म्यास लागू होऊ शकत नाहीत 'मी' कधी जन्मासहि येत नाही व मरतहि नाही जन्ममरण तर स्वत स सोडून इतराना अविवेकामुळे प्रतीतीस येतात त्याचे स्वरूप वास्तविक नाही

साधारणपणे असे समजले जाते की, जन्म मृत्यु आत्म्यास स्पर्श करीत नाहीत ते देहाचे धर्म आहेत परतु सहजस्थितीच्या नजरेने पाहिले असता शरीरदेखील आत्मरूप आहे[1] ते जन्मतहि नाही व मरतहि नाही ते जसेच्या तसेच राहणार, कारण निसर्गात कोणतेच भेद नाहीत मग जन्ममरणरूप भेद तरी तेथे कसे राहतील ? हीच खरी तत्त्वदृष्टि आहे याविषयी श्री शेठजींच्या काही ओव्या मननीय आहेत —

शरीर असे रामाचे । ते रूप असे पुरुषोत्तमाचे ।
परि तेथे देहभावाचे । भान असेना ॥ १५९ ॥
रामाचे शरीर अति सुदर । ते स्वत असे "खुदाका नूर" ।
तया बाह्यत्व आणिती कातर । परोक्षत्वे ॥ १५७ ॥
रामास शरीर असे । ते पुरुषोत्तमाचे स्वरूप असे ।
परि न कीं जसे गोविंदास भासे । रूप रामाचे ॥ १५५ ॥

१ "देहास मर्त्य न समजता त्यास अमर्त्य, अविनाशी समजणे, म्हणजेच देहाची खरी सार्थकता झाली असे समजणे देहाची सार्थकता तेव्हाच होईल कीं, जेव्हा त्याला आत्म्याचे रूप देता येईल अशी देहसार्थकता करणे हाच देहधारणेचा हेतु म्हणजे लक्ष्य असले पाहिजे

—शेठजीची खाजगी टिपणवही, भाग १, पृ १०८

यथेव मृन्मय कुम्भसद्वद्देहोऽपि चिन्मय । आत्मानात्मविभागोऽय मुधैव क्रियतेऽबुधै ॥ ६९ ॥

—श्रीशंकराचार्यविरचित अपरोक्षानुभूति ।

खालील श्लोकात ज्ञानी पुरुषाच्या सहजस्थितीचे सुदर वर्णन सापडेल —

येथे देह नव्हे खरे जग नव्हे हा सत्य मृत्यु नव्हे ।
कांहीं पाप नव्हे स्वर्ग यम नव्हे नरकादि काही नव्हे ॥
ज्ञात्या दुःख नव्हे मुदा गति नव्हे त्या त्रास खोटा नव्हे ।
ब्रह्मानंदि निमग्न चित्त असता काहीच काही नव्हे ॥

श्री शेठजी एके ठिकाणी म्हणतात, "खर पाहिले असता आपणास सदैव आत्म्याचेंच भान असतें, देहाचे भान आपणास कधीच असत नाही ते फक्त बोलण्यापुरतेंच असते "—टिपणवही, भाग १, पृ १०४

रामाचे शरीर आणि रामा । यात भेद ठाऊक नसे रामा ।
ते अपरोक्षरूप असे रामा । आणि एकरूप ही ।। १५६ ।।

--जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप

याप्रमाणे जन्ममृत्यूचे स्वरूप बुद्धिनिर्मित अतएव काल्पनिक कसे आहे हे पाहून आता आपण जगताच्या स्वरूपाचा विचार करू

## जगताच्या स्वरूपाचा विचार

' हरिरेव जगत जगदेव हरि ' । ' सकलमिदमह च वासुदेव '
" जग भासे जे सकळ । तो जगदात्माचि निखळ ।
ऐसा निश्चयो ज्याचा प्रबळ । मुक्त केवळ तो एक ।। ५१७ ।।
विश्व मीचि परमार्थे । मुक्ती तयाते वोळगणी " ।। ५१८ ।।

—श्रीएकनाथकृत हस्तामलक

तत्त्वदृष्टीने पाहू गेल्यास जगत् हे जसे आपातत भेदयुक्त, नानात्वयुक्त दिसते तसे नसून ते ब्रह्मरूप आहे, हा वेदान्तशास्त्राचा सिद्धान्त आहे, व अनुभवी पुरुषाची प्रतीतिहि तशीच आहे ज्याची अशी प्रतीति आहे तोच मुक्त, असे श्रीनाथ महाराज वर उद्धृत केलेल्या ओव्यामध्ये म्हणतात परमात्मा व जगत् अज्ञानामुळे निरनिराळे वाटतात, वस्तुत ते एकच आहेत याचा अर्थ असा नव्हे की, परमात्म्यात भेद व नानात्व आहेत याचा अर्थ असा होतो की, परमात्मस्वरूपावर भेदादि अज्ञानामुळे आरोपित केलेले आहेत, म्हणून ते मिथ्या आहेत हा अविद्याकल्पित भाग वगळल्यास जगताची सत्ता ब्रह्मच आहे या दृष्टीने श्री शेठजी म्हणतात, ' जगत् कधी आलेहि नाही व कधी नाहीसे झालेहि नाही ते ब्रह्मस्वरूपाने जसेच्या तसे कायम आहे '[1] " तद्वतच ही ओवी[2] पाहा

जगताते मिथ्या म्हणणे । किंवा तयाशी पुरुषोत्तम वर्णणे ।
याचा एकचि अर्थ समजणे । ज्ञानियाने ।। १८३ ।।

' सकल इद अह च वासुदेव म्हणजे सर्व चराचर जगत् ब्रह्मरूप आहे इद म्हणजे खुर्ची, टेबल इ जडपदार्थ, 'अह' म्हणजे मी 'मी' हा चैतन्यसृष्टीचा प्रतिनिधि आहे प्रथमत आता आपण श्री शेठजीच्या प्रक्रियेने चराचर जगत् ब्रह्मरूप कसे आहे ते पाहू विचाराच्या सोयीसाठी प्रथमत आपण जीवसृष्टीचा विचार करू हा विचार श्री शेठजीनी 'मी' व 'तू' हे काय पदार्थ आहेत या सदराखाली केला आहे आपण स्वत स 'मी' समजतो, परतु स्वत हून इतरास 'तू' समजतो तद्वतच, आपण ज्याला 'तू' समजतो तोच 'तू' स्वत स तर 'मी' असेच समजतो परतु इतरास 'तू' या

---

१ श्री शेठजींचीं तत्त्वज्ञानविषयक व्याख्यानें, पृ ९७ २ जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप

रूपाने समजतो यापैकी खरा प्रत्यय कोणता ? 'मी'रूप प्रत्यय खरा की 'तू'रूप प्रत्यय हा खरा ? या दोन प्रत्ययापैकी आत्मप्रत्यय म्हणजे प्रत्येकजण आपणा स्वत स 'मी' समजतो हाच प्रत्यय खरा मानला पाहिजे, कारण मागे आपण पाहिलेच आहे की, 'मी'ची प्रतीति विचारावाचून स्वत - सिद्ध स्वरूपाची असते 'तू'ची प्रतीति मात्र अशा प्रकारची नाही ती विषयसरणीत उगम पावते आत्मसरणीची व्याख्या शेठजी खालीलप्रमाणे करतात [3] "आपण आपल्याविषयी कोणत्याहि प्रकारचा विचार न करता म्हणजे आपण स्वत ला विषय न करता आपण ज्या प्रकारे 'केवल' स्वरूपाने असतो त्या आपल्या अस्तित्वास 'आत्मसरणी असे म्हणतात" आणि विषयसरणीची व्यवस्था शेठजी पुढे दाखविल्याप्रमाणे करतात [1]—"देशकाल, कार्यकारणभाव आणि सापेक्षादि दृष्टीने वस्तूच्या-कडे पाहणे, अर्थात आपल्या ज्ञानात आपल्याव्यतिरिक्त विषयरूपाने म्हणजे आपल्यापेक्षा भिन्न किंवा निराळ्या रूपाने जे जे काही येते त्या तऱ्हेला विषयसरणी असे म्हणतात मग ते अगदी बाहेरचे पदार्थ असोत आपले शरीर असो, आपली मन बुद्धि आदि आत्मीयकरणे असोत, किंवा सुखदु ख वगैरे संवेदना असोत जे जे विचारात येणारे जाणारे पदार्थ ज्या तऱ्हेने आपणास समजतात त्या प्रकाराला विषयसरणी म्हणतात" यापैकी आत्मसरणी हीच खरी व प्रमाणभूत होय, कारण ही स्वत सिद्ध अशी आहे हिला प्रमाणान्तराची गरज नाही, विषयसरणी मात्र बुद्धीत उगम पावत असल्यामुळे खोटी आहे, कारण बुद्धीच्या बाहेर विषयसरणीतील विषयाना काही अस्तित्वच नाही या दृष्टीने विचार करू गेल्यास 'तू'चा उगम विषयसरणीत होत असल्यामुळे तू' खरा नाही, हे स्पष्ट आहे प्रत्येकाचा 'मी' मात्र विचारावाचूनच स्वानुभवरूप असून निस्संदिग्ध व स्वत सिद्ध असतो एका 'मी'मध्ये व दुसऱ्या 'मी'मध्ये भेद नाही, कारण भेदच मुळी विषयसरणीतला पदार्थ आहे यामुळे आत्मसरणीतल्या 'मी'ला तो स्पर्शदेखील करू शकत नाही खरा 'मी' इतका चपळ आहे की बुद्धि त्यास पकडावयास जाते, व 'पकडले' असे समजते तोच हा 'मी' 'मी' न राहून 'तू' म्हणजे खुर्ची, टेबल इ प्रमाणे एखादा जड पदार्थच बुद्धीच्या हाती येतो, व खरा 'मी' बुद्धीच्या कक्षेच्या बाहेर तिला स्वराज्य-साम्राज्यत्वाने ऐटीत मिरवत असलेला दिसतो 'मी' दृश्याहून विलक्षण आहे, कारण तो आपल्या विचाराचा विषय कधीच होत नाही, तो अतिविलक्षण आहे, कारण सत्ता सर्वत्र एकट्या 'मी'चीच असते, हे मागे केलेले विवेचन या स्थळी लक्षात घ्यावे या-विषयी श्री शेठजींच्या ग्रथातील काही उतारे उद्बोधक ठरतील —

"गोविंदा रामाला 'तू' दिसतो परतु त्या 'तू'च अस्तित्वच कोठे नाही त्या 'तू'ला कोणत्याहि प्रकारची सत्ता नाही 'तू'च्या ठिकाणी आपणास जी सत्ता प्रतीत होते ती 'तू'ची नसून गोविंदाच्या 'मी'चीच आहे असेच सर्व जगातील 'तू'च्या स्वरूपात दिसणाऱ्या पदार्था-विषयी समजावे आणि ही विषयसरणी चूक आहे हे एकदा पटले म्हणजे मग 'तू' म्हणजे विषय म्हणून काही पदार्थच राहणार नाही, आणि तो न राहिल्याने रामा व गोविंदाच्या 'मी' मध्येहि काही भेद राहणार नाही यावरून असे सिद्ध होते की, जेथे जेथे 'तू' दिसतो तेथे तेथे तो 'तू'

१ तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने, पृ १९४

नसून 'मी'च 'मी' भरलेला आहे आपल्याला आपल्यापेक्षा निराळा जो जो पदार्थ म्हणजे जगातले सर्वच पदार्थ दिसतात, ते सर्व 'मी'च आहेत सर्व सत्ता 'मी'चीच आहे 'तू'चा पत्ताच नाही जन्ममृत्यु, सुखदु ख वगैरे काहीहि प्रकारे 'मी' मध्ये नाहीतच हे सर्व प्रकार विषयरूप 'तू'चेच आहेत 'तू'ची कल्पनाच भ्रामक आहे, कारण तिचा काही विषयच म्हणजे सत्ताच नाही [१] ''

अन्यत्र श्री शेठजी म्हणतात — " या मध्यवर्ती सहजस्थितीचे स्वरूप सर्वांचे सत्त्व जो 'मी' त्या 'मी' स्वरूपाचे आहे, कारण 'मी'ला सोडताच येत नाही या 'मी'च्या खाली आपणास जाताच येत नाही 'मी'ला सोडून दुसरे काही तत्त्व आहे असे मानताच येत नाही मात्र येथे हा 'मी' अहकाररूप धरावयाचा नाही हा 'मी' सर्वांचाच आत्मा आहे त्यात हा अमक्याचा 'मी' आणि तो तमक्याचा 'मी' असा भेद नाही तो 'मी' सर्वांचे अविभाज्य सत्त्व आहे, तो केवळ सत्तारूप आहे तो बुद्धीच्या 'परे' आहे तो निरपेक्ष वर्तमानस्वरूप आहे या वर्तमानात काळच राहात नाही या निरपेक्ष वर्तमानातील 'मी'लाच परमात्मा म्हणतात [२] ''

'जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप'मधील काही समर्पक ओव्या फारच बहारदार आहेत, म्हणून त्याना उद्धृत करण्याचा मोह आवरत नाही —

गोविंदा रामास म्हणे 'तू'। परि रामास स्वत स न वाटे 'तू'।
'मी' असेच वाटतु। निश्चयेसी ॥ १५८ ॥
रामास स्वत 'मी' वाटे। गोविंदास रामा 'त' वाटे।
'तू' वाटणे सत्य केवी वाटे। विवेकी जना ॥ १६० ॥
सत्यज्ञान रामाविषयीचे। पाहिजे असेल जर तयाचे।
गोविंदासही 'मी'च वाटावे साचे। न की 'तू' ॥ १६१ ॥
'मी' शी 'तू' समजणे। हा वस्तुस्थितीचा विपर्यास पूर्णपणे।
ह्यासी जाणिजे मिथ्यापणे। निश्चयेसी ॥ १६२ ॥
अपरोक्षता असे फक्त 'मी'मध्ये। तीहि असे वर्तमानकाळामध्ये।
कधी न आढळे 'तू' मध्ये। आणि भूतभविष्यामध्येहि ॥ १६६ ॥
जर कोणी मायेचा पूत। भेद राखुनी 'मी' आणि 'त'त ।
'तू'चा सबध दावी अपरोक्षतेत। मग सत्य म्हणू आम्ही जगताते ॥ १६७ ॥
येणे रीती सर्व ब्रह्माडाचे। एकरूप 'मी' असे तयाचे।
जेथ अस्तित्व चराचराचे। एकवटले असे ॥ १६८ ॥
'अपरोक्षता' हा सर्व विश्वाचा। एकरूप 'मी' असे साचा।
म्हणुनि न हाले आपुलेपणाचा। खुट तेथ ॥ १७१ ॥

१ श्री शेठजींची तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने पृ १०५–६

२ तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने पृ ७९–८०

याप्रमाणे संपूर्ण चरसृष्टि 'मी' म्हणजे आत्मरूप अथवा ब्रह्मरूप आहे हे आपण आतापर्यंतच्या विवेचनावरून पाहिले आता अचर म्हणजे जड सृष्टि ब्रह्मरूप कशी आहे हे पाहावयाचे आहे प्रस्तुत विषयाचा विचार करताना वाचकांनीं सहजस्थितीचे स्वरूप लक्षात घ्यावे ही विनंती आहे सहजस्थिति हीच खरी ब्राह्मी स्थिति आहे या स्थितीत आमच्या शरीराच्या द्वारा किती तरी क्रिया घडत असतात, परंतु त्याना त्या अपरोक्ष सहजस्थितीत कोणत्याहि तऱ्हेचे रूप आणि अर्थ हीं नसतात, त्यांच्यात कोणत्याहि तऱ्हेचा, आधीं नंतर इ स्वरूपाचा कालक्रम नसतो, तद्वतच त्या क्रिया उत्पन्न झाल्याचे स्वरूप आणि अर्थहि नसतो हाच न्याय आपल्या सर्व अवस्थाना, जन्ममृत्यूला आणि आपापत बाह्य आणि स्वतंत्र म्हणून समजल्या जाणाऱ्या जगातील वस्तूना आणि पदार्थानाहि लागू होतो सहजस्थितीत ज्या पदार्थाशी व्यवहार केला जातो त्या पदार्थामध्ये आणि आमच्यात भेद देखील असत नाही एक पदार्थ आणि दुसऱ्या पदार्थातहि भेद असत नाही भेदाची उत्पत्ति तर देश, काल आणि सापेक्षता यांच्यामुळे होते देशकालादि बुद्धीचे घटक आहेत सहजस्थितीत बुद्धीची लुडबुड नसते, तिच्या 'तिरप्या नजरे'ला वाव मिळत नाही म्हणून सहजस्थितीत आपले सर्व व्यवहार व व्यवहारातील पदार्थ ब्रह्ममय असतात ज्या वेळी बुद्धीची लुडबुड किंवा 'अव्यापारेषु व्यापार' सुरू होतो, म्हणजे जेव्हा आपण व्यवहाराला आपल्या बुद्धीचा विषय करू त्या वेळीच भेद दिसून येतात याचा अर्थ असा की, भेद अपरोक्षतेत नसून परोक्षतेत उत्पन्न होतात, आत्मसरणीत नसून विषयसरणीतच असतात वस्तुस्थिति अशी आहे, म्हणजे सहजस्थितीत द्रष्टा-दृश्य भेद, एक दृश्य आणि दुसऱ्या दृश्यात भेद नसतात, कारण त्या स्थितीत विषयसरणी नसून अद्वैत आत्मसरणी असते तिच्यात आपली बुद्धि नसते, किंवा ती ब्रह्मरूपच असते तथापि बुद्धीचा कारभार सुरू होताच ती त्या सहजस्थितीतील ब्रह्मरूप व्यवहाराकडे 'तिरप्या नजरे'ने म्हणजे आपल्या देश, काळ, सापेक्षता इ च्या चष्म्यातून पाहते आणि 'व्यवहारकाळात भेद तर होतेच' असा त्या शुद्ध सहजस्थितीचा विपर्यास करते वस्तुत बुद्धि जेथे ज्या वेळीं नसते, तेथे त्या वेळेसंबंधी कांहीदेखील बोलण्याचा अधिकार बुद्धीला असू नये, तिची त्याबद्दलची साक्ष प्रमाणभूत मानली जाऊ नये परंतु ही गोष्ट लक्षात आली तर फार मोठे काम झाले असे म्हणावे लागेल, कारण ही तत्त्वदृष्टि आहे

देश-काल याची उत्पत्ति बुद्धीच्या विचारव्यापारात म्हणजेच विषयसरणीत दिसून येते श्रीसमर्थ म्हणतात

उपाधीचा विस्तार झाला। तेथे काल दिसूनी आला।
एऱ्हवीं काळाला। ठावचि नाही॥

याचा अर्थ असा की, बुद्धि जेव्हा विषयसरणीचा अंगीकार करून सहजस्थितीतील क्रियेकडे किंवा वस्तूकडे बघते तेव्हाच देशकाल प्रत्ययास येतात प्रत्यक्ष क्रियेत अगर वस्तूमध्ये त्याचा पत्ताहि नसतो निरपेक्षवर्तमानकाळ हा तर परमात्मरूप आहे याविषयी श्रीशंकराचार्य म्हणतात 'कालशब्देन निर्दिष्टो अखंडानंदअद्वय', म्हणजे काल या शब्दाने अखंड, अद्वय आणि

आनदरूप ब्रह्मच दाखविले जाते परतु बुद्धि विषयदृष्टि लावून त्याचे 'भूत, भविष्य, आणि वर्तमान' असे तीन तुकडे करते परतु कोणता सुज्ञ मनुष्य बुद्धीच्या या मर्कटचेष्टाना प्रमाण मानील ? जग दिसते म्हणून ते खोटे कसे ? जे दिसते ते खरे – असा आपला साधारणपणे समज असतो परतु शास्त्रकार जग दिसते म्हणूनच खोटे असते असे म्हणतात 'दृश्यत्वात मिथ्या' याचे कारण असे की, जो पदार्थ मुळात नाहीच, उदा वाझेचा मुलगा – तो दिसेल तरी कसा ? तद्वतच अतींद्रिय, वाणी आणि मनाचा अविषय जो परमात्मा तोहि कसा दिसेल ? म्हणून वस्तुत नसून अविद्येमुळे दिसणारे जग अनिर्वचनीय अतएव मिथ्या असले पाहिजे, असे शास्त्रकार म्हणतात 'जे जे दिसते ते ते खरे' अशी व्याप्तिदेखील खरी आहे, असे म्हणता येणार नाही, कारण मृगजळहि दिसते, स्वप्नात किती तरी वस्तु दिसतात, दोरी कळण्यापूर्वी दोरीवर सर्पहि दिसतो, म्हणून श्रीसमर्थ म्हणतात —

देखिले ते सत्यचि मानावे । हे ज्ञात्याचे देखणे नव्हे ।
जड मूढ अज्ञान जीवे । हे सत्य मानिजे ॥ —दासबोध

श्री शेठजी म्हणतात, 'विषयत्वात् मिथ्या' म्हणजे जग सहजस्थितीच्या दृष्टीने ब्रह्मच आहे तथापि बुद्धि त्याच्याकडे विषयसरणीने पाहू जाते म्हणून तिच्या हाती जे येते ते मिथ्याच असते विषयसरणी म्हणजेच बुद्धीच्या देश, काल, सापेक्षता इ अटी बाजूस सारून पाहू गेल्यास एक शुद्ध ब्रह्मच दिसेल जगनाहि ब्रह्मच आहे, मात्र सहजस्थितीच्या दृष्टीने, बुद्धीच्या विषयसरणीच्या दृष्टीने नव्हे शेठजींच्या प्रक्रियेनुसार तर आपल्या इद्रियाना जे दिसते ते सत्यच म्हणजे ब्रह्मच दिसते सत्यच जर एकमेव अस्तित्ववान वस्तु आहे तर इद्रियाना दुसरे काहीदेखील दिसणे कसे शक्य आहे ? मात्र ही इद्रिये "केवळ इद्रिये" आहेत, बुद्धिविशिष्ट इद्रिये नाहीत "केवळ इद्रिया"मध्ये भेद असत नाही भेद तर बुद्धीमुळे होत असतात वस्तूला प्रत्यक्ष करण्याचे काम इद्रियाचे आहे इद्रिये फक्त 'आहे' एवढेच दाखवितात इद्रियानी दिलेल्या सत्तेवर बुद्धि रूपरसादि गुण म्हणजे अटी लावण्याचे काम करते इद्रियाना कोणतेहि सापेक्ष गुण प्रत्यक्ष होणे शक्य नाही, कारण इद्रिये ही वर्तमानकाळातच पाहतात "इद्रियाचे ठिकाणी प्रत्यक्षता निरतरचीच आहे ती जात येत नाही केवळ इद्रियाना प्रत्यक्षता म्हणजे ब्रह्म, आत्मा, परमात्मा म्हणजे निसर्ग याचा अनुभव नेहमी होत राहणारच, आणि यालाच 'सहजस्थिति' असे म्हणतात रूपरसादि ह्या बुद्धीच्या अटी आहेत [१]" पदार्थ-ज्ञानाचा प्रकार शेठजी खाली लिहिल्याप्रमाणे दाखवितात—

"पदार्थ-ज्ञानाचे वेळेस बुद्धि आणि इद्रिये दोन्ही लागतात असे जे वाटते तो आपला भ्रम आहे वास्तविक प्रकार तसा नाही तर ज्या क्षणी इद्रिय आणि पदार्थ याचा सबध म्हणजे सन्निकर्ष होतो, त्या क्षणी इद्रिये व पदार्थ म्हणजे द्रष्टा, दृश्य आणि दर्शन असे त्रिपुट्यात्मक ज्ञान

१ तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने, पृ ५–६–७

नसते तेव्हा फक्त एक प्रत्यक्षता म्हणजे सत्ताच असते परंतु दुसऱ्या क्षणी बुद्धि पहिल्या क्षणाकडे आपल्या चष्म्याने म्हणजे रूपरसादि गुणांच्या व देशकालाच्या अटीने पाहू लागते, तेव्हा तिला पहिल्या क्षणाचे वास्तविक ज्ञान न होता, तिच्या चष्म्याला अनुरूप म्हणजे रूपरसादि गुणरूपी अटींचेच विपर्यस्त ज्ञान होते इंद्रियांच्या व्यापारात कोणतेच भेद नसतात भेद हे विषय करण्यात होतात, आणि हेच जगाच्या उत्पत्तीचे ठिकाण आहे [१] ''

श्री शेठजींच्या प्रक्रियेनुसार इंद्रियांमध्ये भेद नाही सर्वच इंद्रिये आत्मस्वरूप आहेत सर्व इंद्रियांची प्रत्यक्षतादेखील एकच आहे इंद्रियांमध्ये दिसून येणारे भेद वास्तविक नसून विषयसापेक्षतेमुळे बुद्धीला ते तसे वाटतात, इतकेच बुद्धीची ही सापेक्ष दृष्टि बाजूला सारून पाहिल्यास भेद दिसून येणार नाहीत नाक, कान, डोळे इ इंद्रियांचे विषय वेगळे वेगळे असूनहि अनुभवात सर्वांची एकरूपता होते उदा मींच पाहिले, मींच ऐकिले, इ या विषयाचे सुंदर निरूपण श्री शेठजींनी ' सर्व जगाच्या एकत्वाचा अनुभव ' या शीर्षकाखाली केले आहे--' आपले जेवढें म्हणून ज्ञान आहे ते सर्व शब्दस्पर्शादि पाच प्रकारचेच आहे, आणि ते नाक, कान इत्यादि पंचेंद्रियांनीच होते याव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याहि प्रकारचे जगताचे ज्ञान आपणास होत नाही इंद्रियें हीं पाच प्रकारचीं असली तरी त्या पाचांमध्ये अनुभव हा एकरूपच असतो जसें आपणच पाहिलें, आपणच ऐकिले या रीतीने सर्व इंद्रियांचा अनुभव आपणासच येतो, आणि आपणास सर्व द्वैत नाहींसे होते यावरून हे सिद्ध होते कीं, अनुभव एकरूप असूनहि जेव्हा आपण त्याच एकरूप अनुभवाला देश, काल, सापेक्षतादींच्या चष्म्यातून म्हणजे सापेक्ष दृष्टीने पाहतो तेव्हा तोच अनुभव पाच प्रकारांनी विभागला जातो म्हणजे एकाच अनुभवाचे शब्दस्पर्शादि पाच तुकडे होतात या पाच तुकड्यांमध्येच जगातील यच्चयावत भेद समाविष्ट होऊन जातात म्हणजे एक अनुभव अथवा आत्मस्वरूपच विषयदृष्टीच्या द्वारा अनेकरूप भासते याला उदाहरण द्यावयाचे झाल्यास आठ आंधळ्यांना एकाच हत्तीचे ज्ञान आठ प्रकारचे झाले --हे देता येईल [२] ''

बाहेर जगतात वस्तु आहेत, आणि या असलेल्या वस्तूचे आपणास ज्ञान होते यास शेठजी ' आपला गैरसमज हे वस्तूचे स्वरूप आहे ' असे म्हणतात याचे कारण असे की, सहज-स्थितींत वस्तूला वस्तूचे स्वरूप नसते हा गैरसमज म्हणजे बुद्धीची विपर्यस्त दृष्टीने अथवा विषयदृष्टीने पाहण्याची तऱ्हा होय विषयदृष्टीतच सर्व भेदाची, वस्तूंच्या नानात्वाची आणि त्यांच्या बाह्यत्वाची उत्पत्ति होते ही विषयसरणी सोडल्यास जग परब्रह्मरूप अथवा पुरुषोत्तमरूपच दिसेल ज्ञानी पुरुषाला जगत जगत् या रूपाने न दिसतां ब्रह्मरूपच दिसेल, कारण जर जगद्बुद्धीमुळे जगत दिसावयास लागते तर ब्रह्मबुद्धीमुळे ब्रह्म इंद्रियांनीच दिसावयास लागेल यात नवल ते काय ? खरे तर असे की, इंद्रियांना सदोदित ब्रह्मच दिसते जगत् तर बुद्धीलाच दिसते तीच बुद्धि ब्रह्मबुद्धि झाली की काम फत्ते झाले

---

१. तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने, पृ १२ २ तोच ग्रंथ, पृ २२०

आता श्री शेठजींच्या ग्रथातील यासबधी उतारे देऊन हे प्रकरण सपवू --

"आपणास सर्वच ज्ञान सापेक्षतेनेच होते, स्वतत्रतेने होत नाहीं पदार्थांचे ज्ञान परस्पर सापेक्ष असून, ती सापेक्षता आपल्या बुद्धीतच आहे बाह्य जगात सापेक्षता नाही ही बुद्धीने दिलेली सापेक्षता काढून टाकली तर जग हे जगस्वरूपाचे न राहता ते ब्रह्मरूपच दिसेल" (खाजगी टिपणवही, भाग १, पृ ७३)

"विचारातच क्रियेला किंवा वस्तूला क्रियेचे किंवा वस्तूचे रूप येते, आणि त्या विचारातील क्रियेलाच किंवा वस्तूलाच अभावहि लागू होतो विचाराच्या आधी क्रिया किंवा वस्तु ब्रह्मस्वरूप म्हणजे आत्मस्वरूप असते" (वरील ग्रथ, पृ ७९)

"जग म्हणून वाटते ते जग नसून तो आत्माच आहे" (वरील ग्रथ, पृ १०७)

'जग ब्रह्मच आहे' या शीर्षकाखाली शेठजी म्हणतात-- "शरीर किंवा जग हे काही आत्मा नाही असे समजणे हे काही आत्मज्ञान नाहीं तर शरीर किंवा जग हे दुसरे काही नसून एक आत्माच आहे असे ज्ञान झाले म्हणजे त्यास खरे आत्मज्ञान म्हणता येईल व हेच खरे मिथ्यात्व होय शरीर किंवा जग हे मिथ्या स्वरूपाने निराळी काही वस्तु असून आत्मा हा त्यापेक्षा निराळा आहे असे जोपर्यंत वाटत राहील, तोपर्यंत आत्मज्ञानाचे नाव काढावयास नको." (खाजगी टिपणवही, भाग २, पृ ३३)

"सत्य हे जसे अस्तित्वरूपी आहे तसे जग अस्तित्वरूपी नाहीं त्याचे अस्तित्व फक्त कल्पनेपुरतेच असते, म्हणून दोहोंचे ज्ञान एकाच वेळेस होणे शक्य नाही जेव्हा सर्पाचे ज्ञान असते तेव्हा रज्जूचे ज्ञान नसते व रज्जूचे ज्ञान झाल्याबरोबर साप नाहीसा होतो त्याचप्रमाणे सत्याचे ज्ञान झाल्याबरोबर जगत् नाहीसे होईल सत्याचे स्वरूप पूर्णपणे चागल्या रीतीने आपल्या लक्षात आले तर मग भेद किंवा जगत् म्हणून काही राहणार नाही, व ते त्यापासून उत्पन्न झाले असेहि आपणास वाटणार नाही सत्याचा आविर्भाव जर आपले बुद्धीत चागला झाला तर तेच जगत् किंवा भेद आपल्यास सत्याचे स्वरूपाने म्हणजे एकरूपतेने प्रकाशू लागतात, आणि सत्याचे ज्ञान नसल्यामुळे सत्यच जगत् रूपाने म्हणजे भेदरूपाने आपल्यास प्रतीत होत होते, असा प्रत्यय येईल म्हणजे जगत् किंवा भेद हे वस्तुस्थितीत नसून सत्याचे अज्ञानामुळे आपणास आपले बुद्धीत भासतात सत्य व जगत् हे दोन पदार्थ नसून एक सत्यच आहे आपल्यास त्याचे ज्ञान नसल्यामुळे कल्पनेने त्या सत्याचे तुकडे तुकडे करून आपण पाहतो, म्हणून आपणास ते ते भेद वाटतात व ते भेद म्हणजेच जगत् होय" (वरील ग्रथ, पृ ४२)

"सापेक्षता ही पदार्थामध्ये नसते तर ती आपल्या बुद्धीमध्ये असते याचा अर्थ असा की, देशकालाची दृष्टि स्वीकारणे म्हणजेच सापेक्ष दृष्टि स्वीकारणे होय एकदा देशकालाची दृष्टि स्वीकारली म्हणजे भेद वाटू लागतात सापेक्ष-दृष्टीनेच पदार्थाला अर्थ दिला जाऊन भेद कसे उत्पन्न होतात, हे पदार्थाला आपण सज्ञा कशी देतो त्यावरून दिसून येते पदार्थाला स्वरूप सज्ञेत दिले जाते 'काय आहे' या जिज्ञासेतच देशकालाचे म्हणजे सापेक्ष-दृष्टीचे बीज आहे,

आणि संज्ञा ही सापेक्ष-दृष्टीची पूर्तता आहे सापेक्ष-दृष्टीतच पदार्थास अर्थ मिळतो, व संज्ञेत पदार्थास स्वरूप दिले जाऊन अर्थ स्पष्ट होतो व भेद वाटावयास लागतात . संज्ञा देण्यातच पदार्थाला रूप दिले जाते श्रीतुळशीदास म्हणतात —

"देखिय रूप नाम आधीना। रूप ज्ञान नाहि नाम बिहीना" ॥ (तत्त्वज्ञानविषयक व्याख्याने, पृ ६४–६५ )

"इंद्रियांच्या ब्रह्मानुभवाकडे बुद्धि जेव्हा 'काय आहे' या संकुचित दृष्टीने पाहू लागते, तेव्हा दृष्टि बदललयामुळे तिला त्या 'केवळ व एकमेवाद्वितीय' सत्तारूप 'मी'चे ठिकाणी अनेक भेद वाटू लागतात, व मग त्यात 'हा अमुक पदार्थ आहे,' असे ज्ञान बुद्धीस होते" ( उक्त ग्रंथ, पृ ६८ )

सापेक्षता हा जणु बुद्धीला जडलेला एक रोग आहे त्यावर शेठजी 'मीचे वैलक्षण्य' व 'अतिवैलक्षण्य' ही औषधयोजना करतात— "सापेक्षतेचा रोग नाहीसा करण्यास वैलक्षण्य हे एक औषध आहे या वैलक्षण्याच्या प्रभावाने द्वैत राहूच शकत नाही, कारण द्वैत हे विषयसरणीतले आहे या अतिवैलक्षण्याच्या प्रभावाने सर्व भेद जळून खाक होतात" ( उक्त ग्रंथ, पृ २५ व ७५ )

'जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप' या ग्रंथाची शेवटली ओवी याच अर्थाची आहे—

वैलक्षण्याचे रूप धरित। जगदाभासाते मिथ्या करित।
अद्वैत किरण पसरित। प्रगटला पुरुषोत्तम ॥ १८५ ॥

'भगवद्गीतेची गुरुकिल्ली' यातील एकदोन ओव्या पाहा—

विश्वा येता 'मद्रूप'ता। लया जाय अनेकता।
एकचि उरे आत्मसत्ता। अपरोक्षरूपे ॥ ३२ ॥
'मद्रूप विश्व' म्हणता। विश्वा ये 'मद्रूप'ता।
'मी' न घे विश्वरूपता। विवेकी हो ॥ ३३ ॥
ऐसे 'मद्रूप' विश्व पाहता। जगन्मिथ्यात्व बाणे चित्ता।
हा गीतार्थ ये हाता। गुरुकिल्लीने ॥ ३४ ॥

## 'तत्त्वमसि'–तें तूं आहेस : 'तूं' म्हणजे 'मी'

सर्व वेदान्तशास्त्राचे मुख्य प्रयोजन जिवाचे खरे स्वरूप ब्रह्मच आहे हे दाखविण्यात आहे श्री शेठजींनीही प्रसंगानुसार जीव व ब्रह्म यांचे ऐक्य दाखविणाऱ्या वचनाचा म्हणजेच महावाक्याचा विचार केला आहे शास्त्रामध्ये महावाक्ये निरनिराळी आहेत, उदाहरणार्थ, 'तत्त्वमसि', 'अहं ब्रह्मास्मि', 'प्रज्ञानं ब्रह्म', अयमात्मा ब्रह्म', 'सर्वं खल्विदं ब्रह्म,' यांचा समन्वय श्री शेठजींनी 'जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप' या लहानशा ग्रंथात केला आहे या समन्वयाचे तात्पर्य असे की, जेथे जेथे 'सर्व किंवा 'तू' इत्यादि शब्दाचा उल्लेख असतो तेथे तेथे

'मी' हा शुद्धात्माच विवक्षित असतो 'मी' हा सदासर्वकाळ अपरोक्षच असतो ब्रह्माची परोक्षता काढावी लागते, तसे 'मी'चे नाहीं त्याची परिच्छिन्नता, अल्पज्ञता इ गोष्टी सोडल्या की, झाले काम 'मी'ची अपरोक्षता कधीच सुटणे शक्य नाही' याविषयी श्री शेठजी म्हणतात --

येथे कोणी शका घेती । 'तत्त्वमसि' वेद म्हणती ।
आणि 'सर्व खल्विद' ही म्हणती । तयाचे काय ॥ १२५ ॥
एक खरा काय तो 'अह' । खोटे म्हणता 'तत' आणि 'त्व' ।
चारहि वेदा ये मिथ्यात्व । महावाक्यासबधी ॥ १२६ ॥
यया शकेचे निराकरण । करिता आत्मरूपाचे विवरण ।
मग सहजि होय एकीकरण । महावाक्याचे ॥ १२७ ॥
'तत्त्वमसि' यातील 'त्व' । या पदाचा लक्ष्यार्थ असे 'अह' ।
व्यवहारार्थ शब्द 'त्व' । हा गुरूने योजिला ॥ १२८ ॥
'सर्व खल्विद ब्रह्म' यातील 'सर्व' । याहि पदाचा लक्ष्यार्थ असे 'अह' ।
'सर्व' पदाने सर्वाचा 'अह' । गुरुनें निर्देशिला ॥ १२९ ॥
'सर्व' खल्विद ब्रह्म' यातील 'सर्व' । हा शब्द दावी शिष्याचा अनुभव ।
तेथून समजाविण्या शिष्यासि सर्व । गुरूने आरभिले ॥ १३० ॥
"सर्व 'मद्रूप' बघ पार्थ" । यातील सर्व शब्द दावी अर्जुनाचा भावार्थ ।
तेथून समजाविण्या सर्वार्थ । कृष्णे प्रारभिले ॥ १३१ ॥
'तत' 'त्व' पदाचे । अनावरणविधी केले तयाचे ।
परी हाती फक्त सालपट केळीचे । 'मी' वाचुनी ॥ १३२ ॥
ब्रह्माचे 'मी'शी करिता एकत्व । काढावे लागे ब्रह्माचे परोक्षत्व ।
घ्यावे लागे फक्त अपरोक्षत्व । न की सापेक्ष 'मी' 'तू'ते ॥ १३३ ॥
तैसे 'मी'चे ब्रह्माशी मिलाण करिता । 'मी'ची न काढावी लागे अपरोक्षता ।
म्हणूनि आपुलेपण न सुटता । जीव असे परब्रह्म ॥ १३४ ॥

१ "An object may be great but it cannot dispense with the subject Even the great God is thou only to me If I, then God The central position in respect of being is necessarily occupied by the subject or the I What is this I ? If we can find in it the unrelated and absolute being, which is the ideal of knowledge such knowledge alone can liquidate all duality for good The Atman or the self is no kind of object and does not therefore require any being beyond it to give meaning to it it alone can be in it self Truth and value here become one and indistinguishable Being itself is bliss We thus find that it is the true subject that must in the end devour the object, for it is the locus of both being and value"—Quotation from 'Being and value,' an article by Prof G R Malkani

सत्ता अपरोक्षतेत असे। तेथ मी तू सापेक्ष भेद नसे।
परी आपुलेपण सुटत नसे। परब्रह्मींही ॥ १३५ ॥
आपुलेपण सुटता। कवणा येई ब्रह्मरूपता।
'अहं ब्रह्मास्मि' ही वाक्यार्थता। अर्थहीन होई ॥ १३६ ॥

परब्रह्माचे स्वरूप शास्त्र वर्णिते परंतु शास्त्राचे मुख्य तात्पर्य खऱ्या 'मी'चेच वस्तुत ते स्वरूप आहे हे दाखविण्यात आहे परब्रह्म 'मी'मध्ये सामावलेले आहे 'भगवद्गीतेची गुरुकिल्ली' या ग्रंथात श्री शेठजी म्हणतात—

"मजवाचुनि अर्थ नसे। सच्चिदानंदा ॥ १७ ॥
'मी' केवल सत्ता असे। सच्चिदानंद हे मदंग असे।
तयाशी जो गुण समजे। तो जाण अविवेकी ॥ १८ ॥
सच्चिदानंद मदंग असे। परी तेथे द्वैत नसे।
अंगांगिभावहि नसे। पूर्ण अद्वैत हे ॥ १९ ॥
ऐशा अर्था 'मी' घेता। तोचि असे 'श्रीकृष्ण' तत्त्वता।
परंतु तोहि असेचि रिता। मदर्थावाचुनि ॥ २३ ॥
कृष्णार्थ तोचि मदर्थ। मदर्थ तोचि कृष्णार्थ।
मदर्थावाचूनि कृष्णार्थ। काहीच असेना ॥ २४ ॥

आपण सदा सर्वकाळ ब्रह्मरूप तर आहोतच आपल्या खऱ्या स्वरूपाच्या ज्ञानाने 'मी'बद्दलच्या आपल्या अज्ञानमूलक सर्व खोटया समजुती नाहीशा केल्या पाहिजेत म्हणून 'ज्ञानानेच मोक्ष मिळतो,' असे शास्त्रवचन आहे

## 'ज्ञानादेव तु कैवल्यं'–ज्ञानानेच मोक्ष आणि उपसंहार

'मोक्ष ज्ञानानेच मिळतो' हा वेदान्तशास्त्राचा महत्त्वाचा सिद्धान्त आहे मोक्षासाठीं साक्षात् साधन ज्ञानच होय कर्म आणि भक्ति चित्तशुद्धिद्वारा ज्ञानातच पर्यवसित होतात व ज्ञानाने मोक्ष मिळतो श्री शेठजी ज्ञानमार्गी आहेत म्हणून त्याचाहि मुख्य भर ज्ञानावर आहे योगी जसे समाधि लावून बसतात त्या समाधीने मोक्ष मिळणार नाही याविषयी श्री शेठजी म्हणतात—

"केवळ ब्रह्मस्वरूपात लीन होऊन जाण्यास ज्ञान म्हणता येत नाही तसे असेल तर समाधीनेदेखील अज्ञान नष्ट झाले पाहिजे अपरोक्ष ज्ञानाचा अर्थ स्वरूपात तन्मय होणे असा असेल तर आपण अपरोक्ष स्वरूपात तर नेहमीच राहतो, परंतु आपणास ब्रह्मज्ञान होत नाही, कारण आपण ब्रह्म तर हरहमेश आहोतच आहोत मोक्षाचा अर्थ काही–आपण ब्रह्माच्या बाहेर

पडलेले आहोत आणि नतर ब्रह्माकडे जाऊन त्याच्यात लीन व्हावयाचे आहे असा नाही मोक्षाचा अर्थ 'आपण ब्रह्म आहोत,' असे फक्त समजणे एवढाच आहे मात्र तसे समजणे वस्तूला अर्थ दिल्याशिवाय होणार नाही ज्ञानाचे ध्येय बुद्धीला 'अहं ब्रह्म'च्या बाबतींत दृढ निश्चय करून देणे एवढेच आहे परतु ज्ञानावाचून फक्त ब्रह्मात लीन झाल्याने अज्ञान जाणार नाही" (तत्त्वज्ञान विषयक व्याख्याने, पृ १७९)

श्री शेठजी ज्ञानमार्गी असले तरी त्याच्या अत करणात भक्तीचा ओलावा पुष्कळच दिसून येईल रोज दोन्ही वेळ ते नियमाने देवदर्शन घेतात त्या वेळी रामापुढे 'श्रीरामचन्द्र कृपालु भजमन हरण भव भय दारुण' ही तुळसीदासकृत रामस्तुति व इतर स्तोत्रे, मारुतीपुढे 'महावीर विक्रम बजरंगी। कुमति निवारण सुमति के संगी' ही मारुतीची 'हनुमानचाळीसा'तली स्तुति, आणि महादेवापुढे 'कैलासराणा शिवचद्रमौळी' ही शिवस्तुति मोठ्या प्रेमाने म्हणतात तथापि सगुणोपासनेच्या वेळीहि परमेश्वराचे तात्त्विक स्वरूप त्याच्या नजरेआड होत नाही म्हणून सरतेशेवटी अवधूत गीतेतला खालील श्लोक म्हणत असतात—

त्वद्यात्रया व्यापकता हता ते। ध्यानेन चेत परता हता ते।
स्तुत्या मया वाक्परता हता ते। क्षमस्व नित्य त्रिविधापराधान्॥

म्हणजे, हे परमेश्वरा! तुझी यात्रा करू गेल्यास जणु तुझ्या व्यापकतेला धक्का बसतो, तुझे ध्यान करू गेल्यास 'तू चित्ताच्या पर आहे' या स्थितीस जणु बाधा पोचते, तुझी स्तुति करू गेल्यास तुझ्या वाणीच्या पलीकडे असलेल्या स्वरूपावरच जणु आघात होतो तेव्हा तू आमच्या हातून प्रतिदिन होणारे हे त्रिविध अपराध क्षमा कर

त्याचा मुख्य भर सहजस्थितीचे स्वरूप चागले समजून तिच्यात स्थित राहणे या गोष्टीवर आहे म्हणून 'यद्यत्कर्म करोमि तत्तदखिल शभो तवाराधनम्' ही आन्तरिक भावना नेहमी जागृत ठेवण्याची खटपट ते करीत असतात श्रीतुकाराम महाराजाच्या शब्दात 'कर्मधर्म त्याचा झाला नारायण' किंवा एका हिंदी कवीने म्हटल्याप्रमाणे, 'जहॉं जहॉं जाऊ सोइ परिक्रमा, जो जो करू सोइ पूजा। सहज समाधि सदा उर राखू, भेद मिटादू दूजा॥' याप्रमाणे ते आपली चित्तवृत्ति ठेवण्याचा प्रयत्न करीत असतात

योग्याच्या काही वेळ लागून पुन्हा व्युत्थान पावणाऱ्या समाधीला शेठजी विशेष किंमत देत नाहीत, कारण या प्रकारच्या समाधीत अज्ञान कायम असते ज्ञानी पुरुषाची समाधि ज्ञानाच्या प्रभावामुळे कधीच भग पावत नाही लौकिकी दृष्टीने व्यवहार करीत असतानाहि या समाधीत खड पडत नाही श्रीएकनाथ महाराजानी या सहजसमाधीचे फारच सुदर वर्णन केले आहे श्रीनाथासारख्या अधिकारी पुरुषाची अमृततुल्य वचने उद्धृत करून आपण या प्रकरणाचा उपसहार करू —

"जेथ बाध्यबाधकता फिटली। सकळ अहं अविद्या तुटली। सहजसमाधी त्या नाव झाली। हे सख्या (शेवट) केली सिद्धान्ती॥ ऐसी जे सैर (सहज) समाधि अवस्था। तोचि भोग

भोगोनि अभोक्ता । कर्मे करोनि अकर्ता । जाण तत्त्वता तो एक ।। तो क्रिया कारण सयोगे । डुलत देखिजे विषयभोगे । परी समाधिमुद्रा न भगे । भोगसगे अलिप्त ।। तेवी पावोनि स्वरूपप्राप्ती ।। योगी प्रारब्धाच्या स्थिती । नाना कर्मे करिता दिसती । परी निजात्मस्थिती भगेना ।। यालागी समाधि आणि व्युत्थान । या दोही अवस्थाचे लक्षण । अपक्वासीचि घडे जाण । परी पूर्णासी लक्षण ते कैचे ।। स्वरूपावेगळे काही एक । पूर्णासी उरले नाही देख । समाधिव्युत्थानाचे मुख । त्या समुख येवो लाजे ।। अर्जुना देवोनि समाधी । सवेचि घातला महायुद्धी । परी कृष्णकृपानिधी । तटस्थ त्रिशुद्धी न करीच ।। यालागी समाधिव्युत्थानविधी । ताटस्थ्येसहित निरवधी । गिळूनि झाली सैर (सहज) समाधी । पूर्ण निजपदी विलसता ।।"

"स्वाधिष्ठान तेचि आसन । अखड त्यावरी आरोहण । तेथे येवोचि नेणे अभिमान । बैसले मन उठीना ।। नवल आसनाचे महिमान । हारपोनि गेले विस्मरण । कदा एकातु नोसडे जाण । हे सहजासन मुक्ताचे ।। जे आसनीचे समाधान । समाधि आणि व्युत्थान । करी दोहोची बोळवण । हें चालते आसन मुक्ताचे ।। जरी त्रैलोक्य हिडिन्नला । तरी ठायीहूनि नाही हालला । ऐसा न चळोनि मुक्तु चालला । जेवी अभ्रे धावला दिसे चद्र ।। मुक्तासी द्वद्वे आढळता । द्वद्वाची बुडाली द्वद्वता । तो सर्वी सर्वपणे असता । सहजे द्वद्वता निमाली ।।"—एकनाथी भागवत

याच अर्थाची 'स्वानुभव दिनकरा'तील ओवी पाहा —

"मग सहजस्थिती जिकडे पाहे । तिकडे स्वरूपचि देखताहे । त्रिगुण पचभूत विवर्जित आहे । स्वरूपचि अवघे ।।"

## श्रीमंत प्रतापशेठजी यांच्या ग्रंथांचा परिचय

श्री शेठजीच्या तत्त्वज्ञानाच्या परिचयातच त्याच्या ग्रथाचाहि परिचय वाचकाना त्यातील अवतरणामुळे अप्रत्यक्षपणे झालाच आहे तथापि आता त्याच्या ग्रथाचा प्रत्यक्ष परिचयहि थोडक्यात करून द्यावयाचा आहे शेठजीच्या तात्त्विक ग्रथामध्ये पहिले स्थान त्याच्या दोन लहान, ओवीबद्ध ग्रथाना द्यावे लागेल हे ग्रथ म्हणजे 'जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप?' आणि 'भगवद्गीतेची गुरुकिल्ली' हे होत या ग्रथामध्ये श्री शेठजीचे सपूर्ण तत्त्वज्ञान सारग्राहीरूपाने ग्रथित झालेले आढळून येईल यातील तात्त्विक प्रमेयाची माडणी फारच चटकदार असल्यामुळे पहिल्या ओळी-पासूनच हे ग्रथ वाचकाच्या मनाची पकड घेतात व ही पकड कडेपर्यत कायम राहते, हा त्याचा विशेष होय

यानतर त्याच्या 'खाजगी टिपणवही, भाग १ व २' याचा नबर लागतो यात निरनिराळे तात्त्विक मुद्दे गद्यात सूत्ररूपाने माडलेले आढळून येतील रोजच्या तत्त्वचर्चेत किंवा खाजगी चिंतनात स्फूर्तिरूपाने ज्या महत्त्वाच्या तात्त्विक गोष्टी शेठजीच्या मनश्चक्षूसमोर झळकू लागत, त्यानाच ग्रथरूपाने चिरस्थायी करण्याचा प्रयत्न या टिपणाच्या रूपाने केलेला आहे आता अलीकडेच त्याचा हिंदी अनुवादहि प्रकाशित झाल्यामुळे हिंदी वाचकाचीहि सोय झाली आहे

श्री शेठजीचा मोठा व भारदस्त ग्रथ म्हणजे ग्रथरूपाने प्रकाशित झालेली त्याची तत्त्व-ज्ञानमदिरात दिलेली तत्त्वज्ञानावरील व्याख्याने—या नावाचा होय यात श्री शेठजींनी इतर ग्रथामध्ये सूत्ररूपाने निर्दिष्ट केलेली आपली तात्त्विक प्रक्रिया बऱ्याच विस्ताराने उलगडून दाखविली आहे शिवाय चर्चेच्या ओघाने अनेक वादग्रस्त प्रश्नाचा विचारहि सविस्तर केला आहे हा ग्रथ वाचल्यानतर शेठजींच्या तात्त्विक प्रक्रियेबद्दल वाचकाच्या मनात कोणत्याहि तऱ्हेची अस्पष्टता रहात नाही याहि ग्रथाचा हिंदी अनुवाद प्रकाशित झाला आहे

याशिवाय त्यांची तात्त्विक व नैतिक विषयावर बडोदा, काशी इत्यादि स्थळी झालेली व्याख्यानेहि प्रकाशित झालेली आहेत

## परिशिष्ट १

## श्री. प्रतापशेठजी याच्या तत्त्वज्ञानाचा व ग्रंथांचा मथितार्थ

'आपल्या तत्त्वज्ञानाचा व ग्रथाचा माथितार्थ काय ?' हा प्रश्न आम्ही श्री शेठजींना हा निबध लिहावयाचे वेळी मुद्दाम विचारला त्यावर श्री शेठजींनी उत्तर दिले की, दोन गोष्टी जर उत्तम रीतीने समजल्या, पटल्या, आणि आत्मसात् झाल्या तर आमच्या तत्त्वज्ञानाचा व ग्रथाचा माथितार्थ पदरात पडला असे म्हणावयास हरकत नाही त्या दोन गोष्टी वरील निबधात निर-निराळ्या सदर्भात येऊन गेल्या आहेत तथापि त्याच्याकडे उत्कटतेने लक्ष वेधण्याच्या उद्देशाने आम्ही त्या पुन्हा एकत्र लिहीत आहोत

(१) पहिली गोष्ट ही की, प्राणिमात्राला 'हल्ली तर मी आहेच आहे' अशी नि शक खातरी असते ही खातरी विचारनिरपेक्ष व स्वयस्फूर्त या स्वरूपाची असते 'मी आहे किंवा नाही' असा स्वत बद्दल सशय कधीच कोणाला उद्भवत नाही तद्वतच, 'मी आहे' ही गोष्ट विचाराने, प्रमाणाने, अथवा तर्काने सिद्ध करावी लागत नाही, कारण 'मी'चे स्वरूप स्वयप्रकाश, स्वत सिद्ध आणि स्वयप्रमाण असते आणि म्हणूनच 'मी' हा कोणत्याहि ज्ञानाचा विषय होऊ शकत नाही त्याला बाह्यपदार्थाप्रमाणे विषयसरणीने ज्ञानात आणण्याची गरज पण नाही 'मी'ला ज्ञानाचा विषय करू गेल्यास अर्थाचा अनर्थ होईल, तो 'मी' 'मी' न राहता जड, दृश्य असा काल्पनिक पदार्थ होऊनच आपल्या हाती येईल, आणि खरा 'मी' निराळाच राहून जाईल शुद्ध निरुपाधिक 'मी' विचारविषय होणे शक्य नाही ज्या 'मी' ची इतकी थोरवी आहे त्या खऱ्या 'मी' बद्दल 'आज 'मी' आहे, परतु भविष्यकाळात 'मी' मरणार नाही कशावरून ?' अशा प्रकारच्या क्षुद्र शकेला तिळमात्रदेखील अवकाश नाही कारण मीच्या अस्तित्वाची तऱ्हाच अशा प्रकारची आहे की, तिच्यात नास्तित्वाला जागाच नाही 'मी' म्हणजे शुद्ध अमृतत्वाचा सागर आहे म्हणून त्याच्या-बद्दल तो मागे होता किंवा नाही, पुढे राहील किंवा नाही, अशा प्रकारच्या शका उद्भवू शकत नाहीत इतके निस्सादिग्ध त्याचे अस्तित्व आहे शिवाय असे पाहा की, अशा प्रकारची शका ज्यास

येते तोच तर ' मी ' आहे, आणि शका घेणारा शकेचा विषय कधींच होणे शक्य नाहीं त्याला निराळा समजूनच त्याचेसबधाने शका घेता येईल, आणि असे समजणे म्हणजेच त्या ' मी 'चे ज्ञान होय ही झाली एक गोष्ट

(२) दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे, कोणत्याहि वस्तूला अथवा क्रियेला रूप आणि अर्थ विचारातच सापेक्ष दृष्टीने येतात आमचे जे जे ज्ञान असते,—मग ते ब्रह्मज्ञान किंवा परमात्म्याचेंच ज्ञान का असेना—ते ते सर्व सापेक्षच असते सापेक्षता ही ज्ञानात असते, वस्तूत अगर क्रियेत नसते म्हणून बुद्धीचे विचारव्यापार सुरू होण्याचे पूर्वी क्रियेला अथवा वस्तूला रूप आणि अर्थ नसतात त्या वेळीं वस्तु आणि क्रिया शुद्ध सत्ता या रूपाने असतात परतु त्याच सत्तारूप क्रियेला किंवा वस्तूला आम्ही विषय करतों, म्हणजे विचाराच्या कक्षेत आणतो त्याच वेळीं त्याना विषय करण्यात किंवा आणण्यातच सापेक्षतेने रूप आणि अर्थ मिळतात या जगतीतलावरील यच्चयावत् क्रियाना आणि वस्तूना हाच न्याय लागू होतो जगातल्या सर्व क्रिया आणि वस्तु ' क्रिया आणि वस्तु ' या रूपाने आमच्या विचारातच निर्मित होत असतात, स्वरूपत तर त्या शुद्ध सत्तारूप म्हणजे सद्रूप असतात त्या केवळ किंवा शुद्ध सत्तेला विचाराच्या बाहेर रूप आणि अर्थ असत नाहीं विचाराच्या बाहेर तर त्या ब्रह्मरूप किंवा परमात्मरूप अथवा सद्रूप असतात आत्मस्वरूपाचा विचार करताना आम्हीं दाखविलेच आहे की, सत्ता फक्त ' मी 'चीच असते, व ती विचारानिरपेक्ष आणि स्वयसिद्ध या स्वरूपाची असते जगातील अस्तित्वाची खाण ' मी 'च होय, व अस्तित्वाची कसोटी पण ' मी 'च होय क्रियाची आणि वस्तूची सत्ता आणि ' मी 'ची सत्ता यात भेद नाहीं ' मी 'चीच सत्ता क्रियाची आणि वस्तूची सत्ता आहे भेद सर्व विचारात उद्भवतात विचारातच सापेक्षतेमुळे ' मी ' रूप किंवा सत्तारूप वस्तूना आणि क्रियाना रूप आणि अर्थ येतात सहजस्थितींत भेद नसतात या स्थळीं आम्ही वर दाखविलेली एक महत्त्वाची गोष्ट लक्षात घ्यावी कीं, ' मी ' हाच एक पदार्थ आहे, ' तू ' म्हणून दिसणारा—म्हणजे सर्व जग काही पदार्थच नाहीं सर्वत्र ' मी 'च ' मी ' भरलेला आहे या ' मी 'चा आपणास अनुभव असतो आपणास जे जगातील विषयाचे ज्ञान होते ते त्यातील सत्तेचे ज्ञान होत नसून बुद्धीने सद्रूप सत्तेला जे गुण लावलेले असतात त्या गुणामुळे त्या पदार्थाचे ठिकाणीं एक प्रकारचे जडत्व उत्पन्न होते व त्या जडत्वाचेच ज्ञान आपणास होत असते

अज्ञान-निवृत्तीसाठी, सत्याच्या ज्ञानासाठीं, किंवा मोक्षाच्या प्राप्तीसाठी वर दाखविलेल्या दोन गोष्टी पुरेशा आहेत मात्र त्या मनावर चागल्या तऱ्हेने बिंबल्या पाहिजेत तेवढे झाले तर सर्व काम झाले मग घटपटादीची खटपट नको, किंवा इतर क्रियाकलाप अथवा साधन नको मोक्ष फक्त ज्ञानानेच मिळतो ज्ञान दृढ झाल्याने मोक्ष करतलामलकवत् होऊन मनुष्यजीवनाचे साफल्य होते

## परिशिष्ट २

# ' मी 'चें अमरत्व व जन्ममृत्यूचे कल्पितत्व

श्री शेठजी यानी मोठ्या जिव्हाळ्याने व कळकळीने आमचा प्रस्तुत निबध वाचून त्यात बऱ्याच दुरुस्त्या केल्या आहेत शिवाय महत्त्वाची कामे बाजूस सारून ' मी 'च्या अमरत्वाबद्दल व मृत्यूच्या स्वरूपाबद्दल खालील मजकूर लिहून पाठविला आहे तो आम्ही त्यांच्याच शब्दात जशाचा तसाच देत आहोत

" दुसरे असे की, हल्ली तर मी आहेच आहे, पण भविष्यकाळी मी मरणार नाही कशावरून ? या शकेचे उत्तर असे की, तुमचा भविष्यकालीन मृत्यु हा तर तुमचा विषय आहे म्हणजे हल्ली तो तुम्ही नाहीं ( हल्ली तुम्ही काही मेलेले नाही ), मृत्यु तुमचेपासून वेगळाच आहे जी गोष्ट तुमचा विषय आहे, म्हणजे तुमचेपासून वेगळी आहे, ती केव्हाहि तुमचेपासून वेगळीच राहणार तो विषयरूपी पदार्थ केव्हाहि तुम्ही होणार नाही ही खुर्ची हल्ली तुमचा विषय आहे, म्हणजे तुमचेपासून वेगळी आहे, ती केव्हाहि तुम्ही होणार नाही, तुम्ही कधींच खुर्ची बनणार नाहीं असेच, मृत्यु हल्ली जर तुमचा विषय आहे, तो तुमचेपासून वेगळा आहे, तर तुम्ही केव्हाहि तो मृत्यु होणार नाही, म्हणजे तुम्ही केव्हाहि मरणार नाही

पुन्हा असे पाहा कीं, मृत्यूच्या कल्पनेला मृत्यूची कल्पना करणारा असावाच लागतो त्या कर्त्याचा अभाव जर आपण खरा धरून चाललो तर मृत्यु म्हणूनहि काही पदार्थ राहणार नाही, कारण मृत्यु हा आपल्याच कल्पनेचे भूत आहे ही कल्पना करणाऱ्या ' मी 'ला म्हणजे मला मृत्यु येणे शक्य नाही

आपण मरून पाहिले नाही की मृत्यु कसा असतो मृत्यूची कल्पना आपण झोपेवरून घेतलेली आहे झोपेत आपली जाणीव म्हणजे ज्ञान नाहीसे होते व झोप ही जाणीवरहित अधकारमय स्थिति असते त्याचप्रमाणे मृत्यूमध्येहि आपले ज्ञान राहात नाही व तीहि अधकारमय झोपेसारखी स्थिति आहे, म्हणजे झोपेचे स्वरूप आणि मृत्यूचे स्वरूप सारखेच आहे असे आपण समजतो – झोपेच्या स्वरूपात व मृत्यूच्या स्वरूपात आपण भेद समजत नाही मात्र झोप ही थोडा वेळ टिकते आणि मृत्यु हा कायमचा असतो, असे आपण समजतो परतु झोपेत जाणीव नाहीशी होते हा आपला मूळ समजच चुकीचा आहे झोपेत आपली जाणीव नाहीशी झाली आहे असे आपणास वाटत नाही, तर ' झोपेत मी काहींच जाणत नव्हतो ' असे जागे झाल्यावर आपल्यास वाटते, म्हणजे न समजणेपणाला स्वरूप जागृतीतच येते – हे आपल्या ज्ञानातच उत्पन्न होते झोपेत झोपेचे स्वरूप नसते तसे असते तर झोपेतच 'मला काही कळत नाही' असे वाटावयास पाहिजे होते आता झोपेचे न समजणेपणाचे स्वरूप जर जागृतीतच येते तर आपण सदैव जागृतच आहोत, म्हणजे आपल्या ज्ञानाचा अभाव कधीच होत नाहीं, तो ज्ञानाच्या विषयाचा अभाव असतो,

कारण ज्ञानाचा अभाव ज्ञानच जाणते यावरून तो ज्ञानाचा अभाव नसून त्याचे विषयाचा आहे– ही एक गोष्ट

दुसरे असे की, जी गोष्ट येणारी जाणारी आहे ती गोष्ट मृत्यूनतर तरी सदैव तशीच टिकून राहील, असे कसे म्हणता येईल ? कारण एकदा जिचा बाध कळून आला ती गोष्ट सदैव टिकणारी म्हणजे मूळ वस्तुस्थिति अर्थात् सत्य कधीच असू शकणार नाही सत्य तर नेहमी एक स्वरूपात असले पाहिजे, व जे एक स्वरूपात असते व ज्यात कधीच बदल होत नाही त्यालाच सत्य म्हणणे योग्य होईल ज्या गोष्टीचा एकदा बाध दिसून आला ती गोष्ट सत्य नसते, व म्हणूनच श्रीमद्भगवद्गीतेत ‘ जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुव जन्म मृतस्य च ’ म्हटले आहे

याचा अर्थ जन्ममृत्यु खरे आहेत असा नसून ते जर जाणारे येणारे आहेत तर ते दोन्हीहि खरे नाहीत ते आपल्यास जीवितदशेतच वाटतात मेल्यावर ‘ मी मेलो आहे ’ असे कधीच व कोणासहि वाटत नाही यावरून जन्ममृत्यु हे दोन्हीहि आपल्या अखड जीवितातलेच विषय आहेत हे उघड आहे

साराश, जागृति – सुषुप्ति वगैरे अवस्था व जन्ममृत्यु हे खरोखर काहींच नसून आपल्या अखड जीवितान्या सापेक्षतेनेच त्या आपल्यास वाटतात निरपेक्ष स्वरूपात, म्हणजे सहजस्थितींत तर त्याचा पत्ताच नसतो ”

॥ इति शुभम् ॥

---

# अनुक्रमणिका

# आठवणी

## १

लेखक —श्री. महेश्वर रामचंद्र करदीकर,
प्रताप मिलचे निवृत्त हेड क्लार्क, अमळनेर

श्रीमत प्रतापशेठ याचे बाबतीत मला आठवणारी मुख्य गोष्ट ही की, श्रीमत प्रतापशेठजी याचकडून माझे ४० वर्षाचे माहितीप्रमाणे कधीहि कोणत्याहि प्रकारे अपशब्द निघाला नाही ही फार उत्तम गोष्ट माझ्या अनुभवास आली आहे हा विशेष गुण आहे यात शका नाही

• • •

## २

लेखक —श्री महादेव गोविंद भालेराव, B A , LL B , अमळनेर

कोणताहि मनुष्यप्राणी पूर्ण अगर सपूर्ण असा नसतो प्रत्येक मनुष्यप्राण्याचे ठिकाणी गुण व अवगुण असे असतात सर्वसामान्य मनुष्यप्राण्याचे ठिकाणी आहार, निद्रा, भय वगैरे उपजत अशा काही भावनायुक्त क्रिया असतात, परतु मनुष्य हा एकच असा प्राणी आहे की, तो परिश्रमपूर्वक आपल्या भावनाची जोपासना करून त्याची शुद्धि करू शकतो इच्छा, फलासक्ति, ममत्व व अहकार, भीति, न्यूनत्व, श्रद्धा, भक्तिभाव, आत्मौपम्य वगैरे भावनाचे जे प्रकार आहेत, त्या भावनानी सामान्य

मनुष्याच्या जीवनावर फार महत्त्वाचे परिणाम घडतात मनुष्याचे मनात इष्ट व अनिष्ट अशा दोन्ही प्रकारच्या भावना उत्पन्न होतात अनिष्ट भावनांचे नियंत्रण करून त्यांचेवर प्रभुत्व मिळवून जो इष्ट भावनांची जोपासना व वाढ करू शकतो, तोच जगात यश व कीर्ति मिळवू शकतो जगात जे महा-पुरुष होऊन गेले, त्यांच्या चरित्राचे अवलोकन केल्यास मनुष्यप्राण्यामध्ये जे दुर्मिळ गुण विकासित होतात त्या दुर्मिळ गुणांचा समुच्चय झाल्यामुळेच ते महापुरुष बनले असे आढळून येईल भावनांचें नियंत्रण अगर मनोनिग्रह करण्याची बुद्धि अगोदर थोड्या लोकांना होते ती ज्या थोड्या लोकांना होते, तेहि त्यांचे दैनंदिन व्यवहारात जरूर असणारे मर्यादेपर्यंतच तिची जोपासना करण्याचा प्रयत्न करतात, परंतु आपणास " मोक्षा "चे उच्च ध्येय गाठावयाचे आहे हे उद्दिष्ट डोळ्यापुढे ठेवून त्याचे प्राप्तीकरिता सद्भावनांची जोपासना व विकास करणारी माणसे फारशी सापडत नाहीत आपला व्यवहार यशस्वी व्हावा म्हणून तेवढ्यापुरती शान्ति धरणे, स्पर्धा–असूया–मोह वगैरे अनिष्ट भावनांच्या फारसे आहारी न जाणे, कोणाची मने शक्य तो न दुखविणे, वगैरे व्यवहारोपयोगी गुण पुष्कळ माणसे आपले अंगी बाणवून घेतात संग्राहक वृत्तीला हे गुण आवश्यक असल्यामुळे संपत्तीचा संग्रह करण्या-करिता बरेच धंदेवाईक तेवढ्यापुरते गुणवान दिसतात परंतु संपत्तीचा संग्रह झाल्यानंतर बहुतेक श्रीमंत माणसांना त्यागी वृत्ति येत नाही संग्रह करण्याची वृत्ति मरेपावेतो बहुतेकांची कायमच असते त्याग-वृत्तीची थोडी थोडी जोपासना आयुष्याचे सुरुवातीपासूनच करावी, व ती त्यागवृत्ति आत्यंतिक वाढवावी असे ओळखून ती आचरणात आणणारी माणसे अगदी विरळा अशा अपवादात्मक धनिकां-पैकी श्रीमंत प्रतापशेठजी हे एक आहेत

श्रीमंत प्रतापशेठजींचे स्वभावात जे बरेच असामान्य पैलू आढळून आले त्यात त्यांची विनोदी व आनंदी वृत्ति, नियमित व पद्धतशीरपणा, कोणत्याहि बिकट प्रसंगास न डगमगता त्यास धैर्याने तोंड देणे, व्यवहारकुशलता, करारीपणा, तर्कशास्त्रशुद्ध विवेचनपद्धति, साधी राहणी व उच्च विचार-सरणी, शास्त्रीय ग्रंथांचे पठण व पाठान्तर, व मुमुक्षुवृत्ति प्रामुख्याने आढळून आली चतुर्थाश्रमात आत्मोन्नति करून घेऊन मोक्षप्राप्ति व्हावी अशा उद्दिष्टाने प्रेरित होऊन जी माणसे त्यास आवश्यक लागणारे गुणांचा व भावनांचा विकास करण्याचा सतत प्रयत्न करतात, त्यांपैकी श्रीमंत प्रतापशेठजी हे एक आहेत ऐहिक सुखाचे पलीकडे पारमार्थिक सुख असे काही तरी आहे, ते साध्य करून घेण्या-करिता चिंतन, मनन, ध्यानधारणा वगैरे जी साधने लागतात त्यांचे ते इच्छुक व अभ्यासी आहेत वाचन, मनन, निदिध्यास ह्यात अलीकडे त्यांचा बराच वेळ जातो 'वेदान्त' जाणण्याची व अनु-भवण्याची तळमळ त्यांचे ग्रंथावरून व त्यांचे दिनचर्येवरून अगदी स्पष्ट होते

लौकिक दृष्ट्या व्यवहारात त्यांच्या अंगचे जे गुण प्रत्यक्ष काही प्रसंगाने माझे अनुभवास आले, त्या प्रसंगांच्या त्रोटक आठवणी ह्या ठिकाणी नमूद करणे उचित होणार आहे त्यांची कुशाग्र बुद्धि व व्यवहारकुशलता ह्याबाबत खालील हकीकत साक्ष पटवून देईल

त्यांना इंग्रजी येत नाही त्यांचे शालेय शिक्षण मराठी चार इयत्तापर्यंत झाले आहे, परंतु कोणत्याहि प्रश्नासंबंधी तर्कशुद्ध व सूक्ष्म विचार करून अचूक सिद्धान्त काढण्याइतकी त्यांची बुद्धि व

तेजस्विता आहे इतका मानसिक विकास करून घेण्याकरिता त्यांनीं पूर्ववयात निश्चयपूर्वक प्रयत्न केले असले पाहिजेत अदाजे तीस-बत्तीस वर्षांपूर्वीची ही गोष्ट त्याना एक गुतागुतीचा करारनामा करून पाहिजे होता त्यात करारनामा करून देणार व करारनामा करून घेणार ह्याचे परस्पराचे हक्क व जबाबदाऱ्या अगदी काटकोरपणे नमूद करणे जरूर होते ते असे की, त्या बाबतीत पुढे कोणत्याहि प्रकारचा सदिग्धपणा अगर उणेपणा राहून वाद उपस्थित होऊ नये काही परस्परामधील स्थावर इस्टेटीचे पूर्वीचे हक्कसबध सोडून देऊन समिश्र पद्धतीचे नवीन दीर्घ मुदतीचे हक्क-सबध निर्माण करावयाचे होते उभय पक्षाकडून आम्ही त्या बाबतीत जरूर ती कागदपत्राची व तोडी माहिती घेतली, व शक्य तेवढी चिकित्सक दृष्टि वापरून एक आठवडाभर खपून एक लाबलचक मसुदा तयार केला व तो त्याचेकडे पाठविला त्यावर तीन-चार दिवस विचार करून त्यानी व्यवहारात येणाऱ्या अडचणीपासून उत्पन्न होणारा असा एक मुद्दा काढला की, ज्यामुळे सदर मसुद्यात सदिग्धपणा व उणीव राहात होती, व त्यामुळे पुढे कदाचित् कोणास तरी कोर्ट-कचेरी करावी लागली असती अर्थातच मसुद्यातील तो दोष कबूल करून त्याप्रमाणे मसुद्यात दुरुस्ती करण्यात आली ममुदे करण्याचे काम आपण फारच सोपे समजतो, व महत्त्वाचे अनत दस्तऐवज ( उदा०— खरेदीखते, बक्षीसपत्रे, मृत्युपत्रें, भागीदारी पत्रे, भाडेपट्टे वगैरे ) साध्या अर्जनवीसाकडून लिहून घेतो त्यामुळे पुढे वाद उत्पन्न झाल्यास कोर्टात अर्थाचा अनर्थ कसा होतो, आणि दस्तऐवज लिहून देणार व लिहून घेणार ह्याचे ध्यानीं मनीं नसणाऱ्या शर्तीहि पुढे कशा लादल्या जातात ह्याची कोर्टकचेरीशीं सबध असणाऱ्यान्या नेहमींची अनुभवातील गोष्ट आहे जे पक्षकार व्यवहारकुशल, कुशाग्र बुद्धीचे व दूरदर्शी असतील, तेच अशा सभाव्य आपत्ति टाळू शकतात ह्या करारनाम्याचे मसुद्याचे प्रसगी त्याचे अगी असलेली व्यवहारकुशलता, चिकित्सक बुद्धि व दूरदर्शीपणा ह्या व्यवहारोपयोगी लागणाऱ्या गुणाची साक्ष पटली मसुदा करणाराजवळ नुसते कायदेशीर पाडित्य व ( Forms & Precedents ) चे पुस्तक असून भागत नाहीं, तर त्यास एक प्रकारची दूरवरच्या अडचणींचा विचार करून त्याबाबत सर्व शर्ती दस्तऐवजात बिनचूक नमूद करण्यास लागणारी व्यवहारी चिकित्सक बुद्धीची जरुरी असते व त्यामुळेच ( Conveyancing ) हा वकिली पेशातील साधासुधा प्रकार नसून तो ह्या धद्यातील एक कष्टसाध्य असा भाग आहे

मनुष्याचे हातून कोणतीहि कृति घडण्यास अगोदर त्यास ती कल्पना सुचावी लागते मग मनाचा जो धर्म विचारशक्ति त्यास चालना मिळते ती कृति बरी की वाईट ह्याचा विचार सदसद् बुद्धि करते हे ठरविल्यानतर ती कृति तावडतोब घडवून आणण्याकरिता मनुष्याचे अगी एक प्रकारची धडाडी, करारीपणा, त्याच एका कृतीवर व विचारावर रात्रदिवस तळमळ, वगैरे गुण ज्याचेजवळ असतील, तो ती कामे घडवून आणून यशप्राप्ति करून घेतो असा अनुभव आहे शेठजीनी आपले आयुष्यात जी धडाडीची, खासगी व सार्वजनिक स्वरूपाची कामे केली, त्यात खासगी कामे म्हणजे उद्योग-मदिरे ( कापडाच्या गिरण्या), व सार्वजनिक हिताची कामे म्हणजे आरोग्य व विद्या-मदिरे ही होत प्रताप हॉस्पिटल व प्रताप कॉलेज ही जणू काही त्याची अपत्येच होत त्यातल्यात्यात आरोग्यमदिराचे काम फारच खर्चाचे व अवाढव्य आहे आज आपणास जो प्रताप हॉस्पिटलचा पसारा दिसत

आहे, त्याचे उगमस्थान कसे व कोठे असेल हे समजणे कठिण आहे शेठजींचे कल्पनेत व विचारात त्याची मूळ उत्पत्ति आहे हे खचित ! सन १९३५ साली पॅरिस येथे Gas-Poisoning मुळे त्याची व त्याचे पत्नीची जी प्राणान्तिक अवस्था झाली, व त्या व्याधि-निवारणार्थ तेथील उत्तम डॉक्टरानी त्याना जी नि स्वार्थ व निस्सीम वैद्यकीय मदत दिली, त्या वैचारिक आंदोलनामुळे अमळनेर येथे प्रताप हॉस्पिटलसारखी योजना झाली असावी प्रथम प्रथम त्याचा विचार तीन-चार लाख रुपये दान करून एक ॲलोपॅथिक व एक आयुर्वेदीय दवाखाना अमळनेर शहरवासीयाकरिता चालवावा असा असावा, परतु मानवी प्राण्याच व्याधि-निवारण नुसत्या दवाखान्याने होत नाही, व त्याकरिता आधुनिक सुसज्ज असे हॉस्पिटल लागते, व साधारण हॉस्पिटलला ३०–४० लाख रुपये लागतात मनुष्यप्राण्यान्या व्याधिनिवारणार्थ इतके सम्पत्तिदान आपणास करता येईल की नाही व तशी योजना अमळनेरसारख्या गावी यशस्वी होईल की नाही ह्याचे वैचारिक झगड्यात त्याची ३-४ वर्षे गेली असावींत, व १९४० सालचे दिवाळीचे सुमारास त्यानी अमळनेर येथे ४०–५० रोग्याकरिता हॉस्पिटल, व दोन दवाखाने काढण्याचा निर्धार केला हा ठाम निश्चय ता १४-११-१९४० रोजी झाला, व गावातील ५–६ व्यक्तींना तो कळवून सोसायटी स्थापन करून तो धडाडीने अमलात आणण्याचा त्यानी सकल्प केला सोसायटीची स्थापना करून तिचे कायदेकानू करून ती रजिस्टर करून आणण्यास कित्येक महिने लागतात असा आपला अनुभव आहे परतु निश्चयी, करारी व धडाडीचा माणूस एखाद्या सकल्पित घटनेवर सर्व प्रयत्न केन्द्रित करून आपला सकल्प कृतीत तावडतोब कसा आणू शकतो हे शेठजींच्या प्रताप हॉस्पिटलच्या उदाहरणावरून स्पष्ट दिसून येतं ता १४-११-१९४० ला निर्धार झाला रात्रीचा दिवस करून सदर सोसायटीचे Rules and Regulations ता १५-११-४० रोजी तयार झाले व सोसायटी स्थापनेचा अर्ज १५-११–१९४० रोजी लिहून सोसायटीच्या सभासदान्या सह्यानिशी तो रवाना झाला, व सोसायटी अवघ्या सहा दिवसात स्थापून, नोंदणीहि झाली ! सोसायटीच्या मालकीची एक फूटभराहि जागा अमळनेरात नव्हती लागलीच ३०–४० एकर जमीन विकत घेऊन त्यावर लाखो रुपयान्या इमारती तयार होऊन प्रत्यक्ष हॉस्पिटलचे अवाढव्य काम ता १७-११-१९४४ रोजी सुरूहि झाले एक निश्चयी व धडाडीची व्यक्ति आपली अधुक कल्पना परिश्रमाने व तळमळीने किती अल्प मुदतीत साकार करू शकते ह्याचे हे दृश्य आहे जवळजवळ अशीच हकीकत प्रताप कॉलेजची आहे "निश्चयाचे बळ । तुका म्हणे तेचि फळ" ही श्रीसंत तुकाराममहाराजाची उक्ति शेठजींसारखी करारी माणसेच अर्थपूर्ण करून दाखवू शकतात प्रताप हॉस्पिटल व प्रताप कॉलेज ह्याना चिरकाल स्थैर्य प्राप्त करून देण्याबद्दल त्याची तळमळ अवर्णनीय आहे,–व अवर्णनीय राहील

मनावर ताबा ठेवण्याची त्याची हातोटी व कोणत्याहि प्रसगास धैर्याने व चिकाटीने तोड देण्याची त्याची वृत्ति अनेक वेळा अनुभवास आलेली आहे एकदा एका शेअर होल्डरने त्याचा पाहुणा म्हणून त्याचा आठपधरा दिवस पाहुणचार घेऊन, शेठजींचा पाहुणा म्हणून रा भाऊसाहेब देव याचेकडून मिलबद्दल बरीच माहिती काढून घेतली, व नतर त्याचे मनाप्रमाणे शेठजींकडून त्याची सभावना न झाल्यामुळे त्याचेवर अवास्तव आरोप रचून फौजदारी फिर्याद दाखल केली फौजदारी

फिर्यादी हा श्रीमत माणसांना भेडसाविण्याचा व आपसात समजुतीने पैसे उकळण्याचा नेहमी प्रयत्न असतो, व तो पुष्कळ वेळा यशस्वी होतो त्याप्रमाणे ह्या फिर्यादीचे प्रसंगीसुद्धा फिर्यादीस काही तरी देऊन फिर्याद मिटवावी असे प्रयत्नहि झाले परंतु शेठजींनी तो मार्ग पत्करण्यास साफ नकार दिला व ४-५ वर्षे झगडून व मनस्ताप सहन करून फिर्यादीची फिर्याद हायकोर्टापर्यंत जाऊन रद्द झाली ह्या फिर्यादीचे काम चालू असता एका फार महत्त्वाचे दिवशी, म्हणजे ज्या दिवशी आरोपीचे जाब-जबाब वगैरे होते त्या दिवशी, कोणाहि सामान्य माणसाचे चित्त दुसऱ्या महत्त्वाचे कामाकडे गुंतणे अगर गुंतविणे सर्वसाधारण सामान्य माणसास शक्य होत नाही परंतु खटल्याचे काम सुरू होण्याचे अगोदर दहा मिनिटेपावेतो शेठजींना मिलच्या दुसऱ्या एका महत्त्वाच्या कामात एकाग्रचित्ताने मग्न झालेले मी पाहिले तेव्हा मेंदूतील निरनिराळे कप्पे आपले ताब्यात कसे ठेवावे, व एका कप्प्यातून दुसरे कप्प्यात आपले मन कसे सहज लीलेने वळवावे, ही कला शेठजींना पूर्णपणे अवगत असल्याचे आमचे निदर्शनास आले एका विचारातून व बाबीतून मन काढून टाकून ते दुसरे विचारात व बाबींत मग्न करणे ही मोठी अवघड गोष्ट आहे व ती ज्यास साध्य झाली आहे तोच मनुष्य दुःखातहि सुख अनुभवू शकतो हे आपण जगात पाहतो परंतु ही कला बहुसंख्य लोकांना प्राप्त होत नाही त्यास सहेतुक मानसिक प्रयत्न लागतात, व ते केल्यानंतरहि फार थोड्या माणसांना काही प्रमाणातच साध्य होऊ शकते आपल्या इच्छेप्रमाणे मनोव्यापार चालू ठेवणे व मनोव्यापारावर संपूर्णतया ताबा ठेवणे ही कला शेठजींना अवगत आहे असे आढळून येते परंतु एका विषयावरून मन काढून ते दुसऱ्या ठिकाणी लावणे हे इतकेसे कठिण नाही, पण ते मन निर्विकार व निर्विचार करणे हे मात्र तपश्चर्येशिवाय कोणासहि साध्य करून घेता येणार नाही असे शेठजींचे म्हणणे आहे अन्तर्गत मनाचे जे गुणधर्म आहेत त्यातील विचार-विकार ह्या उपाधि संसारात राहून नाहीशा करता येणे जवळजवळ अशक्य आहे असे त्यांचे म्हणणे आहे

त्यांच्या विनोदी वृत्तीमुळे ते इतके व्याप सांभाळूनहि समाधानात राहू शकतात, व त्यांचे सहवासात येणाऱ्या माणसांनाहि ते आनंदी करू शकतात अमळनेरच्या म्युनिसिपालिटीत आम्ही १५-१६ वर्षे काम केल्यानंतर सन १९३६ साली जे इलेक्शन होणार होते त्या वेळी आपण म्युनिसि-पालिटीत उभे राहावयाचे नाही असे आम्ही ठरविले, परंतु काही मित्र व चहाते यांनी फार आग्रह केला व शेवटी शेठजींनीहि आग्रह केला प्रताप मिलचे एक अधिकारी व मी असे एकाच वॉर्डात उभे राहिलो मतदार समसमान मते देतील अशी शेठजींची अपेक्षा होती, परंतु प्रताप मिलचे अधिकारी व मिलमधील मजूर-मतदार ह्यांचे संबंध नित्याचे असल्यामुळे त्या अधिकारी उमेदवाराने सर्व मते आपणासच देण्याचा घाट अपरोक्ष जमवून आणला त्यामुळें त्या इलेक्शनमध्ये मजला अपयश आले आपले आग्रहावरून कोणासहि उभे करून त्यात अपयश आले तर आपण त्या अपयशाची काही कारणे मागून उमेदवाराचे सान्त्वन करतो परंतु त्या अपयशाची काहीच कारणमीमांसा न करता त्या अप-यशामुळे मनाची खिन्नता विनोदी वृत्तीने कशी घालविता येते हे खालील लहानशा उदाहरणावरून दिसून येईल वरील इलेक्शननंतर जेव्हा शेठजींची व आमची प्रथम भेट झाली, तेव्हा मला पाहिल्या-बरोबर त्यांनी तेथे असलेल्या नोकरास "डॉक्टरांना घेऊन ये" असे एकदम सांगितले एकदोन

मिनिटांनीं मी त्यांना विचारले, "कोण आजारी आहे?" तेव्हा त्यांनी सांगितले की, "आमचे घरी कोणी आजारी नाहीं, परंतु तुम्ही 'पडलात' असे मीं काल ऐकले, तेव्हा तुम्हास भिती लागले हे डॉक्टरकडून तपासून घेऊन तुम्हास औषधोपचार करावा म्हणून डॉक्टरांना बोलावतो आहे" त्यावरून एकच हशा पिकला लगेच ते म्हणाले की, "हे 'पडणे' शारीरिक नसून तुमच्या दुखावलेल्या भावनांना डॉक्टराचा काही उपयोग होणार नाही तरी तुम्ही स्वत तुमचे डॉक्टर बनून आलेले अपयश विसरून जाणे हाच तुमचे 'पडण्या'वर उपाय आहे" विनोदात समाधान करण्याची केवढी प्रचण्ड शक्ति भरलेली आहे, हे त्या वेळीं माझे अनुभवास आले

त्यांचे लहानपणी केलेल्या धार्मिक ग्रंथाचे पाठान्तर अद्याप जसेच्या तसे कायम आहे असा मला एकदा अनुभव आला धारवाडचे एक संशोधक ह्यांना श्रीसुरेश्वराचार्य ह्यांचे चरित्र लिहावयाचे होते, व त्याकरिता त्यांना एक ग्रंथ पाहिजे होता सदरचे चरित्र लिहिण्यापूर्वी चरित्रनायकाचे जन्मस्थान म्हणून महेश्वर मण्डलेश्वर येथे ते जाऊन आले, परंतु त्यांना जो ग्रंथ पाहिजे होता तो त्यांना इंदूर वगैरे ठिकाणीं मिळाला नाही अमळनेर येथे एक तत्त्वज्ञानमंदिर आहे, व तेथे अशा प्रकारचे ग्रंथाचा मोठा संग्रह आहे असे कळल्यावरून ते येथे आले व त्यांना इतर ठिकाणी न मिळालेला ग्रंथ खरोखरच तत्त्वज्ञानमंदिरात मिळाला आठ दिवस येथे राहून त्या ग्रंथातून त्यांना पाहिजे होती ती टाचणे त्यांनीं करून घेतलीं त्यानंतर त्यांनीं अशा तत्त्वज्ञानमंदिराचे संस्थापक श्रीमंत प्रतापशेठजी ह्यांना भेटण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून त्यांना शेठजीस भेटण्यास घेऊन गेलो त्यांनीं शेठजींना येथे येण्याचा उद्देश सांगून त्यांना लागणारा ग्रंथ तत्त्वज्ञानमंदिरात मिळाल्याबद्दल समाधान व्यक्त केले व तत्त्वज्ञानमंदिराची स्थापना केल्याबद्दल शेठजींना धन्यवाद दिले त्यांना श्रीसुरेश्वराचार्य ह्यांचे जे चरित्र लिहावयाचे होते त्या चरित्रनायकाचे ग्रंथाची माहिती व त्याचे महत्त्व ते शेठजींना सांगू लागले त्यांची अशी समजूत असावी की, शेठजींना त्या ग्रंथाची माहिती, अगर निदान त्याचा अभ्यास नसावा तीन चार मिनिटे झाल्यावर शेठजींनी त्यांना सांगितले की, "मला माझे गुरुजींनी त्या ग्रंथाची माहिती दिली आहे, एवढेच नव्हे तर त्यांनी माझेकडून त्याचे पाठान्तरदेखील करून घेतले आहे" असे म्हणून त्यांनी "नैष्कर्म्यसिद्धि" ग्रंथ पाठ म्हणण्यास सुरुवात केली, व सात–आठ मिनिटांत ग्रंथाचा एक अध्यायच पाठ म्हणून दाखविला तेव्हा धारवाडचे पाहुणे बरेच स्तिमित झाले अर्थातच त्या ग्रंथाचे महत्त्व शेठजींना सांगण्याचे त्यांनी थांबविले शेठजींनी ५५–६० वर्षापूर्वी केलेले पाठान्तर त्यांचे वयाचे सत्तरावे वर्षी (ही गोष्ट सन १९४९–५० मधील आहे) त्यांनी मुखोद्गत खटाखड म्हणून दाखविले ह्यावरून त्यांचे सखोल अभ्यासाचा व पठणशक्तीचा मासला आम्हास पाहावयास मिळाला, व धारवाडचे पाहुण्याबरोबर मीहि आश्चर्याने थक्क झालो

श्रीमंत प्रतापशेठजींची राहणी अगदी साधी आहे त्यांचे बोलण्यात महाराष्ट्रीय व हिंदी साधु-संतांचे वाङ्मयातील दृष्टान्त यथोचित प्रसंगीं ऐकावयास मिळतात उच्च व प्रागतिक विचाराचे ते एक प्रतीकच आहेत मी तर त्यांना "सनातनी सुधारक" ह्या कोटीतील समजतो त्यांचे अंगी असलेल्या गुणसमुच्चयामुळे जुन्या व नव्या जमान्यातील जे चांगले असेल, त्याची सांखळी

जोडण्याचे विलोभनीय समाजकार्य अशाच पुरुषान्या हातून घडेल, असा माझ्याप्रमाणे पुष्कळाचा दृढ विश्वास आहे

• • •

३

लेखक —श्री **व्यकटेश जयकृष्ण मुंजे**

श्रीमान शेठजीन्या गौरवग्रथ महोदधिमध्ये ही माझी प्रेम व आदराने भरलेली श्रद्धाजलि या लघु लेखाचे रूपाने अर्पण करीत आहे

**जिनकी रही भावना जैसी । प्रभु मूरत देखी तिन तैसी ।**

कौरवाचे सभेत ज्या वेळी श्रीकृष्ण परमात्मा शिष्टाई करण्याकरिता गेले, व ज्या वेळी त्याना दुर्योधनाने बाधण्याचा प्रयत्न केला त्या वेळी ते सभेतील लोकाना त्यान्या भावनेप्रमाणे कोणाला योद्धा, तर कोणाला मल्ल, तर कोणाला प्रेमळ मित्र, अशा निरनिराळ्या सरक्षक व सहारक स्वरूपात दिसले, असे श्रीमद्भागवतात वर्णन आहे तसेच श्रीमान शेठजी व्यापाऱ्यास उत्कृष्ट व्यापारी, रसिकास उत्तम रसिक, वेदान्त्यास उत्तम वेदान्ती, अशा तऱ्हेचे त्याचे दर्शन त्यान्या गौरवग्रथात दिसून येईल मलाहि ते असेच निरनिराळ्या स्वरूपात दिसले, त्याचे दिग्दर्शन थोडक्यात खाली केले आहे

श्रीमान प्रतापशेठजीचा व माझा प्रथम परिचय सन १९०९ साली मी चोपड्यास मे रायली ब्रदर्स या कपनीत नोकरी करीत असताना झाला ते मधून मधून चोपड्यास येत असत तेव्हा व्यवसायानिमित्त त्याची भेट होत असे मी त्या वेळी त्याचेकडेस एक श्रीमत व प्रसिद्ध व्यक्ति या दृष्टीने पाहात असे त्याना रोज सायकाळी फिरण्यास जाण्याची सवय आहे, व मीहि त्याचेबरोबर फिरावयास जाऊ लागलो त्याचेबरोबर त्याचे परमपूज्य गुरु कै सावळाराममास्तर व इतर स्नेही मडळी ही असायचीच फिरताना किंवा बैठकीत ते अध्यात्मविषयावरच चर्चा करीत असत या चर्चेत भाव, अभाव, सापेक्ष–निरपेक्ष, अपरोक्षता, ब्रह्म, आत्मा-आणि शेवटी "मी" मी अशा शब्दाची चर्चा चालत असे पण मला त्या वेळी त्यातील एक अक्षरहि समजत नसे, व हे मोठमोठे लोक वारवार " मी " " मी " काय म्हणतात याबद्दल आश्चर्य वाटत असे पण पुढे कालातराने जेव्हा मला या " मी " चा खरा अर्थ कळला, तेव्हा पूर्वीचे अज्ञान जाऊन मला कृतार्थता वाटली व आनद झाला

ज्या वेळी चोपड्यास वर उल्लेख केलेली अध्यात्म-चर्चा चालत असे, त्या वेळी मलाहि तो विषय समजावा अशी इन्छा उत्पन्न झाली व त्याप्रमाणे मी श्रीमान शेठजीस विनती केली त्यानीहि ती माझी उत्सुकता पाहून फार प्रेमाने आणि आनंदाने मान्य केली, व त्या गहन विषयातील प्रथम

धडे देण्यास सुरुवातहि केली पुढे तर ते जेव्हा चोपड्यास येत तेव्हा मला बोलावून घेत आणि विषय समजावून सांगत परमपूज्य कै सावळाराममास्तर हे त्या वेळी चोपड्यास रहात असत तेहि माझ्याकडे येऊन फार आस्थेने विषय समजावून सांगत, व माझ्या शंकाचे निरसन करीत असे हे उभयता मला गुरुस्थानी असून त्यानी माझ्यावर जे अध्यात्मविषयाचे संस्कार केले व मला जी गोडी लावली ह्या त्यांच्या उपकाराची फेड कधी होईल असे मला वाटत नाही

सन १९३४ साली मी प्रताप मिलमध्ये नोकरीस राहिलो व आजहि म्हणजे १९५४ साली त्याच नोकरीत आहे या वीस वर्षांचे दीर्घ कालात श्रीमान शेठजीशी माझे नित्य संबंध येत गेल्यामुळे त्यांचे अंगी असलेल्या अनेक गुणापैकी मला जे प्रामुख्याने दिसले ते म्हणजे-प्रसिद्धिपराङ्मुखता, विनोदप्रियता, उत्कृष्ट व्यवहारचातुर्य, आणि नित्यनेमाने अध्यात्मचर्चा, असे सांगता येतील

श्रीमान् शेठजीना सर्व लोक प्रतापशेठ याच नावाने ओळखतात पण ते स्वत आपले हे नाव कधीहि सांगणार नाहीत, व त्यांचेसमक्ष हे नाव सांगून त्यांची ओळख करून देणेहि त्याना खपत नाही त्याना कोणी त्यांचे नाव विचारले तर ते मोतीलाल माणकचंद असेच सांगतील गावाचे नाव विचारले तर मारवाडातील त्यांचे राहत्या गावाचा उल्लेख करतील, पण चोपडा म्हणून सांगणार नाहीत कारण चोपडा हे गाव त्यांचे नावाने प्रसिद्ध आहे पण कस्तुरीचा सुगंध हा जसा छपविण्याचा प्रयत्न केला तरी छपत नाही, तसे शेवटी त्यांची इच्छा नसली तरी 'प्रतापशेठ' म्हणून त्यांची प्रसिद्धि होतेच, त्याला त्यानी तरी काय करावे ? प्रभु इच्छा बलीयसी !

त्यांच्या अनेक विनोदप्रचुर आठवणी या गौरवग्रंथात प्रसिद्ध होतील माझीहि एक आठवण या ठिकाणी नमूद करीत आहे मनुष्य आनंदात, चैनीत असला तर त्याला विनोद सुचणे स्वाभाविक आहे पण आसन्नमरण स्थितीत त्यांची विनोदबुद्धि कायम राहणे ही एक और गोष्ट आहे श्रीमान् शेठजी १९२५ साली पॅरिस येथे विषारी वायूने आजारी झाल्यानंतर त्याना बोटीने मुंबईस आणण्यात आले त्या वेळची त्यांची स्थिति पाहून सर्व स्नेही, सोयरे, आप्तइष्ट अत्यंत चिंतातुर झाले होते बोट बंदरात आल्यानंतर त्यांची भेट घेण्याकरिता व कुशल विचारण्याकरिता बोटीवर वरील माणसांची रीघ लागली होती त्यातच धुळे मिलचे त्या वेळचे लोकल एजन्ट कै श्री आप्पासाहेब केळकर हेहि भेटीकरिता गेले श्री आप्पासाहेब यांचा एक डोळा कृत्रिम होता, व हे शेठजीना माहीत होते श्रीमान् शेठजींचे भेटीचे वेळी नकळत त्या डोळ्याचा पांढरा भाग वर आला, व बुबुळाचा काळा भाग आत गेला हे श्री शेठजींच्या लक्षात आले व ते आप्पासाहेब याना विनोदाने म्हणाले, "आप्पासाहेब, आपला हा डोळा पांढरा कसा झाला ?" तेव्हा आप्पासाहेबांचे लक्षात आले की, आपला डोळा फिरला असावा नंतर त्यानी तो दुरुस्त केला

श्रीमान शेठजींच्या व्यवहारचातुर्याचीहि एक गोष्ट येथे नमूद करतो कोणता मनुष्य काय उद्देशाने आपणाकडे येत आहे हे श्री शेठजी चटकन् ओळखतात त्यांचे उत्तरहि त्यांचेपाशी तयार असते उमरावतीच्या एका प्रसिद्ध व्यायामशाळेला युरोपमधील एका देशाचे आपले खेळ करून दाखविण्याकरिता बोलावणे होते परदेशात ५० खेळाडूना घेऊन जाणे म्हणजे मोठ्या खर्चाचे काम.

या खर्चाला मदत मिळावी म्हणून वरील व्यायामशाळेचे पथक इतर गावी खेळ करीत अमळनेरला आले त्याच्या राहण्याची व खाण्यापिण्याची सर्व व्यवस्था श्रीमान शेठजींनीच केली त्याना आर्थिक मदताहे मिळावी म्हणून अमळनेरच्या काही प्रसिद्ध व व्यायामप्रेमी मडळींचे एक डेप्युटेशन श्रीमान् शेठजींकडे आले त्यानी ओळखले की ही मडळी मदत मागण्याकरिताच आली आहे डेप्युटेशनने सरळ सरळ मदत न मागता उद्याचे खेळाचे कार्यक्रमाचे प्रसगी आपण अध्यक्ष व्हावे अशी विनती करण्याकरिता आम्ही आलो आहो असे श्री शेठजींना सागितले त्याचे मनातील उद्देश असा की, शेठजींना अध्यक्ष केले म्हणजे त्याना मान दिल्यासारखेहि होईल व पैशाची मदतहि मिळेल परंतु श्रीमान शेठजींनी त्याचेपुढे असा पेच टाकला की मी अध्यक्ष झालो तर मदत देणार नाही, व मदत पाहिजे असेल तर अध्यक्ष होणार नाही तेव्हा काय पाहिजे ते सागा, असा सवाल केला ते हा डेप्यु-टेशन मधील मडळीनाहि पेच पडला की काय उत्तर द्यावे आपण शेठजींना प्रथमच अध्यक्ष व्हा अशी विनती केली, व आता त्याना आपण अध्यक्ष नको पण मदत पाहिजे असे कसे सागावे ? ही आपत्ति व पेच टाळण्याकरिता डेप्युटेशनमधील मडळीने शेवटी श्रीमान् शेठजींना आपण अध्यक्षच झाले पाहिजे अशी आग्रहाची विनती केली, व त्याचे अध्यक्षतेखाली दुसरे दिवशीचा कार्यक्रम पार पडला

वरील प्रसगाला अनुसरून श्रीमान् शेठजींनी अशी टीका केली की, अलीकडे लोकाचा असा समज झाला आहे की, अध्यक्षपदाचा मान दिला म्हणजे देणगी मिळते पण हे बरोबर नाही हे असे उदाहरणाने दाखवून द्यावे लागते

शेवटी सर्व गुणावर कळस म्हणजे त्याची अध्यात्माविषयी असलेली लहानपणापासूनची आवड ही आवड, प्रेम, श्रद्धा, त्याचे ठिकाणी त्याचे गुरु कै सावळाराम मास्तर यानी उत्पन्न केली, व ती त्याचे ठिकाणी इतकी दृढ आणि बद्धमूल झाली आहे की, एखादे वेळी जेवण न मिळाले तरी चालेल, पण रोज नित्य नेमाने सकाळ–दुपार दोन तास ब्रह्मचर्चा ही झालीच पाहिजे (व हा लाभ मलाहि मिळतो) याचा परिणाम म्हणजे ' ससारी असूनि निराळा ' अशी त्याची भूमिका झाली आहे कितीहि सकटे येवोत, कितीहि प्रकृति बिघडो, ते आपल्या आत्मनिष्ठेपासून आपले मन यत्किंचितहि ढळू देत नाहीत याचे एक उदाहरण म्हणजे, पुण्याला ते पोटदुखीचे व्यथेने अत्यत आजारी अस ताना व पोटात कॅन्सर झाले आहे की काय अशी भीतीहि उत्पन्न झाली असताना त्याच आजारात 'जीविताचा अर्थ' हा सुप्रसिद्ध लेख त्यानी लिहिला आहे,–त्यावरून खात्री होईल

अशा या महान् पुरुषाचे सहवासाचा लाभ गेले ४५ वर्षे मला मिळाला, आणि मिळत आहे हे मी माझे परम भाग्य समजतो, आणि यापुढेहि असाच मिळो अशी श्री परमेश्वराची अत -करणपूर्वक प्रार्थना करून हा लेख पुरा करतो





[ लेखक—**श्रीराम माधव चिंगळे,** एम् ए, तत्त्वज्ञानमंदिर, अमळनेर ]

श्रीमत प्रतापशेठजीचा व माझा परिचय सुमारे पधरा वर्षांपूर्वी अगदी पहिल्याने झाला श्री. शेठजी त्या वेळीं नेपाळच्या यात्रेस जाताना मध्ये प्रयागला उतरले होते तेथे गुरुवर्य प्रा रामभाऊ रानडे याचे अतिथि या रूपानें, मी ज्या जागीं रहात असे त्या होळकर वाड्यातच त्याचा मुक्काम होता, आणि प्रा रानडे यानीच मला त्याची नीट व्यवस्था ठेवण्याबद्दल आज्ञा केली होती ठराविक वेळेवर सर्व मडळी आली परतु आलेल्या मडळीकडे बघून शेठजी बहुतेक मागाहून येत असावे असा माझा समज झाला व खुद्द शेठजीनाच त्याचा व्यवस्थापक असे समजून, शेठजी केव्हा येणार असा प्रश्न मी, विचारून बसलो शेठजी पडले पक्के गमती व स्वभावाचे विनोदी शिवाय त्याना त्यांच्या साध्या राहणीमुळे असे प्रसग पूर्वीहि अनेक वेळा येऊन गेलेले तेव्हा, आपण जणु शेठजींचे कारभारी याच थाटाने व आविर्भावाने त्यानी उत्तर दिले, ‘ शेठजी आले ’ या उत्तराने मी अमळ बुचकळ्यात पडलो, कारण माझी सर्वसामान्य शेठ नामधारी व्यक्तीची कल्पना निराळीच होती मोठी मारवाडी पगडी, मारवाडी थाटाचे धोतर, मोठे पोट, वगैरे वगैरे परतु उपस्थित मडळींमध्ये तर या कल्पनेस उतरणारी एकहि व्यक्ति नव्हती थोड्याच अवकाशात सर्व मडळी बैठकीवर आपापल्या इतमामा-प्रमाणे स्थानापन्न होताच मला कळून आले की, आपण ज्याना शेठजींचे कारभारी समजलो तेच खुद्द शेठजी होत. या प्राथमिक विचित्रशा परिचयातच श्री शेठजींच्या राहणीचा कमालीचा साधेपणा माझ्या मनावर बिंबला, व हे शेठ काही और आहेत असे मला कळून आले पुढील परिचयात हा माझा प्राथमिक समज अधिकाधिक दृढ होत गेला विशेषत या बाह्यत दिसून येणाऱ्या साधेपणाबरोबरच त्यांच्या चेहऱ्यावर एक प्रकारचे पावित्र्याचे, ज्ञानाचे, उच्च सस्कृतीचे व एका विलक्षण प्रतिभेचे तेज झळाळत असलेले मला प्रथमदर्शनीच दिसून आले, व अशा व्यक्तीने तत्त्वज्ञानमदिरासारखी सस्था नसती काढली तरच आश्चर्य, असा विचार माझ्या मनात शेठजीकडे पाहता पाहता येऊन गेला श्री गुरुवर्य रामभाऊ रानडे यानीं श्री शेठजींशी माझा परिचय करून दिला व नतर माझे श्री शेठजींशी सभाषण सुरू झाले सभाषण सुरू होताच मला आश्चर्याचा दुसरा धक्का बसला, कारण आत्मज्ञानाचा प्रसग निघताच शेठजी सभाषणात इतका काही जिव्हाळा ओतू लागले, त्या विषयाशी इतके काही समरस होऊ लागले की, ही व्यक्ति अध्यात्मशास्त्रातहि चागलीच मुरब्बी आहे, त्यात पूर्णपणे मुरलेली आहे अशी माझी खात्री झाली यामुळे माझा जो दुसरा समज होता की, शेठ लोकाचा अध्यात्मज्ञानाशी अहिनकुलवत् सबध असतो, —त्यालाहि धक्का बसला

त्या वेळी नुकतेच माझे प्रयाग विश्वविद्यालयातील उच्च शिक्षण सपले होते, व माझ्या भावी आयुष्याची दिशा ठरू पाहात होती अध्यात्मज्ञानासाठी स्वत स वाहून घ्यावे असे मला मनापासून वाटे, व त्या दृष्टीने अनुकूल वातावरणाच्या शोधात मी होतो तथापि तत्त्वज्ञानमदिरात मला प्रवेश

मिळण्यासारखा नव्हता कारण महाविद्यालयीन शिक्षणात तत्त्वज्ञान हा माझा विषय नव्हता तरी पाहावे प्रयत्न करून, या दृष्टीने मी भीतभीतच शेठजींच्या कानावर सर्व परिस्थिति घातली परंतु माझ्या प्रश्नाला नकारार्थी उत्तर मिळाले असते तर मला मुळींच आश्चर्य वाटले नसते मला आश्चर्य वाटले ते शेठजींच्या होकारार्थी उत्तरामुळेच विशेषत ज्या अगत्याने व जिव्हाळ्याने आणि आपुलकीच्या भावनेने श्री शेठजींनी मला सस्थेचे ठरलेले नियम डावलून सस्थेत प्रवेश देण्याचे कबूल केले ते पाहून मला अगदी गहिंवरून आले, व माझ्या मनात नुकतेच अकुरित होत असलले अध्यात्मज्ञानाचे रोपटे झपाट्याने वाढू लागले त्या वेळचे श्री शेठजींचे शब्द जणु आताच उच्चारलेले आहेत इतक्या स्पष्टपणे मला आजहि आठवतात ते म्हणाले, ' चिगळे, आमची सस्था तुमच्यासारख्या अध्यात्म-मार्गातील खऱ्या जिज्ञासूसाठीं तर आहेच, परतु अशी माणसे भेटणेच कठीण अधिकाश लोक पाथस्थाप्रमाणे येतात, नोकरी मिळताच सस्था सोडून जातात तेव्हा, तुम्ही फिलॉसॉफी घेऊन एम ए झाला नाहीत तरी हरकत नाही तुमची अध्यात्माची उत्कट जिज्ञासा हाच एक गुण पुरेसा आहे तुम्ही अवश्य या आणि हवे तितके दिवस सस्थेत राहा तुमच्या ध्येयास अनुकूल सर्व सवलती सस्थेत तुम्हाला मिळतील " आणि खरोखरीच कबूल केल्याप्रमाणे माझ्या अपेक्षेच्या बाहेर सवलती मला देण्यात आल्या उदरनिर्वाहापुरती आर्थिक मदत मला मिळाल्यामुळे शास्त्राध्ययनास व अध्यात्म चिंतनास मला सर्वस्वी वाहून घेता आले सस्थेतील प्रत्येक सदस्यावर काहीं ना काहीं तरी कर्तव्याचे बधन असतेच परतु यापैकीं अनेक वर्षे माझ्यावर कोणतेहि बधन लादण्यात आले नाही या बाबतीत मला पूर्ण स्वातत्र्य देण्यात आले, व त्याचा मी पुरेपूर सदुपयोगहि केला क्वचित्प्रसगी यामुळे सस्थेच्या अधिकाऱ्याशीं विरोध निर्माण होण्याचा प्रसग आला असताना श्री शेठजींनी माझी बाजू सावरून धरली, व आपले दिलेले वचन पुरे केले माझ्या आध्यात्मिक विकासास याप्रमाणे श्री शेठजींनी चागलाच हातभार लावल्यामुळे मी त्याचा मनापासून आभारी आहे अनेक प्रसगी तर श्री शेठजींनी माझ्या आर्थिक स्वरूपाच्या प्रापचिक अडचणीतूनहि स्वत मदत करून मला सोडविले आहे मला इतके दिवस निष्ठेने अध्यात्म साधनात गढून जाता आले ते यामुळेच माझ्या वरील स्वानुभवावरून शेठजींच्या ठायीं वसत असलेली माणसाची पारख, त्याची अध्यात्म ज्ञाननिष्ठा, जिज्ञासूना सर्वतोपरि मदत करण्याची तयारी, त्याचा तत्त्वज्ञानमदिर ही सस्था उघडण्याचा उद्देश, आपद्ग्रस्ताना मदत करण्याची तयारी, आपल्या सस्थेतील नियमाना यान्त्रिक स्वरूप न येऊ देता गरज असल्यास त्याना बाजूला सारण्याची तयारी ( Following the spirit of the rules and regulations and not their letter ) इत्यादि अनेकानेक गुण श्री शेठजींच्या ठायीं वसत असलेले दिसून येतील किती तरी मडळी श्री शेठजींच्या या व इतर गुणाची साक्ष याच गौरव-ग्रथात देतील

माझ्या अंमळनेरच्या तत्त्वज्ञानमदिरातील गेल्या पधरा वर्षांच्या वास्तव्याच्या काळात श्री शेठजींना अगदी जवळून बघण्याची सधि मला मिळाली आहे यामुळे त्याच्या चारित्र्याचा व व्यक्तिमत्त्वाचा मला चागलाच परिचय झाला आहे काय असेल ते असो, तत्त्वज्ञानमदिरातील व्यक्तीबद्दल शेठजींना विलक्षण जिव्हाळा व आपलेपणा वाटतो ज्या वेळी इतराना शेठजीजवळ जाण्यास

सक्त मनाई असते अशाहि वेळी - घरी, दारी, शय्येवरी, भोजनी इ. प्रसंगी गड्यास 'फिलॉसफी[1] मे आये है ऐसा बोलो' हे जादूचे शब्द सांगताच थोड्याच वेळात गडी सर्द होऊन लगेच परततो व 'जाइये साहेब', असे म्हणून नरमतो व मनात थोडासा वरमतोहि. 'फिलॉसफी' हे एक बडे प्रकरण आहे असे त्यास वाटत असेल. बाह्य जगात वस्तुस्थिति याच्या उलटदेखील असेल, किंवा आहेहि परंतु 'फिलॉसफी'चा बडेपणा व्यवहारी जगात असो किंवा नसो, तथापि श्री शेठजींच्या बड्या मनात त्याचा उगम व कायमचे वास्तव्याहि आहे, ही गोष्ट निश्चित व निर्विवाद होय.

श्री प्रतापशेठजी 'साधी राहणी व उच्च विचारसरणी' या ध्येयाची प्रत्यक्ष मूर्ति होत. बाह्यत त्यांचे जीवन अतिशय साधे आहे. त्यात चार जणांच्या जीवनापेक्षा कोणतेहि वैशिष्ट्य दिसून येणार नाही. शेठजी श्रीमंत असले तरी त्यांची श्रीमंती परोपकारार्थ आहे. स्वतःच्या अत्यावश्यक गरजा खेरीज करून निव्वळ चैनीसाठी त्यांनी आपला पैसा कधीच खर्च केला नाही. या दृष्टीने ते स्वतःस गरीब समजूनच वागतात. घरी एकदा दोन भाज्यांना सोडून तिसरी भाजी करण्यात आली. तिला पाहून शेठजी म्हणाले, "आपण इतके श्रीमंत नाही, आपणास दोनच भाज्या पुरे." जोडा अगदी निकामी होईतोपर्यंत त्याला नीट करून वापरतील. एकदा तर त्यांचा रबरी जोडा फिरावयास जाताना वाटेतच कामातून गेला. तथापि घरून दुसरा जोडा न मागविता शेठजी तसेच अनवाणी पायांनी चालत आले, आन्तरिक भावना ही की, गड्यास उगाच तसदी नको, व एखादे प्रसंगी तशीहि सवय हवी. एकदा मसाज (मालिश) चालू असताना विशेष सवलतीच्या परवानगीने मला त्यांचेजवळ जाण्याचा प्रसंग आला. तेव्हा जे दृश्य पाहिले त्यामुळे मी तर आश्चर्याने थक्कच झालो. गोणपाटाच्या गादीवर शिवून नीट केलेली चादर अंथरलेली आहे व तिच्यावर शेठजी मोठ्या आनंदाने बसलेले आहेत! हे पाहून मी म्हटले, "लखपति गृहस्थाचा थाट तर पाहा!" यावर शेठजींनी हसून उत्तर दिले, 'आम्ही स्वतःसाठी लखपति नाही.'

वरील साध्या, काटकसरीच्या राहणीबरोबर त्यांची विचारसरणी मात्र फारच उच्च प्रकारची आहे. त्यांच्या लहानसहान गोष्टींमध्येदेखील एक प्रकारची उच्च सांस्कृतिक पातळी दिसून येईल, व तिच्या खाली शेठजी कधीच जाणार नाहीत. विनोददेखील त्यांना खालच्या पातळीवरचा चालणार नाही. त्यांच्याकडे येणाऱ्या कीर्तनकारांना प्रथमतःच सूचना देण्यात येते की, निव्वळ लोकांना हसविण्याच्या दृष्टीने फाजील विनोद नको. मात्र विनोद मुळीच नको असे शेठजींचे म्हणणे नाही. इतके अरसिक ते खास नाहीत. तसा त्यांचा स्वभाव बराच विनोदी आहे. तथापि कीर्तनाचा रसभंग करणारा व मर्यादेचे उल्लंघन करणारा विनोद त्यांना पसंत नाही. ज्यामुळे कीर्तनाच्या मुख्य रसाचा परिपोष होईल, व जो ग्राम्य स्वरूपाचा नाही अशा विनोदास शेठजी कधीच हरकत घेत नाहीत. ते स्वतः विनोद करीत असताना या मर्यादा कसोशीने सांभाळतात. ही सांस्कृतिक मर्यादा शेठजींच्या प्रत्येक हालचालीत दिसून येईल. कोणत्याहि विषयावर संभाषण त्यांना उच्च पातळीवरून हवे असते. विशेषत तात्त्विक चर्चा तर त्यांची फारच उच्च भूमिकेवरून चालते. एकदम तत्त्वाचा

[1] अमळनेरला बहुतेक लोक 'तत्त्वज्ञानमंदिर' या संस्थेला 'फिलॉसफी' या नावाने ओळखतात.

ठाव घेणारी चर्चा त्याना पसत असते निव्वळ शब्दाचा काथ्याकूट करणे–या गोष्टीचा त्याना मनापासून तिटकारा आहे कोणत्याहि विषयावर सभाषणाचा प्रसग आल्यास शेठजी त्यात मनमोकळे-पणाने भाग घेतील, तथापि त्याची खरी कळी खुलते ती अध्यात्मविषयाच्या निरूपणाच्य प्रसगी म्हणून कित्येकदा फिरावयास जाताना त्याचेबरोबर सतोषम नावाचे गृहस्थ 'दीपरत्नाकर' चालता चालताच वाचताना दिसून येतील, व शेठजी तिकडे नीट लक्ष देऊन ऐकताना व त्यातील गहन ओव्याचा खुलासेवार अर्थ करीत असताना दिसून येतील तद्वतच जगलात टेकडीवर जाऊन पोचल्यावर शिपीबोवा श्री आचार्याच्या 'सदाचार' या स्तोत्रावर हसस्वामीची टीका वाचीत असताना दिसून येतील डुमासला तर अहर्निश ज्ञानसत्रच चालू असते सकाळी उठल्याबरोबर शेठजी प्रथमत तत्त्वचिंतनास प्रारभ करतात, व या तत्त्वचिंतनाचे वेळी स्फुरलेली विचारमौक्तिके आपल्या कापऱ्या हाताने लिहून काढतात

श्री शेठजीच्या अगी पुष्कळच उत्तम गुण आहेत शेठजी दररोज श्रीरामचद्रप्रभूच्या दर्शनाचे वेळी एक श्लोक म्हणत असतात, त्यात रामाच्या ठायी वसत असलेल्या गुणाचाच उल्लेख आहे ---

धर्मे तत्परता मुखे मधुरता, दाने समुत्साहता ।
मित्रेऽवचकता, गुरौ शरणता, चित्तेऽतिगभीरता ।।
आचारे शुचिता, गुणे रसिकता, शास्त्रेषु तादात्म्यता ।
वैराग्ये परता, शिवे भजनता, त्वय्यस्ति भो राघव ।।

आम्हास तर असे वाटते की, श्री शेठजीनी भगवान रामचद्राचा आदर्श पुढे ठेवून त्याचे गुण हेतुपुरस्सर आपल्या जीवनात आणण्याचा कसोशीने प्रयत्न केला असावा कारण वरीलपैकी सर्वच गुण शेठजीमध्ये बऱ्याच मोठ्या प्रमाणात दिसून येतात भगवान् रामचद्र मर्यादापुरुषोत्तम होता शेठजीचे वागणेहि सर्व तऱ्हेने मर्यादशील आहे ते धर्मनिष्ठ आहेत, तोडाने गोड बोलणारे आहेत, 'दानशूर' तर ते आहेतच वचना ते कोणाचीहि करणार नाहीत, मग मित्राविषयी तर बोलावयासच नको ते स्वत म्हणतात, 'आम्हास सहसा कोणी फसवू शकणार नाही कदाचित् कोणी फसविले तरी आम्ही मात्र कधीच कोणाची फसगत करणार नाही शेठजी नितान्त गुरुभक्त आहेत, प्रवृत्तित च अतिशय गभीर आहेत शुद्ध आचारविचाराचे आहेत, गुणिजनासाठी रसिक पण आहेत, शास्त्रातील तत्त्वाशी समरस आहेत, प्रपचात असूनहि त्यात आसक्त नाहीत, तत्त्वचिंतन तर त्याचे नेहमीच चालू असते

शेठजीच्या ठायी अनेकानेक गुण आहेत तथापि आमच्या दृष्टीने त्याच्यात वसत असलेला सर्वात मोठा गुण म्हणजे त्याना आपल्या ठायी असलेल्या दोषाचे किंवा कमतरतेचे ज्ञान असणे—हा होय या बाबतीत शेठजी अतिशय प्रामाणिक आहेत ते स्वत कबूल करतात, "मला कीर्ति हवी आहे, या बाबतीत मी नि स्पृह नाही तथापि मला पोकळ कीर्ति नको मला भरीव कीर्ति हवी आहे ज्यामुळे लोकाचे खरे कल्याण होईल, व ज्यामुळे टिकाऊ स्वरूपाचा परोपकार घडेल अशा प्रकारची

कामे करूनच मला कीर्ति हवी आहे" इतरानीं त्यांची पुष्कळ स्तुति केली तरी ते म्हणतात, 'माझे अवगुण मला चांगलेच कळतात व जाणवतातहि' त्यांचे वरील शब्द ऐकून मी त्यांना म्हटले, 'शेठजी' आपल्या अभ्युदयाचे खरे रहस्य या आत्मपर्यवेक्षणातच आहे" मनुष्य स्वभावत च गुणदोषमय असतो असें असूनहि ज्याला आपण पूर्णपणे निर्दोष आहोत असे वाटते, त्यांच्या ठिकाणी अहंकार निर्माण होऊन हाच मोठा दोष निर्माण होतो. अहंकार हा तर सर्व दोषाचे व अनर्थाचे मूळच आहे सुदैवाने आमचे सर्वांचे प्रिय असलेले शेठजी या दोषापासूनहि मुक्त आहेत

त्यांच्या या अमृत-महोत्सवाच्या समयीं त्यांना दीर्घ आयुरारोग्य देण्याबद्दल परमेश्वरास विनंती करण्याचे कामी अनेकांबरोबर मीहि सहभागी होत आहे

• • •

## ५

### लेखक—दि. द. क्षीरसागर

खानदेशांतील उन्हाळा मे महिना बंगल्याभोंवती वाळू पसरलेली दुपारी एक वाजता मी जेवणानंतरची वामकुक्षी करीत होतो इतक्यात दारावर टिचकी वाजली दार उघडताच एक बैरागी आत शिरला माझ्या प्रतिकाराला न जुमानता त्याने माझे भविष्य सांगायला सुरुवात केली आरंभीच्या बिनचूकपणानें मी त्यांच्या आहारी गेलो हातावरील रेषा पाहून तो म्हणाला, "साहेब, तुम्ही एकदा विलायतेला जाऊन आला आहात आणि दुसऱ्यादा लवकरच जाल" मी आश्चर्याने विचारातच पडलो कारण मी नुकताच १९३२ अखेर परत आलो होतो व पुन्हा जाण्याची शक्यता स्वप्नातहि नव्हती मी म्हणालो, "मग जाऊन परत आल्यावरच तुम्ही या १९३४ च्या जुलैच्या सुमारास मला × शेठजींचे पत्र आले "आधुनिक यंत्रसामुग्री विकत घेण्यासाठी व देशाटन करण्या-करिता आम्हीं युरोपला जाण्याचे निश्चित केले असून तुम्हास बरोबर न्यावयाचे आहे"

१९३६ च्या जुलै महिन्यात तो बैरागी माझ्या बदललेल्या पत्त्यावर नेमका आला व आपले बक्षीस सव्याज घेऊन गेला १९३४ च्या सप्टेंबरमध्ये शेठजींचा विलायतेला जाण्याचा बेत जाहीर झाला, व मी कार्यक्रम आखण्याच्या पत्रव्यवहारामध्ये गर्क झालो शेठजींच्या लोकप्रियतेमुळे त्यांना महाराष्ट्रात बऱ्याच प्रमुख ठिकाणी मेजवान्या झाल्या गाड्याबरोबर नळ्याला यात्रा प्रत्येक ठिकाणी माझी वर्णी लागली आणि शेवटी शेवटी तर अजीर्णाने प्रकृति बिघडण्याची पाळी आली

---

× टीप —लेखास जागा मर्यादित असल्यामुळे श्रीमंत प्रतापशेठजी यांचा उल्लेख करताना फक्त शेठजी या शब्दाचा उपयोग केला आहे तरी वाचकानी कसलाहि गैरसमज करून घेऊ नये

बरोबर जाणाऱ्याची सख्या वाढत वाढत दहापर्यंत गेली त्यामध्ये शेठजी, सौ बाईसाहेब, श्री बाबूशेठ, चोपड्याचे मगनशेठ, सुरतचे अबालाल, धुळ्याचे रामभाऊ शिंपी, बेजामिन, मी व दोन नोकर ( स्वयपाकी दाते व चपरासी नामदेव ) असे आम्ही दहा जण झालो ता ६-१-३५ ला आम्ही मुबईस कपडे व इतर सामान खरेदी करण्यास गेलो मगनशेठने कटाक्षाने सर्व कपडे खादीचे तयार केले आम्हा सर्वांकरिता थड हवेत आवश्यक असे देशी लोकरीचे कपडे केले जरूरीची औषधे पेट्या, वगैरे सर्व तयारी झाली

शेठजीना निरोप देण्याचे समारभ अनेक झाले त्यापैकी उल्लेख करण्यासारखा म्हणजे प्रताप मिलमधील मजूर व अधिकारी यानीं दिलेला होय एवढा सर्व परिवार सोडून पुष्कळ दिवसासाठी इतक्या दूर जाण्याच्या विचाराने शेठजींचें मन विपण्ण झाले होते जणू आपल्या मुलाबाळाना सोडून जात आहोत असे त्याना वाटत होते मजुराच्या सभेतून शेठजीबद्दल वाटणाऱ्या प्रेमाच्या लाटा उसळत होत्या हाराचा ढीग पडला अनेक हृदयद्रावक भाषणे झाली सर्वांनी एकमुखाने शेठजीचे शुभचिंतन केले

मिलच्या मुसलमानानी अल्लाची प्रार्थना करून सागितले की, ही आमची ठेव आम्ही तुझ्याकडे ठेवतो आहोत ती आम्हाला सुरक्षित परत करावी

आमचा अमळनेर सोडण्याचा दिवस झपाट्याने जवळ येत होता पासपोर्ट वगैरे तयारी परिपूर्ण झाली, व ता ९ मार्च १९३५ ला सायकाळच्या गाडीने आम्ही मुबईस जाण्यास निघालो त्या दिवशी भावनावश होऊन मजुरानी जवळजवळ सुटीच घेतली मिलपासून तो स्टेशनच्या प्लॅटफॉर्मपर्यंत मुगीसाहि शिरकाव नाही अशी माणसाची गर्दी झाली तेथून वाट काढीत काढीत शेठजीच्या गाडीला स्टेशनपर्यंत पोहोचण्यास अर्धा तास लागला जयजयकाराने आकाश दुमदुमून गेले इतकी माणसाला माणूस भिडणारी गर्दी पूर्वी कधी झाली नसेल आगगाडी सुटण्याची वेळ होत आली तसतसा शेठजींचा व लोकाचा दु खावेग जास्त होत गेला इकडे गिरणी ओस पडून सर्व मजूर स्टेशनवर गेले, व त्या अमळनेरच्या लहानशा प्लॅटफॉर्मवर हालण्यासहि जागा मिळेना शेठजींच्या कृपेचा प्रसाद मिळालेल्या सर्व सस्थातील माणसे तेथे आलीं होती शेठजीवरील भक्तीचा अमाप अलोट पूरच उसळला होता १० तारखेस आम्ही मुबईस येऊन पोहोचलो

१४ मार्च उजाडला सकाळची न्याहारी वगैरे आटोपून आम्ही ९ वाजता बोटीच्या धक्क्यावर गेलो पासपोर्ट, प्रकृति तपासणे वगैरे शास्त्रविधीतून पार पडून बोटीवर चढण्यास ११ वाजले धक्क्यावर निरोप देण्यास ४-५ शे मडळी आली होती उत्साहाचे रूपातर दु खात होऊन अश्रूच्या सरीवर सरी कोसळू लागल्या शेठजीच्या मद गतीच्या पावलात जणू पुढील भविष्यच दिसत होते लॉईड ट्रिस्टीनोची व्हिक्टोरिया बोट सुटली व अत करणाचे बध ताणू लागले लोखडाची बोट, तिला कसली भावना ! ती दूर दूर जाऊ लागली असख्य आप्तमित्राच्या अश्रूनी भिजलेले हातरुमाल फक्त दिसू लागले आमचे अश्रु समुद्रांत पडले व त्याने ते आत्मसात् करून टाकले

बोटीवरील दिवस एकामागून एक जाऊ लागले. शेठजीच्या बरोबर आणलेले फराळाचे सामान एक दोन दिवस पुरले व्हिक्टोरिया बोटीवर हिन्दी पद्धतीचे सर्व जेवण मिळत असे ते

खाण्याचे शेठजी व सौ बाईसाहेब यांनी नाकारले बोटीच्या कप्तानाने आमच्या सर्व विनंत्या झिडकारून स्वयंपाक करण्यास परवानगी दिली नाही दोघेहि जवळजवळ उपासच करू लागले महात्मा गांधींच्या देशातीलच शेठजी, हे कप्तानाच्या लक्षात आले नाही चार दिवस झाले बोट एडनहून पुढे गेली, तरी दोघांनी अन्नग्रहण केले नाही ह्या सत्याग्रहाचा तडाखा कप्तानास चांगलाच बसला व शेठजींनी आपल्या अमोघ अस्त्राने नमविल्यावर त्याने बोटीवरील स्वयंपाकघरातील कोपऱ्यात लोखंडी पत्रा टाकून त्यावर स्वयंपाक करण्यास परवानगी दिली, बोट लागण्याची मुदत संपून गेली होती बोटीवरील शेठजींचा कार्यक्रम व्यवस्थित पार पडू लागला मार्च महिना होता तरी लाल समुद्रातील उष्णता असह्य होती विशेषत युरोपियन लोकांना अंगावर कपडे ठेवणेहि अशक्य होत होते परंतु सुवेझच्या जवळ आलो तसतशी उष्णता कमी झाली सुवेझ कालव्यातून बोटीला फार कमी वेगाने जावे लागते मंदगतीने ती पोर्ट सैयदला पोहोचेपर्यंत प्रवाशांना सुवेजहून मोटारने निघून कायरो पाहून पोर्ट सैयदला ती गाठता येते त्याप्रमाणे आम्ही कायरो शहर व पिरॅमिड पाहण्याची संधि साधली कायरोहून पिरॅमिडचा प्रवास उंटावरूनहि करतात उंटावरली स्वारी पुष्कळांना बोटीपेक्षाहि लागली परंतु शेठजी लहानपणापासून त्या बाबतीत पटाईत असल्यामुळे त्यांनी यातील खरी मजा लुटली पिरॅमिड पाहून आम्ही सर्व पोर्ट सैयदला बोटीमध्ये बसलो बोटीवरील कार्यक्रम साधारण रोजच्यासारखाच होता जेवताना तीन गट पडावयाचे शेठजी व सौ बाईसाहेब आपल्या केबिनमध्ये दाते याने केलेल्या शुद्ध भारतीय भोजनाचा आस्वाद घ्यायचे इतरांपैकी रामभाऊ, बेंजामिन व मी मांसाहारी विभागात बसत असू मगनशेठ, बाबूशेठ व अंबालाल आपले शाकाहाराचे निराळेच टेबल पकडायचे मधून मधून दाते याने केलेली भाजी-आमटी आम्ही चाखीत असू आमच्या मांसाहाराच्या खमंगपणाबद्दल मी मगनशेठ, अंबालालना चिडवीत असे तर तेहि त्यांच्या भजी–पापडाबद्दल बढाई मारत असत

नेपल्स येथे उतरून पुढील प्रवास आगगाडीने करावयाचे सर्वानुमते ठरले बेंजामिनचा ओढा इंग्लंडकडे जास्त होता पण ते उलट जास्त खर्चाचे झाले असते, म्हणून अगोदर इतर सर्व देश पाहून मग इंग्लंडला जाण्याचे मी सुचविले कोणताहि पेचप्रसंग निर्माण झाला असता आघाडीवर आमचे "तानाजी मालुसरे" नेहमी मगनशेठ असत त्यांच्या पुढारीपणामुळे माझी सूचना स्वीकारण्यात आली दिवसामागून दिवस गेले, आणि एके दिवशी आमची बोट इटली आणि सिसिली यांचेमधून जाऊ लागली वरती आकाश व खाली पाणी या कंटाळवाण्या वातावरणातून जमिनीचे दर्शन मिळालेल्या डोळ्यांना त्या वेळी अत्यानंद झाला २४ मार्चला सकाळी बोट नेपल्सला लागली स्वयंपाकाची व्यवस्था असणारे हॉटेल शोधून काढण्यास बराच वेळ लागला नेपल्स येथे आमचा मुक्काम दोन दिवस होता नेपल्सच्या आसपासची पॉपई व व्हेसुव्हिअस ही दोनच ठिकाणे आम्ही पाहिली व्हेसुव्हिअसच्या कोपाने भस्मसात् झालेल्या पॉपईचे काही अवशेष पाहून हृदय विदारून जाते मोठमोठी मंदिरे, सभागृहे व इतर मोठमोठ्या इमारतींचे भग्नावशेष पाहून शहराच्या त्या वेळच्या वैभवाची कल्पना येते ह्यापुढेच व्हेसुव्हिअस ज्वालामुखी आहे आम्ही सर्वजण एका मोठ्या फियाट गाडीतून वर चाललो होतो सडक संपताच गाडी थांबल्यावर आम्ही

चालत जाऊ लागलो प्रचड तोफखाना चालावा असा आवाज आणि हजारो सुरुग उडावे अशी लाव्हाची, जाळाची व दगडाची फेक यामुळे आम्हाला जास्त जवळ गेल्यावर एकमेकाचे बोलणेहि ऐकू येईना उष्णता अगाला लागू लागली व बुटातलेहि पाय भाजू लागले, तरी शेठजी व मगनशेठ मागे फिरण्याच्या विचारात दिसेनात शेवटी लाव्हाचे थरावर थर बाहेर येताना दिसू लागले, जसा मुशीतला तप्त लोखडाचा रसच उतू येत होता आमच्या वाटाड्याने पायाखालच्या धगधगणाऱ्या रसात इटालियन पैसा टाकला तो वितळून आतच चिकटून बसला दगडाच्या कपारीने तो वर काढला तो तुकडा आम्ही तसाच हिंदुस्थानात परत आणला होता परत आल्यावर हॉटेलमध्ये रात्र काढली, व दुसऱ्या दिवशी सकाळी खास बसने रोमला निघालो

सुदर सुदर रमणीय बागा, डोगर, झाडी ह्याची दृश्ये पहात पहात आमची बस ताशी ५० ते ६० मैल वेगाने जात होती पुष्कळ वेळेला सडक अगदी खेड्यातून जात असे खेड्यातल्या रस्त्यावर भाजी विकावयास इटालियन बाया आपापल्या घराच्या ओटीवर बसलेल्या होत्या त्याचेकडून आम्ही भाजीहि विकत घेतली खेड्यातील अनवाणी, फाटके कपडे अगावर असलेली घाणेरडी मुले पाहून भडक वर्णने असलेल्या मुसोलिनीच्या इटलीतहि अशी दैन्यावस्था आहे, हे प्रत्यक्ष पाहून शेठजीना आश्चर्य वाटले पुस्तकी इतिहास व परिस्थिति ह्यामध्ये पुष्कळ फरक असतो याची खात्री झाली रोमला पाहिलेल्या स्थळापैकी प्रामुख्याने उल्लेख करावयास पाहिजेच असे मुसोलिनी स्टेडियम्, भविष्यकाळी कोसळलल्या हुकूमशाही राजवटीला पूरक अशी सैन्यभरती करण्याचा हा प्रचड कारखानाच होता प्रवेश द्वारासमोरच जवळजवळ १५ फूट उचीचा मुसोलिनीचा सगमरवरी मुखवटा, सर्व स्टेडियमभोवती बहुतेक सर्व प्रख्यात इटालियनाचे पूर्णाकाराचे सगमरवरी पुतळे, एका भव्य पटागणाच्या मध्यबिदूवर ठेवलेला ७ फूट व्यासाचा एक अखड सगमरवरी गोल आणि अति मनोहर, रम्य अशी ठिकठिकाणची उद्याने हे सर्व पाहून आमचे डोळे दिपून गेले

दुसरे न विसरता वर्णन करण्यासारखे म्हणजे रोमचे स्मशान होय आत प्रवेश केल्याबरोबरच आपण एखाद्या राजवाड्याभोवतालच्या उद्यानातच शिरत आहोत असे वाटते इतके स्वच्छ, नीटनेटके, सुदर व जवळ जवळ प्रत्येक थडग्यावरील निरनिराळी नक्षी व खोदकाम हे सर्व पाहून आपण स्मशानभूमीत जात आहोत हे मुद्दाम सागितल्याशिवाय पटले नाही मृत्यूला इतक आनदमय करणारे, मृत्यूचे स्वागत करण्याची इच्छा निर्माण करणार असे स्मशान इतर ठिकाणी क्वचित् पाहावयास सापडेल शेठजी तर इतके रमले की, दोन-तीनदा स्मरण देऊनहि ते बाहेर निघण्यास तयार नव्हते ह्यातहि विनोद निर्माण करून मगनशेठला ते म्हणाले, " पृथ्वीच्या पाठीवर कोठे जरी मनुष्य असला तरी मरायला त्याने अवश्य रोमला यावे "

नतर आम्ही रोमचे प्रसिद्ध सेट पीटर्स कॅथीड्रल हे सुदर मदिर पाहिले

आम्ही रोमला पोचलो त्याच्या दुसऱ्याच दिवशी एक फार दु खद घटना घडली. मुबईहून आमच्याच बोटीने एक मद्रासी कुटुब नेपल्सला आले होते एक गृहस्थ, त्याच्याबरोबर दोन बायका व दोन इतर गृहस्थ अशी पाच माणसे होती ती नेपल्सला एक दिवस जास्त राहून दुसऱ्या

दिवशी रोमला पोचली व आमच्याच हॉटेलच्या दारात त्याचीहि मोटर उभी राहिली त्यातून ते मुख्य गृहस्थ जे उतरले ते उलट्या बाजस उतरले इतक्यात मागून फार वेगाने दुसरी एक मोटार धावत येऊन त्याचा फडशा उडवला !

आम्ही दुस-या दिवशी रोम सोडले पुढचा प्रवास आगगाडीने इंटरलाकनपर्यंत केला. आल्प्समधून जाताना अतिशय नयनमनोहर देखावे, बर्फाच्छादित शिखरे, डोळे पोचत नव्हते इतक्या खोल दऱ्या, निरनिराळ्या रंगीत फुलांचे पर्वतावरील पट्टे ही सर्व दृश्ये पाहून नंदनवनच पृथ्वीवर जणू आले आहे असा भास होत होता आम्ही जसजसे वर जाऊ लागलो तसतशा शेठजींच्या अध्यात्मिक भावना इतक्या जागृत होऊ लागल्या की, मधून मधून डोळे मिटून ते मनन करताना दिसत होते

इंटरलाकनजवळील आल्प्सचे प्रख्यात शिखर "युंग फ्राऊन ओख" Jung Fraun Yoch हे पाहण्यास आम्ही एकदाती रुळाच्या विजेच्या आगगाडीने गेलो बोटींतून प्रवास करताना खाली पाणी व वर आकाश, परंतु येथे खाली बर्फ आणि वर आकाश थंडीला सुमारच नव्हता येथील एका शिखरावरील हॉटेलमध्ये आम्ही उतरलो बरोबर नेलेले फराळाचे तेथे बसून खाल्ले व थोडा वेळ विश्रांति घेऊन निरनिराळी शिखरे पाहण्यास जात असता बऱ्याच अंतरावरून "हॅलो, हॅलो" असा आवाज ऐकू येऊ लागला वळून पाहतो तो एक अत्यंत जरठ म्हातारा आमचेकडे झपाझप पावले टाकीत येत होता सौ बाईसाहेबांच्या पोषाखावरून आम्ही हिंदुस्थानातले हे त्याने ओळखले त्याचे नाव निकोलाऊस ब्लाऊख ( Nikolaus Blouch ) ह्याने निरनिराळ्या विषयावर, विशेषत धर्म व इतिहासावर, सुमारे ७०० पुस्तके लिहिली होती वय ९२ वर्षांचे, ब्रह्मचारी, नेहमी वस्ती वरच व अतिशय सखोल असा निरनिराळ्या संस्कृतीचा अभ्यास, यामुळें शेठजींच्या मनात त्यांच्याबद्दल कौतुकास्पद जिज्ञासा निर्माण झाली, व त्यांनी त्याला प्रश्न विचारण्यास सुरुवात केली दोघेहि गाढे विद्वान, मराठींतून जर्मनीत व जर्मनीतून मराठीत भाषांतर करताना माझी संसेहोलपट झाली शेठजींनी आपल्या तत्त्वज्ञानविषयक ज्ञानाने त्याच्यावर फारच मोठी छाप पाडली

इंटरलाकनहून आम्ही झुरिच ( Zurich ) ला आलो, जगविख्यात "व्होलकार्ट ब्रदर्स"तर्फे १–२ गिरण्या आम्हास दाखविण्यात आल्या कारखान्यातील स्वच्छता, मजुरांची उद्योगप्रियता, टापटीप वगैरे पाहून शेठजींना फार आनंद झाला व हिंदुस्थानात अशी परिस्थिति कधी निर्माण होईल का, असा प्रश्न त्यांनी विचारला

नंतर पुढचा टप्पा व्हिएन्नाचा शहराचे सौंदर्य, ऑस्ट्रियन लोकांचे प्रेमाचे वागणे, सुंदर हवा ह्या सर्वांनी आम्हाला इतके आकर्षून घेतले की, आम्ही तेथे दोनतीन दिवस जास्त मुक्काम केला उन्हाळ्यात व्हिएन्ना शहर हे आंतरराष्ट्रीयच वाटतें अनेक देशांतील लोक रस्तोरस्तीं दिसतात त्याचप्रमाणे जगातील प्रख्यात डॉक्टर ह्यावेळीं व्हिएन्नालाच असत, म्हणून कितीतरी लोक जुनाट रोगावर उपचार करून घेण्यास तेथे जात असत शेठजींनीहि वरचेवर डोके वर काढणाऱ्या श्री बाबूशेठच्या नाकाच्या त्रासावर इलाज करण्याचे ठरविले ह्या बाबतीतील विशेष तज्ज्ञ डॉक्टर नॉयमॉन यांची मुलाखत

मिळण्यासच आम्हास दोन दिवस लागले बाबूशेठना त्यानी काहीं औषधे लिहून दिली व मुख्यत ऑपरेशन सुचविले, परतु ह्याकरिता लागणाऱ्या निदान एक महिन्याची सवड नव्हती म्हणून तो बेत रहित करावा लागला

ता १० एप्रिलला आम्ही बुडापेस्टला आलो सुशोभित मोठमोठे रस्ते, उद्याने व स्मारके याकरिता बुडापेस्ट प्रसिद्ध आहे सथ, गभीरपणे वाहणाऱ्या दान्युब नदीवर एका बाजूला पेस्ट व दुसऱ्या बाजूला बुडा असे हे शहर वसले आहे बुडाच्या पाठीमागे निसर्गरमणीय टेकड्या आहेत दोन्ही शहराची हातमिळणी करणारे निरनिराळ्या बाधणीचे सहा भव्य पूल दान्युबवर आहेत हिंदी सस्कृतीविषयी हगेरियन लोकाना अतिशय आदर असे कारण, या लोकाची श्रद्धा अशी की, ते अनेक शतकापूर्वी हिंदुस्थानातूनच तिकडे गेले असावेत ह्याचा शोध लावण्याकरिता हिंदुस्थानात येऊन गेलेल्या प्रोफेसर मेजासाई याची व शेठजींची ओळख करून दिली ह्याच्या तोंडून ऐकलेल्या हिंदु सस्कृतीच्या स्तुतीने शेठजीना अत्यत अभिमान वाटला विशेषत हगेरियन भाषेने वानगीदाखल अजूनहि काही हिंदी शब्द हगेरियन भाषेत जसेच्या तसेच ठेविले आहेत हे ऐकून आम्हाला अत्यत आश्चर्य वाटले यापेक्षा जास्त आश्चर्यकारक म्हणजे खेड्यातील स्त्रियाचा पोषाख अगदी उत्तर भारतीय वाटत असे यापैकी घागरे आणि ओढणी ही अजून जशीच्या तशीच होती

मी १९३२ साली शिकण्यासाठी ज्या गिरण्यात काम करीत होतो, त्यापैकी दोन, शेठजीना मुद्दाम दाखविल्या शेठजींनी अत्यत आपुलकीने व जिज्ञासेने सर्व खात्याची पाहणी केली कपडा खात्यात चाळीस साच्यावर एक, त्रासन खात्यात चार बाजूवर एक, अशा काम करणाऱ्या मुली एका सेकदाचीहि खोटी न करता विजेसारख्या हालत असताना दिसत होत्या काचेसारखी स्वच्छता व कसलीहि नुकसानी नाही वगैरे गोष्टी शेठजींनी अत्यत बारकाईने पाहिल्या गिरणीचे मालक (बॅरन) बारोन फान किटनर याच्याशी शेठजींनी कापूस-खरेदीपासून तो कापड-विक्रीपर्यंतच्या सर्व गोष्टींचा ऊहापोह केला त्याच्या बगल्यावर छोटासा अल्पोपहार करून आम्ही हॉटेलमध्ये परत आलो दुसरा कारखाना आम्ही पाहिला तो कापड छापण्याचा ह्याचे मालक बारोन सरदाई यानी स्वत लक्ष घालून सर्व कारखाना आम्हास दाखविला एक पासून सात रगापर्यंतची सोळा छापण्याची यत्रे रात्रदिवस काम करीत होती ह्याहि कारखान्यात मी सहा महिने काम करीत होतो कापड रगविण्याचा, छापण्याचा व धुण्याचा हा प्रचड कारखाना होता आकर्षक व सुबक असे जवळजवळ १००० नमुने आम्हास दाखविण्यात आले ह्याचा माल सर्व जगभर खपत असे हे त्याच्या विक्री-खात्यातील नोंदबुकावरून दिसले

१९३४ साली रेडियो व इलेक्ट्रिक बल्ब तयार करण्याचे काम शिकण्यास गेलेला माझा धाकटा भाऊ तेथे बुडाकेझी सॅनिटोरियममध्ये या वेळी अत्यवस्थ आजारी होता ती त्याची शेवटलीच भेट होणार होती म्हणून त्याच्या खास इच्छेवरून मी तेथे तीन चार दिवस जास्त राहण्याचे ठरविले डॉक्टराच्या अदाजाप्रमाणे तो त्यानतर जास्तीत जास्त सहा आठवडे जगणार होता म्हणून सर्व मडळींनी पुढे बर्लिनला जावे व मी बुडापेस्टलाच राहावे असे ठरले बर्लिन येथे श्री गणपुले नावाचे माझ्या ओळखीचे एक गृहस्थ २०-२५ वर्षे व्यापार करीत असत त्याना तारा करून सर्व मडळींची

उतरण्याची व बर्लिनमधील प्रमुख स्थळे दाखविण्याची मी व्यवस्था केली बधूची जगण्याची आशा नव्हतीच सामानसुमानाची व पुढील खर्चाची व्यवस्था करून मी १४ एप्रिलला बर्लिनला जाऊन पोहोचलो प्रवासात आमचा वारवार जीव खाणारा कार्यक्रम म्हणजे हिशोबाचा असे रुपयातून पौंड, पौंडातून इटालियन लिरा, स्विस फ्रँक, ऑस्ट्रियन शिलिंग, हंगेरियन पेंग्यो, व जर्मन मार्क ह्या अदला-बदलीतून जाताना हिशोबाची तोंडमिळणी कधीच होत नसे हिशेब मुख्यत मगनशेठ ठेवीत असत त्याची साधारणपणे "जाऊ देण्याची" मनोभूमिका असली तरी शेठजीचा काटेकोरपणा त्याना मुळीच चैन पडू देत नसे बर्लिनला त्यानी एक रात्रभर जागून पैन् पैची तोंडमिळणी करून दुसरे दिवशी सकाळी आमच्यासमोर ठेवली बर्लिनला पाहिलेल्या ठिकाणापैकी सासोसी राजवाडा, जर्मन पार्लमेंट, जगविख्यात झू, म्यूझियम वगैरे ह्या वेळी जर्मनीतल्या सर्व लहानमोठ्या शहरी ज्याचे जाळे पसरले होते अशापैकी एक "एककिंमती दुकान" ( Ehape ) आम्ही बर्लिनला पाहिले मनुष्य-प्राण्यास लागणारी प्रत्येक वस्तु येथे स्वस्तात स्वस्त मिळत होती म्हणजे अक्षरश जन्मल्याबरोबर लागणाऱ्या सर्व वस्तूपासून तो अगदी शवपेटीपर्यंत ह्या नऊ मजली भव्य इमारतीत जवळजवळ ९०० विक्रेत्या मुली काम करीत असत यावरून या दुकानाच्या अजस्रपणाची कल्पना येईल

ता १४ ला आम्ही बर्लिनहून निघालो आणि थेट पॅरिसला येऊन पोहोचलो युरोपमध्यें कोणत्याहि गावी उतरलो की प्रथम हिंदी पद्धतीचा स्वयपाक करावयास मिळेल असे हॉटेल पाहणें हे आमचें पहिले काम असे आजपर्यंत विशेष त्रास न पडता ते साधत असे परंतु पॅरिसला इतक्या अडचणी निर्माण झाल्या की, मगनशेठ व मी तीन चार तास हिंडूनहि अशा हॉटेलचा शोध लागेना अर्थातच बाकीच्या सर्वांना स्टेशनवरच ताटकळत बसावे लागले शेवटी हॉटेल लिव्हिंग्स्टनच्या मालकाने मेहेरबानी करून आम्हास आवश्यक त्या खोल्या देण्याचे कबूल केले, व आम्ही तेथे राहण्यास गेलो प्रत्येक खोलीत लहानशी गॅसच्या स्टोव्हसह स्वयपाकाची जागा, दोन पलग, खुर्च्या व कपाट इतकें सामान होते सोईच्या समाधानाचा झालेला आनद पुढे भयकर दु खात टाकणार होता त्याची आम्हास काय कल्पना ?

पॅरिस शहराची सर्व जगाला मोहिनी आहे कितीहि दिवस व पैसा खर्च केला तरी मनुष्य अतृप्तच राहतो जो रस्ता व ठिकाण पाहावे ते पहिल्यापेक्षा जास्त मनोहर ! बाबूशेठना जात्याच कलेची गोडी असल्यामुळे त्याचे डोळे शिल्पकला, चित्रकला यावर नेमके टपून असायचे, व त्यातच ते रमून जावयाचे अस्सल हिंदी सस्कृतीत वाढलेल्या सौ बाईसाहेबाना चित्रविचित्र व जवळजवळ अर्धनग्न पोषाखातील स्त्रिया पाहून अचबा वाटायचा आमच्या दृष्टीने आमच्याशी अतिशय धीटपणाने बोलू इच्छिणाऱ्या बायाना, टिंगल करून टाळण्याचा आम्ही प्रयत्न करीत होतो मगनशेठचे लक्ष अर्थातच म्युनिसिपालिटीकडे तेथील समाजातील घाणेरड्या गोष्टीवर नेमके कटाक्षाने बोट ठेवून ते आमच्या निदर्शनास आणीत

जगप्रसिद्ध "शास आले" ( Champs Alle ) रस्ता, अति प्रचड म्युझियम्, झुऑलॉजिकल गार्डन, व्हर्सायचा तह झालेली जागा, आयफेल टॉवर ( Eifel Tower ) इत्यादि, आम्ही तड़ाखेबद

कार्यक्रमाने पाहून घेतले मगनशेठ, अबालाल आणि बाबूशेठ यान्या चटावलेल्या जिभाना मधून मधून मुईमुगान्या शेगा, नारळ, काजू वगैरे खाण्याची तीव्र इच्छा झाली की टॅक्सी करून त्या वस्तू आम्ही हस्तगत करीत असू माझा बुडापेस्टचा मित्र मार्कोविच याचा धाकटा भाऊ सुप्रसिद्ध फ्रेंच कार रेनॉल्डन्या कारखान्यात इजिनियरचे काम करीत असे ती गाडी त्याने बाजारभावापेक्षा बरीच स्वस्त मिळवून देण्याचे कबूल केल्यावरून शेठजींनी दोन गाड्या घेण्याचे ठरविले त्याप्रमाणे ह्या कपनीन्या तद्विपयक अधिकाऱ्याची मुलाखतहि ठरविली

लहानापासून थोरापर्यंत आनदाने बेहोप करणारा ल्युना पार्क पाहावयाचा राहिला होता तेथे आम्ही जेवून रात्री १० वाजता गेलो ल्युना पार्कचे आकर्पण कधीच सपत नाही कसलाहि दु खी मनुष्य तेथे जाऊन आनदी होतो बेढब आणि विकृत स्वरूपात आपले प्रतिबिंब दर्शविणाऱ्या आरसे-महालात तर हसून हसून आमची इतकी मुरकुडी वळली की, आमचे भरगच्च जेवण पचून जाऊन आम्हाला पुन फराळ करावा लागला निरनिराळ्या ठिकाणी बेसावधगिरीने पडणे, कपडे उडणे असल्या प्रकारानी आम्ही हसून हैराण झालो शेठजींनी स्वत पोक्तपणा बाजूला ठेवून आमन्यात हिरीरीने भाग घ्यावा व आम्हालाहि हासवावे इतक्या मनसोक्तपणे हासताना शेठजी कधीच दिसले नव्हते ह्याप्रमाणे उत्तम रीतीने मन रिझविणाऱ्या ल्युना पार्कला दुवा देत आम्ही घरी आलो मुले फार हासली म्हणजे ती रडतात, अशी आयाची समजूत असते तोच प्रकार आमन्यापुढे दुसरे दिवशी वाढून ठेवला होता हा खेळ विधि आमन्याशी निर्दयपणे खेळणार होता रात्री अडीचला घरी येऊन आम्ही झोपलो दुसरे दिवशी म्हणजे ता २३-४-३५ रोजी सकाळी आम्ही रेनॉल्टच्या कारखान्यात जाणार होतो नित्याप्रमाणे शेठजीन्या न्याहारीची चौकशी करण्यास मी त्याना उठविण्यास गेलो दारावर टिचकी वाजविली, आतून ओ आली नाही मला वाटले, रात्री हासून दमलेले शेठजी गाढ झोपले असतील मी माझे स्नान आटोपून अर्ध्या तासाने पुन उठविण्यास गेलो, तरीहि आतून ओ नाही झोप कशाला मोडा म्हणून मी आणखी पधरा मिनिटे थाबलो व दारावर टिचकीऐवजी थाप मारली, तरीहि आत गुपचूप मग दणका मारला, उत्तर नाही माझ्या काळजात एकदम चर्र झाले डोके सुन्न झाले किल्ली फिरविण्यान्या जागेतून मी वास घेतला नाकात गॅसचा भपकारा शिरला दोघानाहि गॅसची विषबाधा झाल्याची माझी खात्री झाली माझ्या विचाराची गति थाबली एक सेकदाचाहि विलब न लावता दार फोडून दोघाना बाहेर काढणे अत्यत आवश्यक होते जवळ ना काठी ना दगड मदतीसाठी धावाधाव करावी तर निमिषमात्रान्या होणाऱ्या उशीराने काही तरी होऊन बसायच, म्हणून मी दारावर खाद्याने दणके देण्यास सुरुवात केली डोळ्यासमोर अधारी येईपर्यंत मी दार फोडण्याचा प्रयत्न केला मेंदूची विचारशक्ति बद झाली, खालन्या मजल्यावरील खोलीत असलेल्या मगनशेठकडे मी धाव घेतली, तोपर्यंत हॉटेलमधील इतर मडळी खोल्यातून पटापट बाहेर आली मगनशेठ, बाबूशेठ, अबालाल वगैरे सर्व वर शेठजींन्या खोलीकडे गेले, व मी मॅने-जरच्या कचेरीत जाऊन मिळेल ती मदत मिळविण्याकरिता फोन करू लागलो वरन्या मजल्यावरून दारावरील धक्क्याचा दणादण आवाज येत होता, आणि एकदम दार मोडून कोसळल्याचे मी ऐकले तव्हा आता प्रथम डॉक्टरचीच मदत पाहिजे होती गॅस-पॉयझनिंग हे अपघातात जमा होत असल्यामुळे

एकहि खाजगी डॉक्टर येईना माझे फ्रेंच भाषेचे ज्ञान अगदीच तुटपुंजे तेथील सरकारी नियमाप्रमाणे मिलिटरी डॉक्टर बोलवावा लागला तो येत असल्याचे आश्वासन मिळताच मी पुन वर गेलो तो मगनशेठ आपल्या हत्तीच्या मुसक्यांनी चिंधड्या पाडलेले दार उचलून बाहेर आणीत होते खोलीमध्ये गॅस इतका ठिच्चून भरला होता की, आम्हाला आत शिरण्यास महत् प्रयास पडले मगन-शेठनी आतमध्ये तशीच मुसंडी मारली व प्रथम खिडक्या उघडल्या मातापित्यावरील ह्या अति भयंकर प्रसंगामुळे बाबूशेठ ओक्साबोक्शी रडू लागले त्यांना आवरण्याची कामगिरी अंबालालने पत्करली खोलीतील देखावा काळजाला चिरून टाकणारा होता सौ बाईसाहेब व शेठजी बिछान्यावर अस्ताव्यस्त बेशुद्ध पडलेले होते, दोघांचीहि नाडी हाताला लागत नव्हती सौ बाई-साहेबांचा श्वासहि बंद पडू लागला होता शेठजींच्या तोंडातून अगदी जलद असा घर घर आवाज येत होता डॉक्टर येईपर्यंत आम्हीं दोघांनाहि बाहेर काढून जमिनीवर ठेवले इतका वेळ या अनर्थाचे कारण असणाऱ्या गॅसच्या तोटीकडे पाहण्यास कोणीहि भानावर नव्हते रात्री तिचा उपयोग केल्यावर, ती संपूर्णपणे बंद केली नव्हती आणि हेच ह्या सर्व आपत्तीचें कारण तांबडतोब फायर ब्रिगेड, पोलीस, काही परिचारिका व मिलिटरी डॉक्टर येऊन दाखल झाले दोघांचेहि कृत्रिम श्वसन केले अनेक ठिकाणच्या रक्तवाहिन्या तोडून अक्षरश डांबरासारखे काळे रक्त बाहेर काढले आणि निमिष मात्रात दोघांच्या श्वासनलिकेत ऑक्सिजन गॅस सोडला घड्याळाची स्प्रिंग तुटावी आणि काटा फर्रर्रदिशी सर्व आकड्यावरून फिरावा त्याप्रमाणे हा दीड तासाचा वेळ विचार, गति व कृति यामध्ये लागणाऱ्या अवधीस मुळीच संधि न देता एकमेकात मिसळत होते

ह्या अपघात असल्यामुळे पोलिसांची चौकशी सुरू झाली परंतु आमच्या विनवण्यामुळे दोघांना तांबडतोब दवाखान्यात नेण्यास त्यांनी परवानगी दिली आशेने सुख कवटाळण्यास जावे व एकदम घोर अंधाऱ्या दरीत पडावे असा प्रकार झाला ल्युना पार्कमधील आनंदाचा दुर्दैवाने पुरेपूर सूड घेतला दोघांच्याहि प्रकृतीस तांबडतोब आराम कसा वाटेल याबद्दलची भयंकर तळमळ आम्हाला लागली वाटेल ते करून उत्तमोत्तम डॉक्टरांची उपाययोजना व्हावी म्हणून प्रयत्न सुरू झाले तात्कालिक योजना म्हणून दोघानाहि ऑक्सिजन गॅसवर ठेविले होते पुढे काय होणार व कसे होणार या भयानक प्रश्नाने डोक्याच्या चिंधड्या उडत होत्या काही सुचत नव्हते सौ बाईसाहेबांना स्त्रियांच्या वॉर्डमध्ये स्पेशल रूममध्ये व शेठजींना पुरुषांच्या वॉर्डमध्ये ठेवले होते हेड सर्जनला विचारून दवाखान्याच्या ठरलेल्या वेळेच्या व्यतिरिक्त केव्हाहि जाऊन चौकशी करण्यास परवानगी मिळविली बिछान्याजवळील खुर्चीवर तासन तास बसावे व परमेश्वराकडे डोळे लावून त्यांच्या शुद्धीवर येण्याची वाट पाहावी एवढेच जास्तीत जास्त आम्ही करू शकत होतो दवाखान्यात शिरताच दिसेल त्या नर्सला विचारावे व शुद्धीवर आले नाहीत असे समजताच खाडकन् निराश व्हावे असे अनेकदा झाले सौ बाईसाहेब सुमारे २४ तासानंतर शुद्धीवर आल्या, व शेठजी चौथे दिवशी दु खातहि झालेला तो आनंद गगनात मावेना !

आता राहिली लवकर प्रकृति सुधारण्याची काळजी ! मुंबईला फोन करून सर्व बातमी कळविली व तिकडूनहि जवळजवळ रोज फोनने चौकशी केली जात होती ह्या अपघातजन्य प्रकृतीला

त्वरित व योग्य रीतीने हाताळू शकेल असा डॉक्टर आम्हाला कसा सापडावा! शेवटी धागादोरा लागता लागता हल्लीचे केंद्रीय मंत्री डॉ. केसकर ह्यावेळी पॅरिस विश्वविद्यालयात शिकत होते, त्यांच्याकडे गेलो. ते आम्हाला तडक श्री. राणा यांच्याकडे घेऊन गेले. शेठजींच्या प्रकृतीचे महत्त्व ओळखून श्री. राणा यांनी आम्हाला सुप्रसिद्ध डॉक्टर गार्नीग याचा लाभ करून दिला. डॉक्टर गार्नीग स्वत न चालता येण्याइतक्या संधिवाताने आजारी होते. तरी पण ढकलगाडीत बसून अत्यंत तळमळीने ते रोग्याची सेवा करीत असत. सर्व मुलाखती बाजूला ठेवून ते तडक दवाखान्यात आले व उपचार सुरू केले. सौ. बाईसाहेबांची प्रकृति झपाट्याने सुधारून पधरा दिवसांच्या आत त्यांना दवाखान्यातून सुटका मिळाली. परंतु शेठजींच्या प्रकृतीत सुधारणा न होता गुतागुतच होऊ लागली. डॉक्टर उपचाराची पराकाष्ठा करीत होते, तरी त्यानाहि गोंधळून टाकणारा प्रकृतीचा बिघाड मागे हटेना. उपचार इतके अघोरी व निर्दय होते की ते पाहूनच आमच्या डोळ्यातून अश्रु येत. सौ. बाईसाहेबांचे दु ख मधूनमधून इतके उचबळून येई की, त्यांना आवरणे दुरापास्त होत असे. त्यांची प्रकृति एकसारखी उलटण्याची भीति वाटत होती. शेठजींचा मात्र शारीरिक आणि मानसिक दु खावर कल्पनेच्या बाहेर अचाट ताबा. त्यांच्या शरीरातले अशुद्ध रक्त अद्यापि पूर्णपणे बाहेर न आल्याकारणाने त्यांना १०४°–१०५° पर्यंत ताप येत असे. उद्भवलेला न्युमोनिया वाढत वाढत आटोक्याबाहेर गेला. शेठजी स्वत बिछान्यात नमन करीत पडलेले असत. जणू काही आत्म्याचा व शरीराचा संबंधच नाही. शारीरिक दु खाचा त्यांच्या मनाला यत्किंचितहि उपसर्ग होत नव्हता. पाठीला आवळा टोचावा त्याप्रमाणे सात आठ सुया असलेल्या टोचणीने पंधरा वीस ठिकाणी भोसकून त्या जागेचे रक्त निर्वात केलेल्या (Vacuum) बाटलीत शोषून घेत. मोहरीची पूड टाकलेल्या बर्फाच्या पाण्यात ब्लॅकेट भिजवून ते त्यांच्या अंगाभोवती गुंडाळून १५–१५ मिनिटे ठेवीत. हे सर्व डॉ. गार्निगच्या देखरेखीखाली. त्यांनी मोठ्या गौरवपूर्ण शब्दात शेठजींच्या सहनशीलतेचे कौतुक केले. शरिरात व मनात शेठजींनी खरोखरच फारकत केली होती. उच्च दर्जाच्या आध्यात्मिक उन्नतीशिवाय हा संयम अशक्य होय. एवढ्या मोठ्या दुखण्यात शेठजी कधी कण्हले सुद्धा नाहीत. डॉक्टरांनी हात टेकले, व शेठजींना ताबडतोब उष्ण हवेत नेण्याची आवश्यकता असल्याचे त्यांनी सांगितले, कारण तोपर्यंत पॅरिसमध्ये हिमवर्षाव चालू होता.

परंतु कोठे जावे व प्रकृतीचा धोका पत्करावा कसा? मुंबईशी फोनवर बोलणे केले. डॉक्टरांची सल्ला घेतली व इटलीत जिनोआ येथे शेठजींना न्यावयाचे ठरले. ताप व न्युमोनिया थोडा तरी कमी होऊन शरीर जरा तरी प्रवासक्षम होण्याची वाट पाहात होतो. परंतु आजाराचा मागे न सरण्याचा हट्ट व शेठजींचा त्यावर मात करण्याचा हट्ट या दोघात जणू काय शर्यत लागली होती. शेवटी त्याच परिस्थितीत पॅरिस सोडण्याचे ठरले. बाबूशेठ व मगनशेठ या दोघांनी धैर्याने धोका पत्करण्याचा निश्चय केला व जिनोआला दोन चार दिवस मुक्काम करून बोटीने थेट मुंबईला जाण्याचा बेत पक्का केला. ह्या सुमारास जिनोआहून निघणारी एकच बोट होती. ती म्हणजे आम्हाला घेऊन गेलेली (M V Victoria) पॅरिस येथील लॉईड ट्रिस्टीनोच्या ऑफिसात गेलो व चवकशी करता त्यांनी रोग्यास बरोबर नेण्याचे साफ नाकारले. दुर्दैवाचा हल्ला सर्व आघाडीवरून होत होता. शेठजींचा सल्ला घेण्याच्या परिस्थितीत ते नव्हते. शेवटी

मगनशेठ आणि मी कपनीच्या जनरल मॅनेजरला खास मुलाखतीने भेटलो व अक्षरश साश्रु नयनाने त्याच्यापुढे हात जोडले. एकाच अटीवर परवानगी देण्याचे त्याने कबूल केले प्रकृतीचे गभीर स्वरूप पाहून मुबईपर्यत जिवत पोहोचण्याची त्याला आशा नव्हती "मृत" शरीरास आम्ही समुद्रात सोडून देतो, त्याला तुमची तयारी पाहिजे, नाहीतर "एमबाम्" करण्याची सर्व तयारी आणि शव पेटी तुम्हास तुमच्या खर्चाने मुबईपर्यत न्यावी लागेल असे निक्षून सागितले आम्ही एकदम तयार झालो कारण दुसऱ्याची तरी कोणाची सल्ला घेणार? अशा रीतीने बोटीवरील जागा तर ठरल्या परतु जिनोआपर्यत प्रकृतीची सुरक्षितता साभाळण्याकरिता त्याच दवाखान्यातील डॉक्टर व नर्स याना बरोबर घ्यावे लागले पुढील जगान्या प्रवासावर पाणी सोडून आम्ही पॅरिस सोडले, व मायदेशी परतण्यास निघालो डॉक्टर व नर्स अगदी बोटीवर चढेपर्यत होते उपचाराची रूपरेषा बोटीवरील डॉक्टराना त्यानी समजावून सागितली आम्ही बोटीवर चढलो बोट जसजशी दक्षिणेकडे जाऊ लागली तसतशी शेठजींची प्रकृति जलद गतीने सुधारू लागली व अवध्या चारच दिवसात ताप साम्यावस्थेत येऊन केबिनमध्ये ते हिंडू फिरू लागले शेठजीना स्ट्रेचरवरून बोटीत चढविले आणि मागोमाग चार माणसानी शवपेटी आणून ठेवलेली पाहताना आमच्या मनात आशानिराशेचे सम रागण माजले होते काय होणार? परमेश्वराच्या मनात काय आहे? सर्व भावनाचा एकदम स्फोट झाला शेठजी त्याच प्रमाणात शात असत त्यान्या चेहऱ्यावर यत्किंचितहि चलबिचल दिसत नसे पोर्ट सैयद, सुवेझ, एडन वगैरे बदरे झपाझप मागे टाकीत टाकीत बोट हिंदुस्थानच्या किनाऱ्याकडे निघाली शेठजी आता जेवू लागले होते, व डेकवर हिंडू लागले होते शवपेटीची जाणीव त्याना अद्यापिहि नव्हती प्रत्येक बदरावरून प्रकृति सुधारत असल्याची आनदाची बातमी आम्ही मुबईला तारेने देत होतो अखेर ता ३ जूनला सकाळी अधारातच मुबईचे दिवे चमकताना दिसू लागले अशा रीतीने परमेश्वराने निर्दय खेळ केल्यानतर का होईना, हा महाराष्ट्राचा–हिंदुस्थानचा ठेवा आपल्या मायभूमीच्या पदरात आणून टाकला.

आम्हा सर्वाना हायसे वाटले बोट बॅलार्ड पियरला लागताच किनाऱ्यावर शेठजीचे आप्त, इष्ट, स्नेही, चहाते वगैरेच्या झुडींच्या झुडी सद्गदित कठाने हातात हारतुरे घेऊन शेठजींच्या दर्शनास उत्सुक असलेले दिसत होते एडनहून तारा करून डॉ वाड वगैरे तज्ज्ञाना बॅलार्ड पियरवरच बोलाविले होते. शेठजीना तडक नर्सिंग होममध्ये ठेवण्यात आले तज्ज्ञाची निदाने, उपाययोजना निश्चित झाल्यावर त्यास पुण्यास नेण्यात आले तेथून दिवाळीच्या सुमारास प्रकृति सुधारून ते अमळनेरास आले व आपली नित्याची कामे करू लागले

त्यानतर आजपर्यत श्रीमान प्रतापशेठसाहेब यानी अनेक प्राणघातक दुखण्याशी झुज दिली आहे. आसपासची मडळी कितीहि घाबरली तरी ते स्वत शात असत व उलट इतरानाच धीर देत यातील रहस्य मी त्याना एकदा विचारले असता ते म्हणाले की, "कोणताहि व्यवहार देण्याने व घेण्याने होतो मी कशाचा स्वीकारच करीत नाही" युग फाऊन योग्य येथे भेटलेले श्री निकोलाऊस ब्लाऊख यानी वादाविवादात वैतागून "मग जगात सुखी कोण आहे?" या विचारलेल्या प्रश्नास शेठजीनी थोडक्यातच मार्मिक उत्तर दिले की, "जे आले असून नाहीत किंवा मुळीच आले नाहीत ते"

शेठजींच्या शांत वागण्यात वरील गभीर व खोल अर्थ असतो व तेच त्याच्या आयुष्याचे सार आहे असे मला वाटते

श्रीमत प्रतापशेठ याना उदड आयुष्य लाभो व ते आमच्यात असेच तळपत राहोत अशी परमेश्वरास तळमळीची प्रार्थना आहे

• • •

## ६

લેખક **શ્રી. વસતલાલ કે. પટવા.**

**પ્રતાપ મિલ, અમલનેર**

શ્રીમાન્ પ્રતાપશેઠજીનો જન્મ ઈ સ ૧૮૭૯ ના ડીસેમ્બરની ૧૧ મી તારીખ ને ગુરુવારે, જયપુર સ્ટેટના મોહનપુરા નામના નાના ગામડામા પૂજ્ય જ્ઞાનેશ્વરમહારાજની પુણ્યતિથીને દિવસે થયો તેમના પિતાનુ નામ છોટુરામજી અને માતાનુ નામ શીવકુવરબાઈ અદાજે સાડાસાત વરસની ઉમ્મર થતા સુધી તેમનુ જીવન તેમની જન્મભૂમીમા જ ગોપાલન લીલામાજ ગયુ

આઠ વરસની ઉમ્મરે તેઓ ચોપડાના શ્રીમાન્ શેઠજી માણેકચદ રતોરામજીને ત્યા દત્તક આવ્યા શ્રીમાન્ માણેકચદજી શેઠ સરકારમા તેમજ ગામમા સૌથી વધુ પ્રભાવશાળી વ્યક્તિ હતા ચોપડા પૂર્વ ખાનદેશમા શ્રીમતોનુ ગામ છે અને તે વખતે તેની જાહોજલાલી એક નાના સ્ટેટ જેવી હતી

પૂજ્ય શેઠજીનો સ્વભાવ ઘણોજ સરળ, રમુજી, નિયમિત અને આનદી છે સાદુ જીવન અને ઉચ્ચ વિચારથી તેમના સમાગમમા આવતો દરેક વ્યક્તિ પ્રભાવિત થાય છે શ્રીમાન્ શેઠજીનુ આધુનિક શિક્ષણ બિલકુલ થયુ નથી, પરતુ સ્વર્ગવાસી પૂ સાવળારામ માસ્તરની સતત પ્રેરણાથી, પૂર્વજન્મના સસ્કાર અનુસાર, આધ્યાત્મ જ્ઞાનની નીપુણતા મેળવી અને આજે હિન્દુસ્તાનમા અજોડ એવી ફીલોસોફીકલ રીસર્ચ ઇન્સ્ટીટયુટ અમલનેરમા ચલાવી રહ્યા છે સદરહુ ઈન્સ્ટીટયુટમા અનુભવ લેવા માટે વિદેશના પ્રોફેસરો પણ આવે છે પૂજ્ય શેઠજી હમેશા બધાને ઇશ્વરમય જુએ છે તેમને અભિમાન તો લેશમાત્ર પણ નથી તેમના તત્વજ્ઞાન ઉપરના વિચારો તેમના પુસ્તકમા સુદર અને સરળ ભાષામા આલેખાયા છે, જેનુ ભાવપૂર્વક મનન કરવાથી દુર્લભ તત્વજ્ઞાન પણ સરળતાથી સમજાય તેમ છે

સ્વ તિલકમહારાજની સ્વદેશીની ચળવળની પ્રેરણાથી પૂજ્ય શેઠજીએ "સ્વદેશી વસ્તુ ભડાર" નામનો એક મોટો સ્ટોઅર સ્વદેશી ઉદ્યોગની ઉન્નતિ માટે ચોપડામા ખોલ્યો ત્યાર બાદ તુરતજ ઇ સ ૧૯૦૬ મા અમલનેરમા કાપડની મીલની શરૂઆત કરી અને ઉત્તરોત્તર વસ્ત્ર ઉત્પાદનના ઉદ્યોગમા ઉન્નતિ કરી ધુલીયામા ઈ સ ૧૯૨૮ મા ધી ન્યુ પ્રતાપ મીલ્સ પણ શરૂ કરી પૂજ્ય શેઠજીએ ખાનદેશમાજ મીલો કરી, ખાનદેશી રૂ વાપરી, ખાનદેશની જનતાનુ કલ્યાણ કર્યુ છે બન્ને મીલોનો માલ ઘણોજ મજબુત અને ટકાઉ હોઈ હિન્દુસ્તાનમા લગભગ દરેક પ્રાન્તમા સારા પ્રમાણમા પ્રચલિત થયો છે અને એકસપોર્ટમા પણ બન્ને મીલોના માલની સારી કદર થઇ છે એકવાર વાપર્યા બાદ ઘરાક પ્રતાપ મીલનોજ માલ જોઈએ એમ માગતો આવે છે ઈ સ ૧૯૦૮ થી શ્રીમાન્ શેઠજીએ ફક્ત નફા ઉપરજ કમીશન લઇ ઉદ્યોગનો મહાન આદર્શ સાધ્યો છે જ્યારે બીજા એજન્ટો ઉત્પાદન ઉપર કમીશન લઈ રહ્યા છે

"**सत्यमेव जयते**" એ સિદ્ધાંત ઉપરજ પૂજ્ય શેઠજીની વહેવારમા અને વહેપારમા ઉત્તરોત્તર ઉન્નતિ થઈ છે બન્ને મીલોની લાંબી કારકીર્દીમાં કોઈપણ વહેપારીની તકરાર નથી કે તેને વેચેલ માલની જાત બરાબર નથી આવી કે માલ વખતસર મળ્યો નથી બજાર સંજોગો મુજબ ભાવો ગમે તેટલા વધી જવા છતાંય વેચાણ કરેલ માલ બરાબર મુદ્દતમા કોઈપણ જાતની કનડગત વગર વહેપારીઓને મલતો રહ્યો છે.

પૂજ્ય શેઠજીનું જીવન જનક-વિદેહી જેવું છે. આટલો મોટો વહેવાર ચલાવવા છતાં સતત આત્મ-ચિંતન અને સત્યની ઉપાસનામાંજ તેઓ એકનિષ્ઠાથી દૃઢ રહ્યા છે ગૃહસ્થી જીવનમા રહીને તેઓશ્રીનુ પરમાર્થ સાધવાનુ ઉદાહરણ આપણને પ્રેરણાદાયી થાવ જેમનો આત્મા સર્વ ભૂતો સાથે એકતા અનુભવે છે, અનુકંપા અને કરૂણાથી ભરેલ છે, તેવા આ સંત-પૂર્વજન્મના યોગભ્રષ્ટ મહાત્માને આ જન્મે ઈશ્વર-કૃપાથી આત્મસાક્ષાત્કાર થયો છે તેમ મારૂં માનવુ છે પૂજ્ય શેઠજી ખરા કર્મયોગી છે. જનતાના કલ્યાણાર્થે મોટા પ્રમાણમા પૂજ્ય શેઠજીએ સંસ્થાઓ કાઢી, તેઓની સંપૂર્ણ વ્યવસ્થા કરી, ત્યાગમાંથીજ ખરૂ સુખ અને સંતોષધન પામ્યા છે

રામદાસ સ્વામીના કહેવા મુજબ "**बहु ज्ञान वैराग्य सामर्थ्य जेथें, परी अतरी नाम विश्वास तेथें।**" પૂજ્ય શેઠજી પ્રખર જ્ઞાની, આત્મવાદી હોવા ઉપરાંત સતત પરમાત્માના ચીંતનમા નિમગ્ન રહે છે ભક્તિમાર્ગે શ્રીરામચંદ્રજીનુ સતત ચીંતન કરે છે અમળનેરમા શ્રીરામચંદ્રજીનુ તથા શ્રીશંકરાચાર્યજીનુ સુંદર અને ભવ્ય મંદીર પણ બંધાવ્યુ છે.

અનેક સંસ્થાઓને તેમજ વિદ્યાર્થીઓને પૂજ્ય શેઠજીએ મદદ કરી છે તેમાં ખાસ ઉલ્લેખનીય મદદ હિન્દુસ્તાનમા નવજુવાનોને લશ્કરી તાલીમ મળે તે માટે "ભોસલે મિલીટરી સ્કુલ નાશીક"ને રૂા ૧૦૦,૦૦૦ આપેલા છે

પૂજ્ય શેઠજીએ શ્રી જમનાલાલજી બજાજના સમાગમમા આવતાં ગો-સેવાનુ વ્રત લીધુ છે અને ફક્ત ગાયનુજ દૂધ અને ઘી વાપરે છે ગરીબ કુટુંબમા જન્મી બાળ અવસ્થામા ગો-પાલન કરનાર પૂજ્ય શેઠજી સાહેબની જીવન ઝરમર શ્રી. સયાજીરાવ ગાયકવાડ જેવી ગણી શકાય.

પૂજ્ય શેઠજીએ તેમના ભાઈ નાનકરામજીના ચિ મગનલાલજીને દત્તક લીધા છે અને તેઓશ્રી તેમના કામમાં સંપૂર્ણ મદદ કરીને બન્ને મીલોનુ કામકાજ કુશળતાથી સંભાળે છે

મારા વડીલ બન્ધુ શ્રી રા રા કાંતિલાલ શાહે પૂજ્ય શેઠજીની કૃપાથી ઈ સ ૧૯૨૪ના ઑગસ્ટ મહીનામાં પ્રતાપ મીલ્સની દુકાન કાનપુર ખાતે શરૂ કરી અને પોતાના કામથી પૂ શેઠજીને સંપૂર્ણ સંતોષ આપ્યો અમારા કુટુંબના દુર્ભાગ્યે તેઓ ૨૬ વરસની યુવાન અવસ્થામા ટુંકી બિમારીમા ગુજરી ગયા જેથી અમારા કુટુંબ ઉપર મોટી આફત અને દુઃખ આવી પડયુ પૂજ્ય શેઠજીએ ઘણીજ દયાથી, મોટા મનથી અને પિતૃવાત્સલ્યથી મને નાદાન ઉમ્મરમા વગર અનુભવે કાનપુર દુકાને કામ ઉપર નીમ્યો જેથી અમારા કુટુંબને ઘણી જ મદદ થઈ એટલુ જ નહી પણ મને વખતોવખત તક આપીને મીલનુ કામ શીખવી જાણતો કર્યો તેમના પિતૃ-વાત્સલ્યથી મને મારા પિતા કે મોટા ભાઈની ખોટ જણાઈ નથી મારો અનુભવ લખ્યો છે તેવા અનેક ઉપર ખરા દુઃખમાં સાહાય કરીને પૂજ્ય શેઠજી અનેકના પાલનહાર બન્યા છે. પરમાત્મા તેમને લાંબુ આયુષ્ય આપો અને તેમના આત્મતત્વથી મળતી સુવાસ અને પ્રેરણાથી સદા અમને બધાને અને જગતના દરેક આત્માને ઉન્નતિ તરફ લઈ જાવ પૂજ્ય શેઠજી બાબત મારા જેવો માણસ લખવાને સમર્થ નથી જે કાંઈ થોડો સ્વાનુભવ થયો તે સત્ય સ્વરૂપે લખ્યો છે

● ● ●

# ७

निवेदक **श्री. रा. पांडुरंग नारायण वैद्य, ऊर्फ पांडुतात्या**
लेखक **श्री. रा. घनःशाम विश्वनाथ यरनाळकर,** बी कॉम

## दोन शब्द :

श्रीमंत प्रतापशेठजींचे बहुशी साहचर्य ज्या महाभागांना लाभले अशा व्यक्तींपैकी राजश्री पांडुरंग नारायण वैद्य, अमळनेर, ही एक आहे सतत ५४ वर्षेपर्यंत त्यांना श्रीमान शेठजींचे सान्निध्य लाभले आहे त्यांच्या वयाने सत्तराची मर्यादा गाठली आहे त्यांनी श्रीमंत प्रतापशेठजींचे जीवन अगदी जवळून न्याहाळले आहे नव्हे, त्यांच्याशी ते समरस झाले आहेत त्यांच्या या निकटवर्तित्वामुळे व सतत सान्निध्यामुळे त्यांना श्रीमंत प्रतापशेठजींचे व्यक्तिमत्त्व स्पष्ट करून देणाऱ्या अनेक अविस्मरणीय व विनोदी प्रसंगांची आठवण अजून ताजी आहे

दि प्रताप मिल्स, अमळनेरमधील बहुतेक सर्व व्यक्ति, कारकुनापासून तो तहत अधिकारी वर्गापर्यंत रा पांडुरंग नारायण वैद्य यांना 'पांडुतात्या' या प्रेमळ नावाने ओळखतात ते एक विनोदमूर्ति आहेत त्यांच्या हजरजबाबी विनोदाने एकणारा खदखदून हसणार नाही असा दुर्मिळ ! खुद्द श्रीमंत प्रतापशेठजी तात्यांना आग्रह करून विनोद करावयास लावतात त्यांच्या कोट्या पोट धरधरून हसावयास लावतात त्यांच्याजवळ अनेक हास्यकारक सत्य घटनांचा संचय आहे त्यांनी आपल्या आठवणींच्या पोतडीतून एक एक रहस्यमय कथा बाहेर काढली की, बैठकीत हास्यकल्लोळ उठल्याविना राहात नाही श्रीमंत प्रतापशेठजी प्रवासात तात्यांना बरोबर घ्यावयाचे विसरत नाहीत, कारण प्रवासात तात्या असले की कंटाळा, आळस कधीहि यावयाचा नाही हे अगदी ठरलेलेच !

वयाचे १६ वे वर्षी रा पांडुतात्या श्रीमंत शेठजींचे नोकरीत रुजू झाले परंतु श्रीमान शेठजींनी त्यांना कधीहि नोकराप्रमाणे वागविले नाही श्रीमंत प्रतापशेठजींची नोकरी त्यांनी इमानेइतबारे आजतागायत केली, व करीत आहेत श्रीमान प्रतापशेठजींचे सान्निध्यामुळे त्यांना त्यांच्या जीवनातील प्रसंगांच्या आठवणी लिहून देण्याबद्दल अमृतमहोत्सव गौरवग्रंथ समितीने सांगितल्यावरून त्यांनी लिहिण्याचे ठरविले, परंतु वयोमानपरत्वे व मोतीबिंदुमुळे त्यांचे डोळे पूर्ववत् काम करीनातसे झाले असल्याने त्यांनी मला ते काम सांगितले त्यांच्याजवळ बसून त्यांची गोष्ट श्रवण करावी, व त्या गोष्टीस वाङ्मयसौंदर्याचा साज चढवून तिला सुरम्य वाचनीय स्वरूप देण्याचे व तिचे समग्र लिखाण करण्याचे काम माझ्या हातून घडले खरे ! तरी पण तात्या एकदा वर्णन करू लागले की नेहमी मला तो प्रसंग नजरेसमोर घडत आहे की काय असा आभास होई त्यांची वर्णनाची शैली अवर्णनीय आहे यात शंका नाही त्यांनी स्वत चाच एक प्रसंग निवेदन केला तो फारच गमतीदार व चातुर्यपूर्ण आहे

एक हिंदी गृहस्थ श्रीमान् शेठजीना भेटण्याकरिता आले त्या अगोदर श्रीमान् शेठजीना बरीच मंडळी भेटून गेली होती, त्यामुळे ते जरासे थकल्यासारखे झाले होते रा पांडुरंगतात्या दारातच या हिंदी सद्गृहस्थास भेटल्यामुळे त्याने तात्याना विचारले, 'शेठसाहेब, अदर है, भाई ?' तात्यानी उत्तर दिले, 'है ।' 'क्या, मैं अभी मिल सकता हूं ?–' असा दुसरा प्रश्न त्या गृहस्थाने केला तेव्हा तात्या म्हणाले, बहोत आदमी मिलके गये है । अब शेठसाहेब जरा आराम करनेवाले है । इस लिये वे आपको मिल न सकेंगे ।

यावर तो अगदी लगटच करू लागला व म्हणू लागला, ' हमको मिलना बहोत जरूरी है, भाई । कैसे भी मुझे उनको मिलना चाहिये । ' या त्याच्या भाऊगर्दीकडे पाहून तात्यानी त्याला एक दोहरा म्हणून दाखविला तो असा—

अरे भाई, मिल मिल सब कोही कहे ।<br>
मिलना धनीके हाथ ।<br>
मोतीलाल माणक, मिले ।<br>
यह किस्मत की बात ॥

हा दोहरा वाचकाचे चटकन् लक्षात येईलच हा द्व्यर्थी आहे धनी म्हणजे एक अर्थ-मालक, व दुसरा–ईश्वर तसेच ' मोतीलाल माणक ' हे श्रीमान् प्रतापशेठजीचे शुभ नाव आहे, हा एक अर्थ, व दुसरा–मोती, लाल, माणक इत्यादि संपत्ति हा अर्थ अशा रीतीने तात्यानी त्या गृहस्थास आश्चर्यचकित करून सोडले ' वा भाई, तुमने तो कमाल किया ।' असे म्हणून तो निघून गेला

तात्याचे पाठान्तर खूप आहे व ते बहुश्रुत आहेत शिवाय स्मरणशक्तीहि तीव्र आहे तात्या आले की सर्वजण त्याचेभोवती गोळा होतात, व एखादा गमतीदार प्रसग सागण्याबद्दल आग्रह करतात 'अलम् अतिविस्तरेण !'

यापुढील पानामधून श्रीमत प्रतापशेठजींचे जीवनाचे काही पैलू प्रकाशात आणणाऱ्या प्रसगाचे लेखन दिसून येईल घटना सत्य आहेत त्या 'चक्षुर्वैसत्यम' आहेत, त्यामुळेच अधिक सुरस आहेत तात्यानीं हे प्रसग माझ्याकडून लिहून घेऊन श्रीमत शेठजीची अप्रत्यक्ष अल्पशी सेवा करण्याचा योग आणला याबद्दल मी त्याचा सपूर्ण आभारी आहे.

आपला नम्र

**घ वि यरनाळकर**

## जन्मभूमीचें स्वल्प दर्शन :

श्रीमान् प्रतापशेठजी याचा जन्म राजस्थानात झाला ते एक राजस्थानी आहेत राजस्थान हे एक अनेक शूर स्त्रीपुरुषाचे, नरवीराचे जन्मस्थान असल्याचे आपला इतिहास सागतो अशा शूराच्या भूमीत जन्म घेणारे श्रीमान् प्रतापशेठ हे एक नररत्न, दानशूर व प्रसिद्ध उद्योगपति आहेत महाराष्ट्राचे प्रसिद्ध सतशिरोमणि श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्या दिवशी समाधिस्थ झाले, त्याच दिवशी,

म्हणजे कार्तिक वद्य १३, संवत् १९३६, ता ११ डिसेंबर १८७९ रोजी यांचा जन्म झाला प्रात कालची वेळ, ब्राह्ममुहूर्त प्राप्त झाला असताना श्रीमान शेठजींनी या भूलोकात पाऊल ठेवले जयपूर संस्थानातील 'मोहनपुरा' नावाच्या एका लहान गावी त्यांनी जन्म घेतला खरा, पण पुढे ते महाराष्ट्रात स्थायिक होतील हे एक भविष्यकालच जाणू शकला असता

श्री प्रतापशेठ ३-४ वर्षांचे असताना छोटूरामजींनी मोहनपुरा गाव सोडले व जवळच नवापुरा येथे सर्व मंडळीसह राहावयास गेले प्रतापशेठ यांचे आजोबा गोपीरामजी व आजी यांचेसह सर्व मंडळी नवापुरा येथे राहण्यास गेली सात्त्विक वृत्ति व तेजस्विता अंगी बाणलेल्या एका मध्यम स्थितीत असलेल्या गरीब पण स्वाभिमानी कुटुंबात त्यांनी जन्म घेतला छोटूराम हे त्यांच्या जन्मदात्या पित्याचे नाव घरच्या गरीबीमुळे श्रीमान प्रतापशेठजींना उंट व शेळ्या चारावयास जंगलात जावे लागे चोपडा (पूर्व खानदेश) येथे राहणारे कै श्रीमान माणकचन्दजी यांना पुत्रलाभ झाला नाही म्हणून त्यांनी आपले मुनीम कै रा गोकुलदासजी यांना कोणा तरी सुंदर मुलास शोधून आणण्यास पाठविले, परंतु रा गोकुलकाकांना ते काम जमले नाही म्हणून श्री माणकशेठजींनी त्यांचे मामेसासरे श्री काशीदासजी हे मारवाडला जाणार होते त्यांना तिकडूनच एखादा चांगला बालक घेऊन येण्याबद्दल सांगितले श्री काशीदासजी जेव्हा नवापुऱ्यास आले त्या वेळी श्री प्रताप-शेठजी उंट, शेळ्या चारावयास जंगलात गेले होते उंट चारण्यास जाणारा हा बालक पुढे संपत्तिमान् होणार होता ही एक विधिघटनाच होय बडोदा येथील भूतपूर्व नरेश कै सयाजीराव महाराज गायकवाड हे देखील राजघराण्यात दत्तक जाण्यापूर्वी अशाच प्रकारे मेंढ्या-बकरी चारावयास घेऊन जात होते, असें बडोद्याच्या राजघराण्यातील नरेशांच्या चरित्रावरून दिसून येते

श्रीमान् प्रमापशेठजींचे वास्तव्य मोहनपुऱ्यास व नवापुऱ्यास असताना 'रामप्रताप' असे त्यांचे नाव होते दत्तविधानानंतर त्यांचे 'मोतीलाल' असे नामाभिधान झाले नवापुऱ्यास एक वृद्ध स्त्री त्यांची दूरची नातेवाईक होती त्यांना लाडाने 'परत्या' म्हणून संबोधणारी ही एकच स्त्री हयात होती या वृद्धेच्या घरी गेल्यानंतर घरच्या मंडळींनी तिला सांगावे की, 'माजी, चोपडावाला, रामप्रतापजी आ गया है ।' तिने आनंदून म्हणावे, कठे है ?' त्यावर त्या मंडळींनी परत सांगावे की, 'थाके पासहि बेठ्या है,' नंतर त्या वृद्धेने आपल्या हाताने चाचपडावे व श्रीमान् प्रतापशेठजींना शोधावे हातास लागताच तिने पाठीवरून ममतेने हात फिरवीत म्हणावे, कौन रे, म्हाको 'परत्या' आया कॉई । ' यावर श्री शेठजींचे हृदय गद्गदून येई व ते म्हणत, हॅा माजी '

' बेटा, निफा छो ना ? म्हाको मोळ्यो ओर उकेटावर दुबर तो ठीक है ना ? असे म्हातारीने विचारल्यावर श्री शेठजींनी होकारार्थी मान हालवावी त्याचप्रमाणे तिने पुढे म्हणावे, ' और म्हाके बिंदणी भी ठीक है ना ? 'ठीक' असे श्रीमान शेठजींनी आदराने सांगावे

अशा रीतीने श्रीमान शेठजींना 'परत्या' या एकेरी नावाने संबोधणारी वृद्ध माणसे होती

प्रतिवर्षी श्री शेठसाहेब मारवाडात कालाडेरा येथे जाऊन स्वत बांधविलेल्या आपल्या नव्या हवेलीत (बंगल्यात) थोडा काळ राहातात व तेथून ते मोहनपुरा, नवापुरा व बासा या गावी जाऊन

नातेवाइकास भेटून येत असतात बासा गावी श्री शेठजींचे आजोळ आहे आजोळी असणारे मामेभाऊ श्री झाजुरामजी यांचाहि श्री शेठजींचवर पूर्ण लोभ आहे त्याना भेटण्यास श्रीमान शेठसाहेब जात त्या वेळी बासा गावाजवळ गेल्यानंतर श्रीमान शेठजींना आपल्या बाल्यावस्थेतील खेळ आठवत लहान असताना काही दिवस ते आजोळी राहेल असताना बकऱ्या चारावयास गावाजवळ असणाऱ्या डोंगरात जात असत या डोंगरातून चारा, काटक्या, लाकडे, वगैरे गोळा करून ते घरी घेऊन जात असत या डोंगराजवळच एक रेतीची मोठी टेकडी आहे त्या रेतीचे टेकडीचे माथ्यावरून श्रीमान शेठसाहेब बालपणी आडवे पडून घरंगळत पायथ्यापर्यंत जात असत हा खेळ त्याना फार आवडत असे जेव्हा जेव्हा ते मारवाडात जातात, तेव्हा तेव्हा बरोबर असणाऱ्या मंडळींना ते आजहि तसा खेळ करून दाखवितात, आणि गमत ही की, त्या सर्वानाहि तसे लोळत जाण्याची सुरसुरी येते व तेहि वरून खालपर्यंत लोळत जातात

श्रीमंत प्रतापशेठजींना मारवाडातून श्री काशीदासजी चोपड्यास घेऊन आले श्री माणकचंदजी याना मुलाबद्दल पहाताच प्रेम निर्माण झाले व त्यानी त्यास घरी ठेवून घेतले पुढे दोन वर्षे लोटल्यावर यथाविधि दत्तविधान करण्यात आले, व श्री प्रतापशेठजींचे नाव 'मोतीलाल' असे ठेवण्यात आले दत्तविधान वैदिक पद्धतीने व मोठ्या समारंभाने करण्यात आले पुढे श्रीमंत शेठजींच्या बालशिक्षणास प्रारंभ झाला

## सावळाराम मास्तर :

पूज्य पिताजी श्री माणकचंदजी वारल्यानंतर श्रीमंत प्रतापशेठ यांचे मन उदास झाले घरात गायन-वादनाची अनेक वाद्ये होती त्याचा उपयोग व्हावा व त्यांचे मन रमावे म्हणून रा गोकुळकाकानी सावळाराम बाळाजी नाईक याना दरमहा दोन रुपये पगारावर गुरुजी नेमले सावळाराममास्तर हे एक सुस्वभावी व सदाचरणी वेदान्ती होते निर्लोभी व निःस्पृहवृत्ति त्यांच्या अंगी वसत होती ते परमार्थात व तत्त्वज्ञानात रंगलेले होते त्यांची चित्तशान्ति अनुपम होती त्यांच्या सहवासात येणारा मनुष्य परमार्थाची पायरी चढल्याविना राहात नसे मार्मिक व सुगम विश्लेषण पद्धति त्याना अवगत होती कोणताहि विषय अतिशय सोप्या भाषेत सांगणे त्याना साधलेले होते प्रारंभी सतार-वादनाकरिता जरी सावळाराम मास्तर याना नेमले होते, तरी पुढे पुढे श्रीमंत प्रतापशेठजींना मराठी शिकविण्याचे काम त्यानी हाती घेतले श्रीमंत प्रतापशेठजींच्या शिक्षणाला सावळाराम मास्तरासारख्या तत्त्वनिष्ठ पुरुषाचे हाताखाली सुरुवात झाली हे एक त्यांचे भाग्यच म्हणावयाचे ! वास्तविक पाहता श्री शेठजींना परमेश्वरकृपेने गडगंज संपत्ति होती मनात आणले असते तर ते चैन करू शकले असते परंतु कर्मवशात् त्याना सावळाराम गुरुजींसारखे सात्त्विक विचाराचे गुरु प्राप्त झाले आणि त्यांच्या जीवनाला एक निराळेच वळण लागले श्रीमान शेठजींनीहि त्यांच्यापासून पुरेपूर लाभ घेतला हेहि एक अवघड कामच आहे कारण, उत्तम गुरु मिळूनदेखील त्यांच्यापासून योग्य तो फायदा घेण्याचे कार्य जर त्या शिष्याचे हातून झाले नाही तर 'वृथा तस्य जीवितम् !' श्री प्रतापशेठजींना मराठी शिक्षण तर मिळालेच मिळाले, पण त्यानी मास्तरसाहेबाकडून वेदान्त

विषयाची गोडी चाखली वेदान्तमार्गात पोहून जाणे अगम्य आहे, पण मास्तरसाहेबासारख्या धुरंधर नावाड्यान्च्या सहाय्याने श्रीमान प्रतापशेठजींनी ते धाडस केले अध्यात्मिक ज्ञानाची चटक एकदा लागली की सुटत नाही सावळाराम मास्तरान्च्या सल्ल्यानेच श्रीमान शंकराचार्य, स्वामी विवेकानंद, रामकृष्ण परमहंस यासारख्या तत्त्वज्ञानी ज्ञानवंतान्च्या ग्रंथाचे अभ्यसन करून श्रीमान प्रतापशेठजी यांनी वेदान्तान्तर्गत रसाचे पान केले, व त्याबद्दल भरीव कार्य म्हणून त्यांनी तत्त्वज्ञानमंदिराची उभारणी केली या मंदिरास आज अखिल भारतात फार मानाचे स्थान आहे

सावळाराम मास्तराची राहणी अत्यंत साधी व विचारसरणी अत्यंत सात्त्विक व उच्च प्रकारची होती अंगात सदरा, डोक्यावर पागोटे, गळ्याभोवती उपरणे, प्रसंगविशेषी कोट व माजलसे धोतर, पायी नगरी जोडा, इतकेच त्यान्यात सद्गुणाचा वास निश्चित होता, परंतु त्यांचा स्वभाव किंचित् संशयी होता या संशयी स्वभावाबद्दल सावळाराम मास्तरांचे जीवनात घडलेले काही मनोरंजक विनोदी प्रसंग ओघाओघाने आले म्हणून येथे देत आहे

## प्रसंग १ ला :

श्रीमान प्रतापशेठजींचे चोपडे दुकानी माडीवर कै सावळाराम मास्तराचा क्लास चालत असे रोज सकाळी व सन्ध्याकाळी दोन वेळ मास्तरसाहेब तेथे येऊन शिक्षण देत असत त्या दुकानास पुढे ओटा आहे व माडीवर जाण्यास दोन मार्ग आहेत एकदा अशी गोष्ट घडली की, मास्तर ज्या मार्गाने नेहमी माडीवर जात, त्याच मार्गावर एक महारोगी बसलेला होता मास्तरसाहेब नेहमीप्रमाणे त्या मार्गाने जाण्यासाठी आले तो त्यांनी त्या महारोग्यास वाटेत बसलेले पाहिले त्यांना एकदम किळस आली व ते दुसऱ्या मार्गाने माडीवर गेले त्यांनी लगेच दुकानान्च्या शिपायास बोलावून घेतले व त्यास तो ओटा व पायऱ्या स्वच्छ धुऊन काढावयास लावले तेवढ्यानेहि त्यांचे समाधान झाले नाही, तर पुढे बरीच वर्षेपर्यंत त्या रस्त्याने त्यांनी माडीवर जाण्याचे वर्ज्य केले

## प्रसग २ रा :

मास्तरसाहेबाना मूळव्याधीन्च्या रोगाने अतिशय त्रस्त करून सोडले होते रोगमुक्त होण्यासाठी खूप प्रयत्न केले तसेच श्री प्रतापशेठजीनीहि खटपट केली पण व्याधिनाश होईना तेव्हा एक दिवस रा पांडुरंगतात्या यांनी मास्तरसाहेबाना म्हटले, "गुरुजी, आपण अमीरभाई हकीमाचे औषध घ्यावे असे मला वाटते ते वयोवृद्ध व अनुभववृद्ध आहेत गावातल्या पुष्कळ मंडळींना त्यांनी रोगमुक्त केले असल्याचे आमच्या कानी आले आहे तेव्हा आपली संमति असेल तर मी त्यास बोलवून घेतो इथेच दुकानान्च्या मागील बाजूस घर आहे त्यांचे।" कै सावळाराम गुरुजींनी होकार दर्शविताच अमीरभाईस बोलवून आणले त्यांनी प्रकृति पाहिली व म्हटले—

'इतने दिन आपने क्यू नहीं इलाज किया? इस व्याधी को मैं सात दिनके अंदरहि हटा दूँगा। आप को सिर्फ इतना ही करना पडेगा कि मैं जो कुछ देऊंगा वह खा लेना और पथ्य रखना।'

सावळाराम गुरुजींनी ते मान्य केले त्यानंतर त्या हकिमाने सात दिवसाच्या चौदा पुड्या पाठविल्या आणि त्या लोणी व खडीसाखरेतून ध्यावयास सांगितले सात दिवसानंतर त्या हकिमाच्या सांगण्याप्रमाणे रोगाचे निर्मूलन झाले व पुढे आठएक दिवसात मास्तरसाहेबाची प्रकृति खडखडीत बरी झाली त्यांनी त्या हकिमास बोलावून तसे सांगितलेहि पण !

या गोष्टीस थोडा काळ लोटला पुढे एक दिवस त्यांचेशेजारी राहणारे विनायकशास्त्री त्यांना मार्गात भेटले त्यांची मुद्रा बरीच चिंतातुर दिसल्यामुळे मास्तरांनी त्यांना विचारले– 'काहो शास्त्रीबुवा, आज जरा काळजीत दिसता ?' शास्त्रीबुवा बोलले, 'काय करावं मास्तरसाहेब, आमच्या चिरंजीवास – त्र्यंबकाला – बरेच वाटत नाही पहा मूळव्याधीने अगदी जर्जर केलेय—!' मध्येच त्यांना थांबवून मास्तरसाहेब म्हणाले, 'अरेरे, मूळव्याधच ना ! मग तुम्ही मुळींच घाबरू नका ! त्याला अगोदर माझ्याकडे पाठवून द्या ! मी करतो त्याच्या औषधाची योजना ! त्याला पाठवून द्या अगोदर ' विनायकशास्त्र्यांनी चि त्र्यंबकला मास्तरांचेकडे पाठवून दिले मग कै मास्तरांनी त्यास हकिमाकडून औषध घेण्यास लावून दिले त्याप्रमाणे त्र्यंबकशास्त्री औषध घेऊन आले सात दिवसाच्या चौदा पुड्या त्याने दोनएक दिवस औषध घेतले व त्याचा त्यास गुण आला पण रोग निर्मूलन झाले नव्हते त्या ब्राह्मणाने पुढे चार दिवस श्राद्धपक्षाची जेवणे झडविली विशेषत मिरची, भजी वगैरे खाऊन त्याला कुपथ्य झाले, आणि परिणाम म्हणून त्याची मूळव्याध दुणावली सात दिवसानंतर तीच तक्रार घेऊन तो मास्तरसाहेबाकडे आला व सांगू लागला, "का हो गुरुजी, तुम्ही सांगितलेल्या त्या हकिमाचे औषधाने मला बरे वाटण्याचे तर राहोच, पण जास्तच झाले आहे

"ऑऽऽ काय म्हणतोस ? त्या हकिमाचे पुड्यांनी तुला बरे नाही वाटले ? उलट जास्तच झाले आहे ? अगदी तश्शाच पुड्या होत्या का रे ?" थोडेसे साशंकतेने मास्तर म्हणाले

"तुम्ही सांगितल्या तशाच पुड्या, तितक्याच दिवसांच्या !" त्र्यंबकने खुलासा केला

"मग तुला बरे वाटले नाही तर !" खात्री करून घेत मास्तर म्हणाले – "अरेरे ! मग मलाहि रोग पुन उद्भवला आहे असं वाटायला लागलय !"

मग त्यांनी त्या हकिमास बोलावून घेतले व विचारले की, "हकीमजी, का हो, त्या त्र्यंबकला तुम्ही तेच औषध देऊनदेखील बरे का वाटू नये ? उलट रोग दुणावला असे तो म्हणतो " तेव्हा हकीमजी न कचरता हसून म्हणाले, 'मास्तरसाब, आपकी भूल हो गयी है। मेरी दवासे ऐसा कभी नही होगा। आप फिक्र न कीजिये। उनको बुलावा कीजिये मैं आपके सामने ही उन की पूछताछ करता हूँ !'

त्र्यंबकला बोलावणे गेले तो आल्यावर त्यास हकिमाने विचारण्यास सुरुवात केली, 'क्यो बेटा, तूने मेरी दवा खा लिया ?' 'जी, हाँ' त्र्यंबक म्हणाला 'अच्छी तरहसे।' हकिमांनी पुन्हा विचारले त्यावर त्र्यंबकनें होकार भरला 'सात दिन में तुमने पथ्य रक्खा था क्या बेटा ? सच बता देना हां ' हकिमाने मूळ मुद्द्यास हात घातला थोडेसे चाचरत व काहीसे आठवत त्र्यंबक म्हणाला, "हाँ जी , थोडासा कुपथ्य हुआ। मैं दो तीन यजमानो के घरमे भज्जीयाँ बहोत खा लिया। माफ करना।"

हकिमाने विजयी मुद्रेने कै सावळाराम गुरुजींकडे पाहिले, व म्हटले, " भाई, अब ऐसा करो। फिर मुझसे दवा ले जाना और दो महिने तक पथ्य रखना। खाली रोटी और घी, इतनाही खाना लेना। फिर देखना तुम्हारी तबियत कैसी हो जायगी।"

त्यानतर दोन महिन्यानी त्र्यबक मास्तराना भेटायला गेला त्याची प्रकृति निरोगी झाली होती त्याला आलेला पाहताच मास्तरानी विचारले, " का त्र्यबक, कस काय आहे ? "

"सपूर्ण बरा झालो आहे, मास्तरसाहेब" असे त्यान्च्या तोडून उत्तर आल्याबरोबर मास्तर-साहेबहि आनदून म्हणाले, " मग मलाहि आता बरे वाटत आहे "

अशा रीतीने वरील दोनाहि प्रसग कै मास्तरसाहेबाचा सशयी स्वभाव दर्शवितात. परतु 'एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दो किरणेष्विवाङ्क ।'

कै सावळाराम बाळाजी नाईक हे एक उत्तम सतारिया होते ततुवाद्ये ते उत्तम प्रकारे वाजवीत सशास्त्र सगीत ते जाणत असत भारदस्त रागदारी व गानशैली त्याना अवगत होती त्यान्च्या या गानपटुतेचा फायदाहि श्री शेठजीना थोडासा मिळाला श्री प्रतापशेठजीहि सतार वाजवावयास शिकले ते स्वत गत तोडा वाजवीत असत गायन, वादन याविषयी अभिरुचि श्रीमान् शेठजींना कै मास्तरसाहेबाकडून मिळाली व वृद्धिंगतहि झाली यामुळे बाहेरगावचे सतारिया, बीन-कार व गवई मडळी श्री प्रतापशेठजीन्याकडे येऊन हजेरी देऊन जात, व काही वर्षे नोकर म्हणून ही राहून जात श्री शेठजी त्याच्या गुणाची वाहवा करून त्याना योग्य ती सभावना देत असत अशा बैठकी जुळवणे व त्या रगविणे हे काम त्यान्च्या सतत सहवासात असलेले रा पाडुरग नारायण वैद्य ऊर्फ पाडुतात्या यानी उत्तम प्रकारे करावे रा पाडुतात्या याना लहानपणापासूनच वादन व गानश्रवणाचा नाद होताच व ही जी गायक किंवा वादक मडळी येत असत त्याचे बैठकीचे वेळी रा पाडुतात्या हे तबला–वादनाची साथ करीत असत श्री शेठजीन्च्या नजरेत ही गोष्ट आली व त्यानी एक दिवस रा पाडुतात्या याना बोलावून सुचावेले की, पखवाज, वादनाचा नाद तुला उपजतच आहे व तू वाजवतोसहि बरा माझी इच्छा अशी आहे की, तू बाहेरगावी जाऊन नामाकेत पखवाजीकडे थोडे दिवस शिक्षण घ्यावेस त्याप्रमाणे श्री शेठजीनी इदोर व नगर या ठिकाणी पत्रव्यवहार करून रा पाडुतात्या याना प्रथम थोडे दिवस इदोर येथे, व त्यानतर कै नायबुवा नगरकर (कै नाना पानसे याचे पट्टशिष्य) यान्याकडे खास पखवाज शिक्षणाकरिता पाठविले हे नायबुवा श्री शेठजीन्च्या-कडे बरेच वेळा येऊन पखवाज-वादन-कौशल्य दाखवून गेले होते

शिक्षण घेऊन आल्यानतर रा. पाडुरगतात्या गवयाची व वीनकाराची साथ उत्तम प्रकारे करीत असत कधी कधी ते स्वतत्र पखवाज वादन करीत ध्रुपद, धमार वगैरे परण वाजवून दाखवीत रा पाडुरगतात्या याना वयाचे १६ वे वर्षी, अजमासे सन १९०० मध्ये पाठविले होते पुढे त्याना मोटर-ड्रायव्हिंग शिकण्यासाठी त्याचे वयाचे ३०–३२ वे वर्षी श्री शेठजींनी मुबईस पाठविले श्री शेठजीन्च्या कृपेने रा. पाडुतात्या याना वरीलप्रमाणे दोन प्रकारच्या शिक्षणाचा लाभ झाला,व त्याचा उपयोग श्री शेठजीनी उत्तम प्रकारे घेतला सध्या रा पाडुतात्याचे वय सत्तर असल्याने त्यान्च्या

बोटाना वातविकाराने पखवाज वाजविणे व मोटर चालविणे अशक्य झाले आहे तसेच नजर कमी झाली असल्याने ते सध्या मिलमध्ये मोटर सुपरव्हिजनचे काम पाहतात

श्रीमान् प्रतापशेठजीन्या या गानप्रियतेमुळे वर उल्लेखिल्याप्रमाणे पुष्कळ गवई, बीनकार व सतारिया त्याचकडे येऊन गेले नजीरखॉ सतारिया व मुरादखॉ बीनकार हे काही दिवस श्री शेठजीकडे राहून गेले होते या अनुषगाने श्री शेठसाहेब यान्याकडे येणाऱ्या गवयासबधी व त्याचे बैठकीचे प्रसगी घडलेल्या काही गमतीदार व विनोदपूर्ण गोष्टी खाली देत आहे

## मुनीरखांचा घोटाळा :

श्रीमान् शेठ गंगाराम छबिलदास यान्च्या मुबई पेढीचे मुनीमजीचा मुलगा बच्चुभाई याचे लग्न अमळनेरच्या गगाराम सखाराम शेठ शिंपी यान्या मुलीशी ठरले होते त्या लग्नास श्रीमत प्रतापशेठ चोपड्याहून अमळनेरला आले होते येथे आले असताना श्री बाबूराव मुठे व श्रीमत शेठजी फिरावयास निघाले ते स्टेशनवर आले सुरतेहून भुसावळकडे जाणारी गाडी नुकतीच येऊन उभी होती त्या गाडीत एका डब्यात मुनीरखा नावाचा एक गवय्या बसला होता त्याने श्रीमत शेठजीना पहाताच एकदम " ओ हो, हो, हो ! शेठसाहाब !" असे हाक मारून मोठ्या प्रेमाने त्यान्याशी हस्तान्दोलन केले व पुढे असे म्हटले—" आपने तो बहोतही रिआज ( Practice ) बढा दिया है।" श्रीमत शेठजी म्हणाले, " कुछ नही, कुछ नहीं, कायका बढाया ?" मग तो म्हणाला—" चोपडे के वो प्रतापशेठ भी है। लेकिन उनमे कुछ दम नही।"

मुनीरखाने असे म्हणताक्षणीच श्रीमत प्रतापशेठजीचे डोक्यात प्रकाश पडला व मग ते मुनीरखाला म्हणाले, " उस्तादजी, ऐसा कैसा ? प्रतापशेठ-कहॉ राजा भोज और हम कहॉ गगल्या तेली ! हमसे उनकी बराबरी कैसी होगी ?" उस्तादजी म्हणाले, " छोडो हो, उसमे क्या जी है !"

नतर श्री प्रतापशेठजीनी प्रतापशेठजीची स्तुति करीत जायची, व त्याने प्रतापशेठजीची निंदा करायची असे बऱ्याच वेळा झाल्यावर, पुढच्या डब्यात रावरचे बालकिसन शेठ बसले होते, त्यानी श्रीमत प्रतापशेठजी याना पाहून त्याना हाक मारली व प्रतापशेठजी तिकडे गेले त्यान्याशी दोन चार शब्द बोलणे होते न होते एवढ्यात गाडी हालली इकडे बाबूराव मुठे यानी त्याला सागितले की " उस्तादजी, ये ही तो प्रतापशेठ है।"

जेव्हा त्या मुनीरखाचा डबा श्री शेठजीचे समोरून पुढे सरकू लागला, तेव्हा उस्तादजीनी श्रीमत प्रतापशेठजीना म्हटले, " शेठसाहाब, आपने हमको फसा दिया !" यावर श्रीमत शेठजी म्हणाले, " हमने आपको फसाया की आप खुदही फस गये ?"

## पांडोबा येवलेकर :

चोपड्याजवळच ( पूर्व खानदेश ) उनपदेव या नावाने प्रसिद्ध असलेले, एक गरम पाण्याचा झरा असलेले कुड आहे या ठिकाणी स्नान करण्याकरिता खानदेशातील बहुतेक मडळी येत असतात

एकदा शिरपुर मुक्कामचे श्री शेठजींचे परम स्नेही श्री कुलकर्णी सबजज्ज हे आपले कोर्टाचे व इतर अधिकारी मंडळीसह चोपड्याजवळ उनपदेव येथे गरम पाण्याच्या झऱ्यात स्नान करण्यासाठी जाण्याचे निमित्ताने सहलीवर आले त्यांनी प्रथम श्री शेठसाहेबांना तारेने कळविले होते व त्याप्रमाणे ती सर्व मंडळी चोपड्यास श्री शेठजींच्याकडे आली श्री शेठजींनी त्यांचे उत्तम प्रकारे स्वागत केले रात्रौ त्या मंडळींना श्री शेठजींच्याकडून मेजवानी देण्यात आली बोलता बोलता सहज श्री कुलकर्णीसाहेबांनी म्हटले —'शेठसाहेब, आपल्याकडे गवई मंडळी आहेत असे ऐकले तेव्हा या मंडळींना आज आपण थोडं ऐकवा ना !" श्रीमान् शेठजींनी ते मान्य केले थोडासा विचार करून श्री शेठजींनी रा पांडुतात्यांना बोलावणे पाठविले रा पांडुरंगतात्या येताच त्यांना श्री शेठजी म्हणाले, 'पांडुरंग, आज या मंडळींना गाणं ऐकवायचं आहे तेव्हा पाडोबा येवलेकराला रात्रौ ९ वाजता येण्याची तयारी ठेवायला सांग ' 'बरं आहे ' असे म्हणून रा पांडुरंगतात्या पाडोबा येवलेकर यांच्याकडे जाण्यास निघाले

हे पाडोबा येवलेकर जवळ जवळ दोन वर्षे श्री शेठजींच्या सेवेत होते ते ध्रुपद, धमार व ख्याल, टप्पा गायकी उत्तम जाणत असत त्यांचा आवाजहि मधुर असून श्रोत्यांना रंगविण्याची कला त्यांना पूर्ण अवगत होती ते एक शिवभक्त होते आपली गानदेवता प्रत्यक्ष उमामहेश्वर आहेत असे ते समजत असत म्हणून शंकराचा प्रसाद असे मानून त्यांना गांजा ओढण्याची सवय होती, त्यामुळे त्यांचा बहुतेक काल नशेतच जात असे तरीहि श्री शेठजी यांच्याकडे दिवसातून सकाळ सध्याकाळ हजेरी देण्याचे त्यांच्या हातून कधीच चुकले नाही ते स्वत कर्मठ व सदाचरणी होते म्हणूनच श्री शेठजींनी त्यांची खाण्यापिण्याची सर्व व्यवस्था त्यांच्या चोपडे येथील दुकानांच्या जवळच असलेल्या श्रीबालाजीचे मंदिरात ह भ प दामुबुवा यांचेकडे केली होती रा पांडुरंग तात्यांना श्री शेठजींनी सांगितल्यावरून ते थेट पाडोबा येवलेकर यांचेकडे आले, व "रात्रीचे अजमासे ९ वाजता आपली बैठक करण्याचे ठरले आहे, आपण तयारीत असावे " असे सांगितले त्यावर पाडोबा म्हणाले, 'जरूर जरूर येईन '

रात्रौ ९ वाजण्याचे सुमारास बैठकीची आरास वगैरे करून रा पांडुरंगतात्या पाडोबा येवलेकर यांना बोलाविण्यास गेले त्या वेळी नुकतेच स्नानसंध्या आटोपून पाडोबा येवलेकर शंकराच्या प्रसादाचे यथेच्छ ग्रहण करून धुंदीत एकाग्रचित्त होऊन बसले होते त्यांच्या तल्लीनतेचा भंग तात्यांच्या आगमनाने झाला रा पांडुरंगतात्यांनी म्हटले, "महाराज, सर्व तयारी झाली आहे, चलायचं " त्यावर पाडोबांनी आपल्या तंद्रीतून डोळे थोडेसे किलकिले करून तात्यांच्याकडे प्रथम पाहिले व उत्तरादाखल म्हटले, "हे पहा, पांडुरंगजी, मी शेठजींचा नोकर आहे मी केव्हाहि यायला तयार आहे, पण माझं गाणं हे काही शेठजींचं नोकर नाही ! माझी आज तबियत लागत नाही " पाडोबांच्या या अनपेक्षित उत्तराने तात्या गारच झाले, व त्यांना भीतियुक्त आश्चर्य वाटले 'किंकर्तव्यमूढ' अशी अगदी अर्जुनासारखी तात्यांची स्थिति झाली ते तडक श्री शेठजींच्या सन्निध आले व त्यांनी पाडोबांचा निरोप जशाच्या तसा निवेदन केला श्री शेठजींना आश्चर्य तर वाटलेच, पण त्यांना रागहि आला त्यामुळे ते लगेच तात्यांना म्हणाले, 'पांडुरंग, उद्यापर्यंतचा हिशेब करून पाडोबा येवलेकरच्या

हातावर ठेव व त्याना साग,–तुम्हास रजा दिली आहे म्हणून आणि हे पहा, वेळ निभावून नेण्या-साठी गावातून कोणी गवई शोधून आण '

रा पाडुरगतात्यानी तशा आणीबाणीच्यावेळी हरप्रयत्न करून गावातून गवई शोधून आणला व वेळ मारून नेली गाणे जवळजवळ दोन वाजेपर्यंत चालले होते गाण सपल्यावर गावा-तली मडळी चालती झाली व घरची सर्व मडळी निजण्याच्या तयारीस लागली

इकडे पाडोबा येवलेकराची तद्री गाजाच्या सपुष्टतेमुळे उतरू लागली तेव्हा ते मादिरातून निघाले व श्री शेठजींच्या दुकानासमोरील पारावर आले त्या वेळी दुकानासमोर एक वट, पिपळ व निब अशा तीन वृक्षाचा त्रिवेणी पार होता त्या पारावर एक लहानसे मारुतीचे व महादेवाचे मदिर होते, व आजहि आहे या मदिराच्या समोर पारावरच उतारू बैरागी धुमी लावून बसत असत त्या बैरागी लोकाजवळ गाजा असायचाच ! तेव्हा पाडोबानी पारावर येताच 'जयराम बुवाजी' असे एका धुमी लावून बसलेल्या बैराग्यास म्हटले बैरागीबुवा म्हणाले, "लेव शकरका प्रसाद, लेव भैय्या !" मग पाडोबाना ब्रह्मानदच मिळाला, त्यानी सुरक्यावर झुरके मारले पाडोबाची हृदयवीणा श्री शेठजींच्या घरी सपत आलेल्या शेवटच्या मजुळ स्वरानी छेडली गेली होती त्यात शंकराच्या प्रसादाने अतर्मुख गानविद्या स्फुरण पावली ताबडतोब मादिरातून तबोरा (तानपुरा) आणवून त्या पारावरच धुमीजवळ आसन घालून 'बुवाजी, हम अब आपको शकरजीका भजन सुनायेगे !' असे म्हणून तबोरा सुरात मेळवून गायनास प्रारभ केला

रात्रौ अडीच वाजण्याचा सुमार, सभोवार शुभ्र चद्रप्रकाश विखुरलेला सृष्टिदेवता शान्त व प्रसन्न, अशा वेळी पाडोबानी ललत रागाच्या स्वराची मजुळ पखरण हळुवार पसरली पहाटचा राग व वेळेला अनुरूप असल्याने आसमत स्वरलहरीत न्हाऊन निघाला वातावरण धुद व भारावून गेले स्वराची आळवण कौशल्याने व खुबीने करण्याची हातोटी पाडोबानी हस्तगत केली असल्याचे ऐकणारास सहजच कळून आले असते तरल गतीच्या मधुर स्वराच्या फेकीने वातावरण विद्ध झाले होते झोपण्याचे तयारीत असलेल्या पाहुणेमडळीच्या व शेठजींच्या कानावर या स्वरलहरीचे मजु-गुजन आले थोडेसे मुग्ध होऊन 'हा मधुर कसदार आवाज कोठून येत आहे' अशा उत्कठेने काही जण गॅलरीत येऊन पाहू लागले कोणी गवई पारावर गात असल्याचे स्पष्ट दिसले मग सर्व मडळीनी श्री शेठजीना आग्रह करून खाली आणले, व पारावरच एक छोटीशी बैठक टाकून त्यावर बसले श्री शेठजीनी गवयास ओळखले होतेच त्याचा राग पाडोबा या व्यक्तीवर होता, म्हणून का गानकला प्रशंसनीय नाही ? पाडोबाचे गाणे सपूर्ण रगले होते त्यात पाहुणे मडळी रगून गेली मध्येच एका बैराग्याने पाडोबाना सूचना केली की, 'श्री प्रतापशेठ नीचे आके आपके पासही बैठे है।' हे ऐकून पाडोबानी नजर वळवून श्री शेठजींच्याकडे दृष्टि टाकली मग काय ? त्याच्या गाण्याला बहर चढला. गानदेवता प्रत्यक्षात उतरल्याचा भास झाला व मडळीना खालील सुभाषिताचा साक्षा-त्कार झाला—

यथा नयति कैलास नगं गान-सरस्वती ।
तथा नयति कैलास न गगा न सरस्वती ॥

पहाटेचे जोगी, भैरव हे गाऊन शेवट भैरवीने पाडोबानी कमाल केली गाणे सपले तरी मडळी जागची हालेनात पाडोबा तबोरा खाली ठेवून श्री शेठजीन्याकडे आले व हात जोडून म्हणाले, "काल मैफलीला मी आलो नाही याच कारण, मी जरी आपल्या सेवेला तयार होतो तरी माझी गानदेवता त्या वेळी तयार नव्हती त्यामुळ आपला थोडासा उपमर्द माझ्या हातून घडला आहे, याबद्दल दयाळ् अत करणान आपण क्षमा करावी" इतर मडळीन्या प्रसन्न चेहेऱ्यावरून श्री शेठजीना पाडोबाविषयी दया आली व त्यानी म्हटले, "आपल्या कालच्या वर्तणुकीचा मला बराच राग आला, व त्या रागात मी आपणास रजा देण्याची आज्ञाहे दिली आहे परतु आपल्या गान-कलेच कौशल्य पाहून आपणास रजा देण्याचा बेत रहित करून मी आपणास आजपासून पुन्हा नोकरीत ठेवीत आहे"

श्री शेठजीन्या दयार्द्र अत करणास अनेक धन्यवाद देत पाडोबा येवलेकर स्वस्थानास परत गेले

## 'रामकलीची प्राप्ति—'

या जगात मानव करणी करण्यास जन्मला खरा, परतु एका अदृश्य पण अद्भुत शक्तीच्या स्वाधीन त्याचे प्रारब्ध असल्याने त्याची कार्यशक्ति बाधल्यासारखी होते कार्य करणे हेच फक्त मानव जाणतो, पण त्या कार्याचा परिणाम कोणत्या रीतीने होईल हे तो जाणत नाही त्याच्या या प्रारब्ध-वशतेमुळे चागले किंवा वाईट परिणाम त्यास भोगावे लागतात तथापि 'मना त्वाचि रे पूर्व सचीत केले। तयासारिखे भोगणे प्राप्त झाले।' या समर्थान्या उक्तीप्रमाणे मानवाने पूर्वजन्मात पुण्यकर्म किंवा पापकर्म केले असेल, त्यानुसार इहजन्मात भोग भोगण्याची समर्थता त्याचे अगी असावयास पाहिजे श्रीमान् प्रतापशेठजी याच्या जीवनात 'रामकली'चे आगमन म्हणजे पूर्व-साचेतच होय

श्री प्रतापशेठजी अजमासे विशीन्या आतबाहेर होते त्या वेळी त्याचे वास्तव्य चोपड्यास त्याचे स्वत चे घरी होते नाशिकच्या सिंहस्थ मेळ्याकरिता द्वारकेहून नाशिककडे जाणारे जवळजवळ ५०० ते ७०० बैरागी चोपडे येथे मुक्कामास आले या विरक्त बैराग्याचे समवेत खूपच लवाजमा होता हत्ती, पालख्या, घोडे, उट, अबदागिरी, अशा थाटाने ते आलेले होते त्या बैरागी लोकाच्या शिरस्त्याप्रमाणे गावात कोणी धनिक यजमान मिळतो का पहावा या हेतूने त्याच्यापैकी काही महत हत्तीवर बसून ग्राममार्गाने विचारपूस करीत जाऊ लागले श्री प्रतापशेठजीचे नाव त्याचे कानावर आले त्यामुळे ते महत त्यान्या दुकानी येऊ लागले ही वेळ सकाळी आठ वाजण्याची होती

दुकानात हेड मुनीम रा गोकुळकाका होते त्याना महतानी श्री शेठजीविषयी विचारले रा गोकुळकाकानी उत्तर दिले की, मालक फिरावयास गेले आहेत श्री शेठजीना भेटण्यास महत तेथेच थाबून राहिले श्री शेठजी थोड्याच अवधीत फिरून आले त्यानी ते हत्ती दाराशी पाहिले, व दुकानात पाऊल ठेवल्यावर कोणी बैरागी बसलेले त्याना आढळले ही काय गर्दी आहे? अशी पृच्छा श्री शेठजीनी गोकुळकाकान्याजवळ केली सर्व वृत्तान्त गोकुळकाका सागत असतानाच मह-तानी मध्येच म्हटले, "श्रीमान् शेठसाहेब, आमचे भोजनाचा आजचा दिवस आपलेकडे आहे"

" आमचे मुनीमजी आपली सर्व प्रकारची व्यवस्था ठेवतील " असे सांगून, श्री शेठजी, ज्या ठिकाणीं हत्तीण उभी होती तेथे तिच्याजवळ जाऊन तिला थापटू लागले

त्या क्षणीच त्या हत्तिणीची व श्री शेठजीची अनोळखी फिटली बराच वेळ श्री शेठजी हत्तिणीस थापटताना पाहिल्यावर माहुतास साहजिकच विचारावेसे वाटले की, " मालिक, आपकी हाथीपर बैठनेकी इच्छा हो, तो आप बैठ सकते हो।" श्री शेठजींना जे हवे होते तेच मिळाले नंतर त्या हत्तिणीवर शेठसाहेब आरूढ होऊन गावात फिरून आले परंतु हौस म्हणून जरी ते त्या हत्तिणीवर बसून गावात हिंडले तरी त्यांना एक प्रकारचा कमीपणा वाटला त्यांना वाटत होते की, आपण दुसऱ्याचे मालकीचे हत्तिणीवर बसून गावात फिरलो हे काही बरे नाही त्या महंताना विचारून ती हत्तीण आपण कायमचीच आपल्याकडे ठेवली तर काय हरकत आहे ?" विचार आल्याक्षणीच त्यांनी मुनीमजींना आपला विचार बोलून दाखविला थोडेसे आश्चर्यचकित होऊन मुनीमजींनी भीति व्यक्त केली, की हत्ती पाळणे आपल्यासारख्या बनिया लोकांना मुष्किल जाईल ते काम एक राजा किंवा फकीरच करू जाणे परंतु श्री शेठजींचा निश्चय होऊन चुकला होता ते म्हणाले, " काय वाटेल ते होवो, मी ही हत्तीण घेणारच " नाइलाज होऊन मुनीमजी महंतांना म्हणाले, " महंत महाराज, श्री शेठजींची इच्छा आहे की, आपल्याजवळ असलेली ती हत्तीण आपण त्यांना द्यावी तेव्हा तिची किंमत काय आहे हे आपण सांगावे "

आनंदयुक्त मुद्रेने ते महंत हिंदीत म्हणाले, " मुनीमजी, तुम्ही काही काळजी करू नका ती हत्तीण श्री शेठजींना शोभून दिसते त्यांच्यासारख्या व्यक्तीजवळ ही वस्तु संग्रहणीय आहे आम्हास तिच्याबद्दल काही किंमत नको " परंतु श्री शेठजी ती तशीच घ्यावयास तयार होईनात मग नाइलाजाने महंत म्हणाले, " श्री शेठसाहेब, तुमच्याजवळून आम्हास काहीएक जास्त नको त्या हत्तिणीबद्दल आपण आम्हास रु २००० द्यावेत "

भाग्योदयाचा काल नजीक असला की अशा तऱ्हेच्या अनेक घटना घडून येत असतात श्री शेठजींनी महंतांनी सांगितलेली किंमत रु २००० व रु ५०० दक्षिणा म्हणून वर दिले सर्व बैरागी मंडळींचे यथास्थित भोजन झाल्यावर संतुष्ट अंतःकरणाने महंतांनी श्री शेठजींना आशीर्वाद दिला की—

" बेटा, यहांसे आगे इसी ही गजके आगमनके कारण गजान्त लछमी अपने ही पैरसे तुम्हारे घर आवेगी। फिक्र न करना। मगर इसकी देखभाल अच्छी तरहसे करना न भूलो।"

दाराशी आलेल्या या हत्तिणीची यथोचित व यथासांग पूजा श्री शेठजींनी पत्नीसमवेत केली या हत्तिणीच्या रोजच्या आहाराबद्दल माहुताकडे पृच्छा केली तेव्हा त्याने सांगितले की, रोज चार चौथे आटा, पाच शेर गूळ, चार शेर तूप, आट्याचे रोट करून ते तुपात चुरावयाचे व चारावयाचे शिवाय गवत वेगळेच

श्रीमान् शेठजींनी या हत्तिणीचे नामाभिधान 'रामकली' म्हणून ठेवले या रामकलीच्या पायगुणानेच श्री शेठजींनी चोपड्यास प्रेस फॅक्टरी, अमळनेरला प्रताप मिल, व नंतर धुळ्यास

दि न्यू प्रताप मिल काढल्या अशा रीतीने रामकलीची प्राप्ति म्हणजे श्री शेठजींचे पुढे झालेल्या भरभराटीचे प्रथमचे सुचिन्हच होय 'प्रसादचिन्हानि पुर फलानि'–या कविकुलगुरु कालिदास याच्या उक्तीतील मर्म प्रत्यक्षात उतरल्याचे श्री शेठजीन्या या प्रसगातून निदर्शनास येते अमळनेरला मिल काढण्याच्या सबधात श्री प्रतापशेठजींचे वास्तव्य अमळनेरला झाले येताना रामकलीसाहि त्यानी अमळनेरला आणले पुढे उन्हाळ्याकरिता श्री शेठजी डूमसला गेले असताना इकडे त्या हत्तिणीस आजार होऊन ती गतप्राण झाली त्यानतर बगाली मळ्यात तिचे मिठामध्ये दफन करण्यात आले श्री शेठजींना डूमसलाच ही गोष्ट समजली, तेव्हा त्याना फार वाईट वाटले

## पुष्करणींत अवगाहन :

'नसतींच विघ्ने येती घरा' या न्यायाने मनुष्य चिंततो एक व होते भलतेच असाच एक प्राणसंकटाचा प्रसग श्रीमत प्रतापशेठजींच्यावर आला होता पण सुदैवाने व रामकृपेने ते त्यातून वाचले

आश्विन शु ११ ला मोठ्या बालाजीचा रथ चोपड्यास निघतो हा रथोत्सव चोपडे येथील मोठ्या बालाजीचे मदिराचा असतो रथ या मदिरापासून निघून चोपडे येथील ब्राह्मणपूर दरवाजा-जवळ थांबतो येथे बालाजीचे पुष्करणीत स्नान होते त्या स्नानाचे वेळी भाविक लोक पुष्करणीत केळी, खारीक, बदाम वगैरे फेकतात इतर श्रद्धावत लोक प्रसाद म्हणून ही केळी वगैरे घेण्यासाठी धडपडत असतात कोण धडपड चालते !

अशाच एका यात्राप्रसगी श्री माणकचन्दजी यानी बरोबर श्री सुकाशेठ व एक शिपाई देऊन श्रीमत प्रतापशेठजींना पाठविले होते त्या वेळी श्रीमत प्रतापशेठजी जवळ जवळ ११-१२ वर्षांचे होते व चोपड्यासच राहात होते यात्रेत फिरून झाल्यावर श्री सुकाशेठ यानी श्रीमंत प्रतापशेठजींना पुष्करणीवर ज्या ठिकाणी प्रतिष्ठित मडळी बसतात त्या ठिकाणी बसविले व जवळच शिपायास उभे ठेवले, आणि श्री सुकाशेठ दुसरीकडे निघून गेले

बालाजीचे स्नान झाल्यावर बालाजी रथावर गेले व त्यान्या मागोमाग गर्दीहि हटू लागली श्रीमत प्रतापशेठजींना गर्दीमुळे त्याच ठिकाणी थांबावे लागले गर्दी कमी कमी होत होती एवढ्यात एक केळे पुष्करणी कुडात टपकन येऊन पडले ते अगदी श्री प्रतापशेठजींच्या समोरच पडले हे पडलेले केळे आपल्याकडे ओढून घेण्याकरिता समोरच्या पायरीवर बसलेल्या श्री प्रतापशेठजींचे एक नातेवाईक रा तुळसीराम पितांबरशेठ यानी हाताने पाणी आपल्याकडे ओढण्याचा सपाटा सुरू केला त्याचप्रमाणे त्यांच्याजवळच बसलेल्या इसमाने ते केळे आपल्याकडे यावे म्हणून पाणी ओढ-ण्याचा प्रयत्न चालवला जेव्हा श्री तुळसीराम पीतांबरशेठ याना ते केळे हातचे जाते असे वाटले, तेव्हा त्यानी श्रीमत प्रतापशेठजींना हाक मारून सांगितले की, 'प्रताप, तू घे ते केळे', आणि असे म्हणून त्यानी पाणी श्री प्रतापशेठजींचेकडे लोटण्यास सुरुवात केली श्री प्रतापशेठजी चौथ्या पायरीवर बसले होते ते खाली उतरून पाण्याजवळच्या पायरीवर आले व त्यानीहि पाणी आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न सुरू केला

एवढ्यात मागून एक मनुष्य तेच केळे घेण्याकरिता पाय-यावरून धडधड धावत आला त्याचा शेवटचा पाय पाण्यातल्या पायरीवरून घसरला व तो कुडातच पडला पडता पडता त्याने श्री प्रतापशेठजींचा पाण्याजवळ टेकून ठेवलेला हात ओढून घेतला त्याबरोबर दोघेहि पाण्यात पडले! त्या वेळी श्रीमंत प्रतापशेठजीना पोहता येत नव्हते तेवढ्यात एका साळ्याने ते पाहताच श्रीमत प्रतापशेठजीची शेडी धरून त्याना वर काढले श्रीमत प्रतापशेठजी पाण्यात पडल्याचे पाहून लोक घाबरू नयेत म्हणून त्यानीच वर काढल्याबरोबर हात वर करून लोकास सागितले की, तुम्ही काही घाबरू नका मी सुरक्षित आहे

घरून कोरडे कपडे आणवले व ते घालून श्रीमत प्रतापशेठजी घरी गेले श्रीमत प्रतापशेठजी पाण्यात पडल्याचे–त्याचे सासरे–श्री देवचद डाळूशेठ याना बाजारात दुकानी समजले ते ऐकताच घाबरून ते धावत सुटले व ओरडू लागले की, 'घर डूब गयो! घर डूब गयो!' परतु श्री प्रतापशेठजींचे दुकानात श्रीमत प्रतापशेठजीना सुरक्षित पाहताच त्याचे समाधान झाले व ते घरी परत गेले अशा रीतीने प्राणावरील सकट टळले

## भाषाभिन्नतेमुळे उद्भवलेले गमतीदार प्रसंग

श्री प्रतापशेठजी प्रतिवर्षी उन्हाळ्याकरिता थड हवेच्या ठिकाणी जात असतात अजमासें १९३१–३२ सालातील उन्हाळ्यात श्री प्रतापशेठजीनी उटकमडला जाण्याचे निश्चित ठरविले त्यानुसार त्यानी प्रथमच एक बगला भाड्याने घेऊन ठेवला होता श्री शेठजी, सौ शेठाणीजी, श्री बाबूशेठ, कै रा बाबूराव मुठे–एक जुने स्नेही,–व रा पाडुरग वैद्य, दोन ब्राह्मण, दोन गडी इतकी मडळी मिळून उटकमडला जाण्यासाठी निघाली उटकमड गावी प्रचारात मद्रासी भाषा असल्याने रोजच्या व्यवहाराला अनेक अडथळे येऊ लागले रेल्वेतून उतरताच टागेवाला व हमाल यान्याशी मजुरी ठरवेताना कठिण गेले मद्रासी भाषा या मडळीपैकी कोणासहि अवगत नसल्याने सर्व गोष्टी खुणेवर चालवाव्या लागत टागेवाल्यास ठरविताना आणेली, चवली, पावली वगैरे खुर्दा एकत्र हातात घेऊन त्याचेसमोर धरावा व त्यातून तो जे उचलेल तितके भाडे आपणास पडले असे समजून घ्यावे लागे बाजारहाट करीत असताना पचाईत पडे भाषाभिन्नतेमुळे अनेक प्रसग उद्भवले, की जेथे विनोदनिर्मिति झाली

### प्रसंग पहिला :

श्री शेठजींच्या नेहमीच्या रिवाजाप्रमाणे उटकमडजवळील प्रसिद्ध स्थळे पाहण्यास त्यांनी सुरुवात केली प्रथम 'टायगर पाथ' हे स्थळ पाहण्याचे ठरले श्री शेठजी नित्य सकाळी मोकळ्या हवेत फिरावयास जात असत त्याप्रमाणे त्या दिवशी सकाळी श्री प्रतापशेठजी, रा पाडुरगतात्या व कै बाबूराव मुठे या मडळीनी 'टायगर पाथ'कडेच आपले फिरणे उरकावयाचे ठरविले त्याप्रमाणे बरोबर तिकडे जाण्याचे मार्ग दर्शविणारा कच्चा नकाशा घेऊन ही मडळी निघाली जवळजवळ एकदोन मैलाचे अंतर चालून झाले तरीहि टायगर पाथकडे जाण्याच्या मार्गाचे निदर्शक फलक

रस्त्यावर कोठेहि आढळले नाहीत, त्यामुळे साशंक होऊन 'आपण रस्ता सोडून भलतीकडेच तर जाऊन राहिलो नाही ना?' मडळीना असे वाटले रस्त्यात रहदारीहि दिसेना, तेव्हा 'आता कोणास विचारावे?' हा प्रश्न मडळीना भेडसावू लागला तरीपण त्यानी आपले चालणे चालूच ठेवले पुन्हा एक दीड मैल गेले तरीहि काही पत्ता लागेना तेथे ते थोडा वेळ थबकून राहिले एवढ्यात समोरून एक खेडूत बाई येताना त्याना दिसली तेव्हा या मडळींनी त्या बाईस थांबविले व रा पाडुतात्या यानी तिला शुद्ध मराठीत विचारले—"बाई, टायगर पाथ कुणीकडे आहे?" 'इल्ले स्वामी' अस काहीतरी त्या बाईन मद्रासीत म्हटले आपला प्रश्नच त्या बाईस समजला नसावा म्हणून रा बाबूराव मुठे यानी तिला हिंदीत म्हटले—"बाई, बाघ! बाघ का रास्ता कहॉ है? टायगर! टायगर का रास्ता?" तरी पण तिला काही समजले नाही एवढ्यात श्री शेठजी पुढे होऊन म्हणाले—'वो बाघ? शेर, शेर कहते जगलमे रहता वो बडा बडा रेहेता! बाघ कहते उसका रास्ता बता देना"

इतक्यानेहि त्या बाईस काही समजेना म्हणून श्रीमान शेठजींनी आपले दोन्ही हात वाघाच्या पज्यासारखे उगारून एक पाय मागे व एक पुढे करून वाघाच्या जबड्यासारखे तोड करून व थोडासा वाघाच्या डरकावण्याप्रमाणे आवाज काढून त्या बाईस वाघाचे प्रात्यक्षिक करून दाखविले त्या बाईस समजले तर नाहीच, परतु तिची वेगळीच समजूत झाली व ती भयभीत होऊन एका शेताच्या रोखाने पळत जाऊ लागली ती जिकडे जात होती तिकडे बऱ्याच अतरावर मद्रासी शेतकरी शेतकाम करीत असताना दिसून येत होते प्रसग वेगळाच उद्भवेल असे हेरून रा पाडुतात्या यानी श्री शेठजीना व रा बाबूराव मुठे याना 'य पलायते स जीवते' चा मार्ग दाखविला.

रा पाडुतात्याचे म्हणणें मडळीच्या चटकन लक्षात आले आणि तिघानी गावाच्या रोखाने झटपट पाय उचलीत गाव गाठला.

## प्रसंग दुसरा :

श्री शेठजींच्या बरोबर गेलेल्या मडळीत कै रा बाबूराव मुठे हे होते असे वर उल्लेखिलेले आहेच त्याच्या डोक्यावर ठिकठिकाणी नायटे उठले होते व ते फार खाजत होते तशा स्थितीतच ते श्री शेठजीचे बरोबर उटकमडला गेले होते त्या नायट्यापासून त्याना त्रास होत असे हे श्री शेठजींच्या लक्षात येताच त्यानी त्यास डॉक्टरी उपचार ताबडतोब करून घेण्याची सूचना दिली इतकेच नव्हे तर उद्या आपण फिरून परत येताना सरकारी दवाखान्यात जाऊन औषधोपचार करून येऊ असेहि म्हटले तदनुसार दुसरे दिवशी सकाळी कै रा बाबूराव मुठे, श्री शेठजी व रा पाडुतात्या फिरावयास गेले व अजमासे ८ ते ८॥ चे दरम्यान परत येताना सरकारी दवाखान्यात शिरले दवाखान्यात बरेच रोगी बसले होते व डॉक्टरसाहेब क्रमवार त्याची तपासणी करीत होते ही मडळी आत येताच डॉक्टरानी त्याच्याकडे नजर दिली पेहेरावावरून कोणीतरी मुबईकडील मडळी असावीत असा तर्क करून खुर्चीकडे अगुलिनिर्देश करून बसण्यास खुणावले मडळी स्थाना-

पन्न झाली थोड्याच अवधीत डॉक्टरसाहेब या मंडळीच्या परामर्शाकरिता जवळ आले व त्यानीं इंग्रजीत विचारले—

'What do you want ?' (आपणास काय हवे ?) या प्रश्नास रा. बाबूराव यानी न समजून अर्धवट हिंदीत उत्तर दिले—"हमको प्रकृति बताने की है।"

परंतु डॉक्टराना हे उत्तर समजल्याचें दिसले नाही कारण ते फक्त मद्रासी व इंग्रजी जाणत असावेत नंतर इंग्रजीत समजावून देण्याची पाळी रा बाबूराव मुठे याचेवर पडली त्यानी मोडक्या तोडक्या इंग्रजीत म्हटले—

"I no come English" (मला नाही येत इंग्रजी) त्यावर डॉक्टर हसले व म्हणाले, Never mind"

तेव्हा श्री शेठजी पुढे होऊन त्यानी बाबूरावाची टोपी बाजूस करून हातात घेतली व डॉक्टराना उद्देशून म्हटले—

'Doctor see these Fodas' (डॉक्टर, हे फोड पाहा) डॉक्टरना फक्त 'See these' (हे पाहा) एवढेच समजले म्हणून ते चिकित्सक दृष्टीने तपासणी करू लागले त्या फोडाच्याबद्दल जास्त सांगण्याकरिता श्री बाबूराव मुठे हातवारे करीत म्हणाले—

"डॉक्टर, This sometime go, sometime come Go and come, go and come"

(हे फोड काही दिवस जातात, परत काही दिवस येतात, जातात येतात

रा बाबूरावाचे तोंडून इंग्रजीचे हाल होत असलेले डॉक्टराच्या ध्यानी आले पण भाषा-भिन्नतेमुळे निमूटपणे सहन करणे भाग होते ते हसून म्हणाले—

"Alright, alright" (अस्स, अस्स) डोक्यावर असलेले ते फोड फार खाजत असत हे डॉक्टरना कसे सांगावयाचे हा प्रश्न श्री शेठजींच्या पुढे पडला 'खाजविणे' याला इंग्रजी शब्द आठवेना तरी ते स्वस्थ बसले नाहीत त्यानी म्हटले—'Doctor, these Fodas day and night very (!!!!)" 'खाजतात' हा शब्द सांगावयाचा होता पण श्री शेठजींनी त्या आवेगात नखानी डोके खाजविण्याची क्रिया (Action) करून दाखविली व तसे खाजवीत असताना चेहऱ्यावर विवक्षित बदल करून "स्ऽहाऽऽ" असे करून दाखविले डॉक्टरांच्या लक्षात सर्व प्रकार आला पण त्याना देखील हसू आवरता येईना

'(अच्छा) Alright' असे म्हणून त्यानी औषधयोजना केली व ते फोड पुढे काही दिवसात बरे झाले

## प्रसंग तिसरा :

उटकमंडला एकदा फिरावयास जाताना वाटेत एक लग्नमंडप लागला त्यात एका मद्रासी गृहस्थाच्या मुलीचे लग्न लागत होते त्या लोकांच्या चालीरीति पाहण्याचे उद्देशाने श्री प्रतापशेठ त्या मंडपात शिरले पानसुपारी घेतली व वधूवरास एक एक रुपया अहेर करून परतले त्याही-

मडळीस आनद झाला व त्यानीं आभारहि प्रदर्शित केले पण त्याची भाषा याना समजली नाही व याची भाषा त्याना समजली नाही !

## चापानेर येथील गंमत :

श्री शेठजीना त्याचे एका नातेवाइकाकडे लग्नाचे निमत्रण आले म्हणून ते 'चापानेर' ला जाणार होते चापानेर हे चाळीसगाव तालुक्यातील एक खेडेगाव आहे श्री शेठजी, रा बाबूराव मुठे, एक गडी व क्लीनर इतकी मडळी जाण्याचे ठरले श्री शेठजीची स्वत चीच मोटर असल्याने वेळेची कोणतीच अडचण नव्हती

जाण्याचे दिवशी सकाळी अमळनेरहून ही मडळी निघाली धुळे येथे पोचल्यावर जेवण-खाण वगैरे सर्व आटोपून सुमारे ३॥ वाजता (दोन प्रहरी) पुनश्च मार्गस्थ झाली 'औटट्रम' चा घाट आला घाटातून गाडी सावधगिरीने चालू लागली सध्याकाळचे आत हा घाट ओलाडावा लागतो घाट ओलाडून मडळी कन्नड येथे आली कन्नड येथे श्रीमत प्रतापशेठजींचे व्याही राहतात त्या ठिकाणी पानसुपारीचा बेत पूर्वीच ठरलेला होता त्यानुसार तेथे चहापाणी वगैरे सर्व आटोपून सुमारे ६॥ ते ७ वाजता (सायंकाळी) निघाले

चापानेर हा गाव सडकेपासून आडवळणावर असल्याने श्री शेटजींची मोटर गावच्या वेशी-जवळ रस्ता थोडासा खराब असल्याने अडली तेव्हा क्लीनर व बरोबर असलेला गडी याना रस्ता थोडासा दुरुस्त करून गाडी गावापर्यंत आणण्याबद्दल सागून श्री शेठजी व बाबूराव मुठे गावाच्या रोखाने निघाले गावातील लग्नाची आरास, गॅसलाइट्स वगैरे दिसत होतेच आणि गोगाटाहि कानावर येत होताच रस्ता दुरुस्त होऊन गाडी गावात जाईपावेतो अर्धा तास लागेल तेव्हा इथ उभ राहण्यापेक्षा गाव अर्ध्या फर्लांगावर आहे 'आपल पायी पायी निघाव' असा विचार करून श्री शेठजी व बाबूराव मुठे निघाले होते तो वेळ अजमासे रात्रौ ८ ते ८। चा होता

पक्वान्न तयार करीत होते त्या मडपाजवळ श्री प्रतापशेठजी व बाबूराव मुठे येताच श्री प्रतापशेठजींची खेळकर वृत्ति जागृत झाली व ते व बाबूराव मुठे मडपाजवळ जाऊन तेथील मडळीस म्हणाले की, आम्ही दोघे दिवसभर उपाशी आहोत, तेव्हा आम्हाला काही तरी खावयास द्या

ते ऐकताच स्वयपाकी मडळींनी त्याच्यावर खेकसून म्हटले की, जाव उधर मडपमे, यहाँ क्या है ! असें म्हणून त्याना हाकून लावले

नतर ते दोघे लग्नमडपाजवळ आले तेथे पुष्कळशा बायकाच बसल्या होत्या त्याना यानीं म्हटले की, "माताजी, हम सब दिनके भूके है, हमको जिमा देव !"

ते ऐकताच त्या बायका ओरडून म्हणाल्या की, "यहा क्या है ? कुछ नही मिलेगा यहाँ-पर, जाव !" तेव्हा श्री प्रतापशेठजी म्हणाले, "माताजी, भोजन नही तो नही, सिर्फ कुछ खाने-को हाँ दे दो !"

तरीहि त्या म्हणाल्या—'यहाँ कुछ नही मिलेगा, जाव !'

इतक्यात मंडपातल्या एका १२।१४ वर्षांच्या मुलाने श्री प्रतापशेठजींस ओळखले व त्याच्या आईस तो म्हणाला—" मॉ, ये तो प्रतापशेठजी है ! " हे ऐकताच तेथील सर्व बायका उठून लगबगीने घरात पळून गेल्या, कारण शेठजींचे जातीत व्याही व विहिणी यांच्यामध्ये विहिणींनी बुरखा काढण्याचा रिवाज आहे. इतक्यात ही गडबड ऐकून घरातून व्याही बाहेर आले व श्री शेठजींना हात जोडून म्हणू लागले की, 'श्रीमान् शेठजी, यह क्या ?' तेव्हा श्री शेठजी हसून म्हणाले की, " हम सिर्फ खानेको मगते है, आप हमको खानेको भी नहीं भगने देते !"

" ते ऐकून व्याह्यांनी आमचे हात धरून आदराने आम्हास आत नेले व आम्ही लग्न-समारंभात मिसळलो. "

## बद्रीकेदारची यात्रा :

सन १९३८–१९३९ सालात श्री शेठजी, बाईसाहेब, श्री मगनलालजी व त्यांच्या सौभाग्यवती, रा. पांडुरंगतात्या, रावसाहेब मुजे, रा. वासुअण्णा कामत ('ज्ञानेश्वरी–हृदय' ग्रंथ कर्ते कोल्हापूरकर) प्रोफेसर ओक व इतर आचारी, गडीमाणसे अशी मिळून जवळ जवळ १५–१६ मंडळी बद्रीकेदारच्या यात्रेकरिता निघाली. रेल्वेने हरिद्वारपर्यंतचा प्रवास केला. हरिद्वारला मंडळीचा दोन दिवसाचा मुक्काम पडला. या मुक्कामात सर्वांनी यात्रेमध्ये लागणाऱ्या प्रवासी सामानाची खरेदी केली. यानंतर सर्व मंडळी मोटर सर्व्हिसने हृषीकेश व देवप्रयाग येथे गेली. येथून बद्रीकेदारकडे जाणारा रस्ता पहाडातून वर चढत जातो. मोटारचा प्रवास येथेच समाप्त होतो. या पुढचा मार्ग डोल्यातून करावा लागतो. देवप्रयाग ते बद्रीकेदार जवळजवळ १००–१२५ मैल आहे. सर्वांच्या करिता डोल्या ठरविण्यात आल्या होत्या. श्री शेठजींच्याकरिता ठरविलेल्या डोलीत त्यांनी आपले सर्व प्रवासी सामान ठेवून दिले व थकल्यानंतर बसावे असा विचार करून डोलीवाल्यास बरोबर चालते ठेवून श्री शेठजी पायी पायी निघाले. सर्वांनी डोलीत बसावे पण श्री शेठजींनी पायी पायी चालावे असे दोन तीन दिवस झाल्यावर मंडळींना संकोच वाटू लागला. त्यांनी श्री शेठजींना तसे सांगितले, पण त्यांचे आपले सांगणे की, थकल्यावर मी डोलीत बसतोच. टप्प्याटप्प्यावर विश्रांति-स्थळे होतीच. त्या ठिकाणी थांबून लोक विश्रांति घेत व पुढे चालू लागत. याप्रमाणे दहा दिवसांचे प्रवासानंतर प्रत्येकाचे श्मश्रू वाढले. तेव्हा श्मश्रू करण्याकरिता नजीकच्या वस्तीचे ठिकाणी थांबण्याचे ठरले. मार्गात एक गाव बरेच वस्तीचा लागला. त्याच ठिकाणी श्मश्रू करावयाचा ठरला. मंडळींपैकी काहींनी एक नापित बोलावून आणला. त्या नापिताचा अवतार धिप्पाड राक्षसासारखा खेडवळ वाटला आणि त्याची शस्त्रं पण खेडवळ होती. त्यामुळे दाढी करण्याचा विचार प्रत्येकाने सोडून दिला. पुढे १॥–१॥। महिन्यांच्या त्यांच्या प्रवासात कोणीहि दाढी वगैरे केले नाहीच.

श्री शेठजींनी पायी बद्रिकेदारपर्यंत जाण्याचा मनोदय पुरा केला. येताना मंडळींच्या आग्रहावरून ते डोलीतून परत आले. सर्व यात्रा परिपूर्ण झाल्यावर परत मंडळी हरिद्वारला आली. काही मंडळींचा विचार ठरला की, या ठिकाणी दाढी वगैरे सर्व करून मग निघावे. यास श्री शेठजींनी संमति दिली. मध्यंतरीच काही मंडळींच्या मनात आले की, एक ग्रुप फोटो घ्यावा. त्यासाठी

दाढी वगैरे करावी व कपडे स्वच्छ पेहेरावेत असे ठरविण्यासाठी मडळी श्री शेठजीना विचारण्यास गेली तेव्हा श्री शेठजीनी स्पष्ट शब्दात सागितले की, "फोटो घ्यायला माझी हरकत नाही, परतु यात्रेत घेतलेला फोटो आहे या स्थितीत घेतलेला बरा नटून थटून गुळगुळीत दाढी करून मग फोटो घेणे आपणास मुळीच आवडणार नाही अशा स्थितीतच घ्यायला पाहिजे"

श्री शेठजीच्या म्हणण्यास रुकार देणें भाग पडले व मडळीचा ग्रुप फोटो घेण्यात आला ते फोटो चित्रावलि विभागात छापलेला वाचकास दिसेलच अशा रीतीने सर्व मडळीची यात्रा पूर्ण झाली व मडळी स्वस्थानास परत आली श्री शेठजीचा मनोनिग्रह व वास्तवतेशी प्रामाणिकपण दिसून येतो

## चांदा गांवीं घडलेली सत्यकथा :

वऱ्हाडात चादा गाव आहे त्या ठिकाणी श्रीमान शेठजीचे चुलत साडू राहात होते त्याच्या घरी त्याच्या मुलाचे लग्न होते व त्यासाठी श्री शेठजीना निमत्रण आले होते लग्नाकरिता ते जाण्यास निघाले लग्न शेगावी होते रेल्वेचा प्रवास करून ते 'शेगाव' स्टेशनपर्यत येऊन पोचले वेळ रात्रीची होती सकाळ झाल्यावर मग गावात जावे असा विचार करून श्री शेठजी सेकड क्लासच्या वेटिंग रूममध्ये निजण्यासाठी गेले त्या ठिकाणी बरीचशी मडळी होती त्याच्या बोलण्यावरून बहुधा ती वऱ्हाडी मडळीच असावीत असे श्री शेठजीनी ओळखले त्यानी आपली ओळख कोणासहि न देता त्याच्या बरोबर तेथे झोपून गेले दुसरे दिवशी सकाळी वऱ्हाडी मडळीना मिरवत गावात नेण्यासाठी वाजत्री घेऊन बोलावणे आले मिरवणूक निघाली त्या मिरवणुकीत श्री शेठजीहि सामील झाले श्रीमान शेठजीनी दाक्षिणी पद्धतीचा पोषाख केलेला असल्याने मारवाडी मडळीपैकी लोकानी त्याना ओळखले नाही वऱ्हाडी मडळी उतरण्यासाठी जी जागा ठरवली होती तेथपर्यत मिरवणूक येऊन थाबली प्रत्येकजण आपापले सामान उतरवून आत जाऊ लागला त्याचप्रमाणे श्रीमान शेठजीनी आपल्या गड्याकडून आपली वळकटी वगैरे सामान घेतले व आत प्रवेश केला. भिंतीलगत सामान ठेवून त्यानी वळकट ठेवली व त्यावर ते बसले

थोड्या अवधीत श्री शेठजीचे साडूचे बधु तेथे आले त्यानी श्री शेठजीच्याकडे पाहिल व न ओळखुन म्हटले, 'कसे काय मुनीमजी ? शेठजी कोठे आहेत ?' त्याना वाटले की, हे श्रीमान् शेठजीचे मुनीमजी आहेत श्रीमान शेठजीनी उत्तर दिले, 'शेठजी, परसाकडला (दीर्घशकेस) गेले आहेत' एवढीच विचारपूस करून ते निघून गेले कोणीहि त्याना ओळखले नाही वऱ्हाडी मडळीपैकी बरीच मडळी त्याना विचारीत, 'मुनीमजी, तुम्हारे शेठसाहब कब आयेंगे !' 'आयेंगे थोडे देरसे' असे उत्तर देऊन त्यानीं समाधान करावे श्रीमान् शेठजीनी मुनीमजीची भूमिका पुरी वठविण्याचे ठरावेले प्रत्येक प्रश्नास काही तरी उत्तर देऊन वेळ मारून न्यावी असे चालले

जेवणाची वेळ झाली मडळी जेवावयास बसू लागली मारवाडी मडळीची पगत ज्या बाजूस होती त्या बाजूसच श्री शेठजी जाऊन बसले त्याच्याजवळ बसण्यास काही मारवाडी मडळी कचरू लागली कुजबूज होऊ लागली व काहीं मडळीनी श्री शेठजीना म्हटलेहि की, "तुम्ही आमचे

जातीचे मंडळींत बसू नका. आम्ही तुमची वेगळी व्यवस्था करतो. बसलेल्या पानावरून न उठता श्री शेठजींनी सांगितले, "मी येथेच बसणार!" त्याबरोबर बरीचशी कुजबूज होऊं लागली. इतक्यांत एक व्यक्ति आली व काय गडबड आहे असे विचारूं लागली. मंडळींनी सांगितले, प्रताप-शेठजींचे हे मुनीमजी आहेत, व ते आपल्या जातीच्या मंडळींत बसणार म्हणतात!

'कोठे आहेत ते मुनीमजी मला दाखवा.' मी त्यांची समजूत घालतो. असे ते गृहस्थ म्हणाले. त्यावर मंडळींनी त्या गृहस्थास मुनीमजी बसले होते, तेथे आणले व म्हटले, "हेच ते मुनीमजी!" श्री शेठजींच्याकडे पाहिल्यावर त्या गृहस्थाने म्हटले, "अहो, हे तर श्रीमान् प्रताप-शेठजीच आहेत, मुनीमजी नव्हेत!"

हे ऐकताच सर्व मंडळी फार खजील झाली व झाल्या गोष्टीबद्दल त्यांनी श्री प्रतापशेठ यांची क्षमा मागितली.

## उपसंहार :

'गुणा पूजास्थानम्!' श्री शेठजींच्या अंगी वसत असणाऱ्या गुणांचे सम्यक्दर्शन घडवून आणणाऱ्या प्रसंगाचे वर्णन मागील पानांवर केलेले आहे. भरलेल्या जिलेबीच्या ताटांतून चांगली वाईट निवडण्याचा प्रसंग आला म्हणजे ही घ्यावी का ती घ्यावी असा पेचप्रसंग निर्माण होतो. त्याप्रमाणे श्री शेठजींच्या जीवनांतील अनेक प्रसंगांतून कठीणत्वाने वरील प्रसंग निवडताना फार श्रम घ्यावे लागले. 'साधी राहणी व उच्च विचारसरणी' त्यांच्या अंगी बाल्यावस्थेपासून बाणली आहे. जन्माने जरी ते मारवाडी आहेत तरी त्यांचे वळण महाराष्ट्रीय आहे. टिळकांचे तत्त्व-ज्ञान त्यांच्या ठिकाणी मुरलेले आहे. ते राष्ट्रीय वृत्तीचे दानशूर गिरणीमालक आहेत. येणाऱ्या प्रसं-गांना उदात्तपणे व प्रसन्नवृत्तीने तोंड देऊन संकटांना न डगमगतां मार्गक्रमणा करीत राहणे हे त्यांचे ब्रीद आहे. 'गुणी गुणं वेत्ति न निर्गुणो नरः'। ते स्वतः गुणवान् असून गुणज्ञ आहेत. इतरांचे ठायी असलेल्या गुणांना पुरेपूर ओळखून त्यांची योग्य ती चाहा करण्याचे ते कधीहि विसरत नाहीत.

रा. पांडुरंग नारायण वैद्य ही व्यक्ति त्यांचे वयाचे १६ वे वर्षापासून श्री शेठजींच्या सेवेत आहे. केवळ सेवेत आहे इतकेच नसून पत्रावळीजवळ द्रोणाचे जितके निकट सान्निध्य आहे तितके त्यांचे व श्री शेठजींचे संबंध आले आहेत. त्यामुळे मागील पानांवर उद्धृत केलेले प्रसंग हे रा. पांडुरंगतात्यांनी वर्णिलेले आहेत. प्रसंग सत्य व विनोदी असल्याने वाचकांना रंजित करणारे आहेत. तसेच त्या प्रसंगांतून श्री शेठजींचे व्यक्तिमत्त्व दिसून येत असल्याने ते वाचकास उद्बोधक ठरतील अशी अपेक्षा आहे.

श्री प्रतापशेठजी गौरव-ग्रंथ समितीने रा. पांडुरंगतात्यास व मला हे प्रसंग-वर्णन गौरव-ग्रंथाकरितां लिहून देण्याची संधि दिली याबद्दल आम्ही उभयतां समितीचे मनःपूर्वक आभार मानतो. समितीने हातीं घेतलेले अमूल्य कार्य ईशकृपेने सिद्धीस जावो, अशी आमची उत्कट इच्छा आहे. श्रीमान् शेठजींना परमेश्वराने आयुष्यमान् करावे अशी आमची प्रार्थना आहे.

● ● ●



लेखक :— श्री **किसन मोतीराम पोतदार,** अमळनेर

## बालपण व शिक्षण :

ह्या वेळी शेठजींचे वय आठ-नऊ वर्षांचे होते त्या वेळच्या परिस्थित्यनुरूप व्यावहारिक ज्ञानापुरतें वाचणे, लिहिणे, हिशेब करणे वगैरे शिकण्याकरिता रा सीताराम पतोजीच्या शाळेत शेठजींना ठेवले शाळा बिनसरकारी होती त्याची शिकविण्याची पद्धत, मानेवर खडा ठेवून खर्डे काढणे, भिंतीस जुने दस्तऐवज चिकटवून वाचावयास लावणे, बिनचूक परवचा म्हणणे, हिशेब करणे, चुकल्यास कडक शिक्षा करणे, या पद्धतीस कटाळून शेठजींनीं शाळेत जाण्याचे बद केले त्यानतर घरीच गुरुवर्य सावळाराम मास्तराची शिकवणी लावली त्यानी शेठजींची स्वभावाची भूमिका व आवड पाहून शेठजीना सतारवादन, गाणे व तत्त्वज्ञानाची आवड लावून शिकविण्यास सुरुवात केली त्यामुळे शेठजीना गाण्याची, रागरागिणीची चागलीच माहिती झाली, व तत्त्वज्ञानी होऊन व्यवहारकुशल पण झाले श्री माणकचद रतीराम शेठ याचा स्वर्गवास भाद्रपद शु ५ सवत् १९५० रोजी झाला त्या वेळीं श्री प्रतापशेठजींचे वय १४ वर्षांचे होते याचे मारवाडमधील नाव रामप्रताप होते चोपड्यास आणल्यावर मोतीलाल ठेवले, परतु ते पूर्वीच्या नावाने श्री प्रतापशेठ म्हणूनच प्रसिद्धीस आले वयाने अज्ञान असल्यामुळे दुकानाचा व जीनचा सर्व कारभार रा रा गोकुळशेठ हेच पाहत असत रा गोकुळशेठ हे वयस्क व त्याच्या प्रामाणिक व प्रेमळ स्वभावामुळे श्री प्रतापशेठ त्याना काका म्हणत व वडिलासारखाच मान देत शेठजींचे शिक्षण मराठी चौथी पर्यंतच झाले होते विशेषत त्याना धार्मिक व पौराणिक पुस्तके वाचण्याची फार आवड होती जीनमधील शिपाई रात्री राहतेघरी पहारा देत ते पुरभय्ये असल्यामुळे प्रथम प्रहरी तुलसीकृत रामायण वाचीत असत त्याची वाचण्याची भाषाशैली व त्यातील गभीर अर्थ ऐकून शेठजींना तुलसीकृत रामायणाची गोडी लागली, व त्यानी वडील हयात असतानाच तुलसीकृत रामायणाची मोठ्या टाइपाची प्रत एक किंमत रु ८ ची व्ही पी ने मागविली होती, व गुरुवर्य सावळाराम मास्तराचा सहवास झाल्यापासून, त्याच्याकडून रोज सकाळ सध्याकाळ वाचन करून शकानिरसन करण्याचा अभ्यासच ठेवला होता, व क्रमाने अध्यात्मिक चर्चाहि करीत मी कोण आहे, जन्मास येऊन माझे कर्तव्य काय, हे तत्त्व शेठजीना बरोबर समजावून अगीं बाणून देण्याचे काम पूज्य श्री गुरुवर्य सावळाराम मास्तरानीच केले, व ही कामगिरी त्या वेळीं फारच अमोल झाली

मुबईस प्रथमच मोठ्या माणसास चालविण्यासारखी तीनचाकी सायकल निघाली होती ती प्रथमच शेठजींनी चोपड्यास आणली नतर दोनचाकी निघाली तीहि पहिल्यादा चोपड्यास शेठजींनींच आणली तसाच गोलबागडीचा फोनोग्राफ निघाला होता तोहि आणला होता नतर एक

हत्तीणहि घेतली होती तिचे नाव 'रामकली' असे होते सदर हत्तीण अमळनेर येथेच वारली असल्या त्या वेळच्या काळास अनुसरून नवीन नवीन वस्तु पाहून तेथील लोकाना शेठजीचे फारच कौतुक वाटे

त्या वेळीं शेठजीच्या सहवासात दामोदर बाळकृष्णबुवा, हिरालाल फत्तू महाराज, चितामण दादा चौधरी ही मडळी असत बहुतेक रोज सध्याकाळी ही सर्व मडळी दुकानावरून जीनमध्ये जावयाची, व तेथून हरिहरेश्वराच्या मदिरापर्यंत मोकळ्या हवेत फिरावयास जात असत फिरावयास जाताना शेठजींचा गभीर स्वभाव, शात वृत्ति, तेज पुज प्रकृति, सर्वांशी मधुर बोलणे हे पाहून जिकडून फिरावयास जात त्या रस्त्यावरील लोकाना शेठजींस पाहून फार आनद होत असे, व कौतुक वाटत असे जास्त काय, बाहेरगावचे पाहुणे वगैरे आल्यास ते मुद्दाम शेठजींना पहाण्याची इच्छा करीत व दर्शन घेत 'म्हातारे माणसाकडून कल्याण होवो' असे उद्गार निघत

खामगावकर शेठजींचे मामेभाऊ भिकूलाल ठाकूरलाल शेठ हे एखादे वेळी चोपडयात येत, त्या वेळी सध्याकाळी दोघेहि फिरावयास निघत

श्री प्रतापशेठजींची गभीर वृत्ति, शात स्वभाव, तेजस्वी चेहरा, सत्याची आवड, साधी रहाणी, वयाने वडील असतील त्याच्याशी मर्यादेने वागणे हे गुण पाहून दिवाणजी गोकुळशेठ याना फार अभिमान वाटे ते जरी नोकर होते तरी त्याना शेठजीविषयी फारच आपलेपणा वाटे व शेवटपर्यंत वडिलासारखाच मान दिला व मर्यादेने वागले.

## औद्योगिक यश :

शेठजींचे वडील वारल्यानतर सर्व दुकानाचा व जीनचा व्यवसाय श्री रा गोकुळशेठच पहात असत शेठजी वयात आल्यावर रा गोकुळकाका प्रसग पाहून बोलत असत की, 'आता आपण सज्ञान झाला आहात, आपला सर्व व्यवहार आपण पहावा, माझ्याने आता वयमानामुळे होत नाही त्या वेळी शेठजींनी उत्तर द्यावे की, 'हा सर्व व्यवहार तुमचाच आहे, तो तुम्हीच पाहिला पाहिजे' नतर इ स १९०४ मध्ये स्वत चे मोतीलाल माणकचद या नावाने कपाशीच्या गाठी बाधण्याचा प्रेस बाधला यावेळी शेठजीचे वय २४ वर्षांचे होते त्यानतर त्या वेळी टिळकांच्या देशी चळवळ चालू असल्यामुळे चोपडयास पुण्याहून एक अभ्यकर नावाचे गृहस्थ व्याख्यान देण्यासाठीं आले होते त्याची देशी वस्तु, देशी साखर वापरण्यावर व्याख्याने झाली त्याच वेळीं शेठजींनी तेथें स्वदेशी दुकान काढले सदर दुकानात स्वदेशी बागडया, साखर, कापड अशा सर्व स्वदेशीच वस्तु विक्रीस ठेवण्यात आल्या होत्या त्याच वेळी सरकारी नोकरीत असलेले रा दामोदर केशव दलाल स्वदेशाभिमानाने सरकारी नोकरीचा राजीनामा देऊन सदर स्वदेशी दुकानावर ( मॅनेजर ) व्यवस्थापक म्हणून शेठजींचे पदरी नोकरीस राहिले

प्रताप मिलची कपनी रजिस्टर केल्यानतर श्री शेठजी व दामुअण्णा दलाल यानी शेअर खपविण्याकडे प्रयत्न सुरू केले रोज गावात, खेडयावर इतर गावी जाऊन शेअर खपविले १९०८ साली प्रताप मिलचे काम प्रत्यक्ष सुरू झाले

इ स १९१४ साली पहिली लढाई झाली ज्या वेळी लढाई सुरू होती त्या काळात मिलची चागलीच भरभराट झाली त्या वेळीं मिलने शेअरहोल्डर लोकाना शेकडा ४० पर्यंत डिव्हि्डड दिले सदर छोट्याशा मिलचे रूपातर आज ११०० लूम्स व ४९३८४ स्पिडल्स ( चात्या ) चालू आहेत अशा मोठ्या मिलमध्ये झाले आहे

श्री शेठजीनी मोठी दूर दृष्टि ठेवून गुजराथीत म्हण आहे, "तक मोठी बात छे" तक म्हणजे सधि साधणे हेच व्यापारात उन्नतीचे मुख्य साधन आहे सदर सधि पाहून इ स १९२३ मध्ये श्री शेठजीनी धी न्यू प्रताप मिल्स, धुळेची स्थापना केली सदर मिलकरिता प्रथमच रु ३०,००००० तीस लाखाचे शेअर्स उभारले धी प्रताप मिलमधील श्री शेठजींचे सतत उद्योगाची व प्रामाणिकपणाची जनतेची खात्री झालेली असल्यामुळे एक दीड महिन्याचे आतच सर्व शेअर्स खपले व अधिक आलेल्या मागण्या निरुपायाने नाकाराव्या लागल्या सदर मिलमध्येहि आज १०५८ लूम्स व ४६९२८ स्पिडल्स ( चात्या ) चालू आहेत

दोन्ही मिलमध्ये कापड खानदेश, वऱ्हाड व काही गुजराथ या देशी कापसापासूनच बनविले जाते टिकाऊ, मजबूत अशी सदर मिलचे कापडाची ख्याति आहे बाजारात शेतकरी गिऱ्हाईक दुकानात प्रथम अमळनेर अगर धुळे मिलचेच कापड विचारतो सहसा दुसऱ्या मिलचे घेत नाही

सदर दोन्ही मिलचे कापड कानपूर, दिल्ली, अमृतसर, बनारस, कलकत्ता, ओरिसाकडेहि पुष्कळ विकले जाते अमळनेर व धुळे मिल्सची काही ठिकाणे, दुकाने व एजन्सीज् आहेत हल्ली समुद्रापलीकडील देशात एक्सपोर्टनेहि बराच माल विकला जातो

आजपर्यंत अमळनेर मिलचे काम श्री प्रतापशेठ हे स्वत पहात आहेत व न्यू प्रताप धुळे मिल्सचे काम, मॅनेजिंग एजट म्हणून, चि मगनलाल ऊर्फ बाबूशेठ हे अमळनेर येथे वडिलाचे देखरेखीखाली कामाचा अनुभव घेऊन बरीच वर्षे पहात आहेत ते कामात व्यवहारकुशल व व्यवहारदक्ष आहत सदर काम उत्तम रीतीने साभाळून साबण, सुवासिक तेले, दतमजन, पेन बाम वगैरे औषधी तयार कारखाना आरवी येथे मित्रनगरची वसाहत करून काढला आहे धुळ्यास एम शेठ नावाचा लोकोपयोगी वस्तूचा मोठा प्रेक्षणीय स्टोअरहि काढला आहे

श्रीमान् बाबूशेठजीना कलेची फार आवड आहे स्वत चे देखरेखीखाली धुळे मिलमध्ये दरवर्षी श्रीगणपति उत्सव फारच सुदर साजरा होत असतो कलापूर्ण श्रीगणपतीच्या सिंहासनाची बैठक कुशलतेने सजविलेली, कारागिरीने युक्त अशी आजुबाजूची माडणी प्रेक्षणीय असते नाट्याचे, गायनाचे, भजनाचे, कीर्तनाचे ८।९ दिवस क्रमाने कार्यक्रम असतात श्रीगणपतीचे दर्शनास गावोगावाहून बराच मोठा जनसमूह येत असतो त्या वेळी तेथे यात्रेचेच स्वरूप येते

श्री बाबूशेठजीनी सिनेमासृष्टीतहि प्रयत्न व कल्पकता सुरू केली आहे त्यातहि त्याना यश मिळो अशी ईश्वराजवळ प्रार्थना आहे श्री बाबूशेठजींनी वयाचे ३६ वर्षाचे आतच उद्योगात व व्यापारात उत्तम प्रगति केली आहे

संस्कृतात एक श्लोक आहे'—
मानुष्य, वर वंशजन्म, विभवो, दीर्घायुरारोग्यता, ।
सन्मित्रं, सुसुत , सती प्रियतमा, भक्तिश्च नारायणे, ।।
विद्वत्त्व, सुजनत्वमिन्द्रियजय , सत्पात्रदाने रति– ।
स्ते पुण्येन विना त्रयोदशगुणा संसारिणा दुर्लभा ।। १ ।।

आज वरील श्लोकात वर्णन केल्याप्रमाणे भाग्यवान श्री प्रतापशेठजी आहेत. हे आमच्या दोन्ही खानदेशचे सौभाग्यतिलक आहेत.

## अडचणीचे प्रसंग :

मोठाले धंदे करताना काय अडचणी येतात हे अनुभव धदे करणारांनाच असतात उत्कर्ष होणाऱ्या माणसास पाहून उत्कर्ष सहन न होणाऱ्या व्यक्तीहि दुनियेत असतात श्री शेठजीनी सदर उद्योगास आरभ केल्यावर येवल्याचे श्रीमान् वल्लभदास शेठ हे द्रव्याचे अडचणीचे वेळी वेळोवेळी मदत करीत त्याना मदत न करण्याविषयी काहीं व्यक्तींनी श्री वल्लभदास शेठ याना सुचविण्याचे प्रयत्न केले, परतु श्रीमान् शेठजींचे 'सत्य बोलणे,' निश्चयी वृत्ति, उद्योगप्रियता वगैरे गुणामुळे श्री वल्लभदासशेठजीनी सदर विरुद्ध सागणाऱ्या व्यक्तींच्या सागण्याकडे दुर्लक्ष करून शेवटपर्यंत शेठजीशी मित्रत्व ठेवून वागले, मिल चालू झाल्यावर एकदा पगाराकरिता लागणारी रक्कम चोपडे दुकानावरून येण्यास उशीर झाला न नेमल्या वेळीं पगार होत नाही असे मजुराना समजल्याबरोबर मुबईचे सर्व बकाली लोक त्या वेळी कामावर असल्यामुळे मुबईचे मजुराच्या संवयीप्रमाणे मिलचे ऑफिसरानी समजूत घातली असताहि काम बद करून बाहेर पडले अशा वेळी न डगमगता शेठजीनी मजुराना शातपणाने समजावून सागितल्याबरोबर सर्व मजूर कामावर गेले.

## लोकोपयोगी संस्था :

श्रीमान् शेठजींनी बऱ्याच लोकोपयोगी सस्थाना द्रव्यरूपाने मदत केली आहे, व काही स्वत हि स्थापन केल्या आहेत धि फिलॉसफी इन्स्टिटयूट ही सस्था पूज्य गुरुवर्य सावळाराम मास्तर याचे इच्छेनुरूप स्वत चे आवडीस्तव काढली आहे या सस्थेमार्फत काही लहानमोठे ग्रथहि प्रसिद्ध झाले आहेत. सर्व सस्थाची व ग्रथाची नावासह यादी सदर गौरव-ग्रथात इतर लेखात आली आहे

पूज्य गुरुवर्य सावळाराम मास्तर याचे कृपेने शेठजीना तत्त्वज्ञानाची आवड उत्पन्न होऊन त्याचा तत्त्वज्ञान हा अतिशय आवडीचा विषय झाला आहे तत्त्वज्ञानाचा प्रसार होण्याकरिता व जगातील इतर धर्मांतील तत्त्वज्ञानाशी तुलनेकरिताचधि फिलॉसफी इन्स्टिटयूटची स्थापना झाली या पद्धतीवर सर्व जगात दुसरी सस्था नाही असे म्हणतात या सस्थेत प्रिन्सिपॉलचे जागेवर प्रथम श्री टोकेकर, नतर डॉ मैत्र, प्रो. भानू वगैरे मंडळी होती हल्ली जी आर मलकानी, M A., हे बरेच वर्षापासून काम पहात आहेत हे सदर सस्थेचे डायरेक्टर आहेत. याना इन्स्टिटयूटचे खर्चाने

इग्लडला पाठविले होते तेथे त्यानीं केम्ब्रिजची M Litt ही पदवी मिळविली नतर येथे येऊन त्यानी फिलॉसफी या विषयावर १०-१५ ग्रथहि ( इग्रजी भाषेत ) प्रसिद्ध केले आहेत

## श्रीमंत प्रतापशेठ यांचे स्वभावातील विशेष गुण :

महाभारतात एक वाक्य आहे जसजसे मनुष्याचे वय वाढेल त्याबरोबर सद्गुणाची, विद्येची व सपत्तीचीहि वाढ झाली पाहिजे याप्रमाणेच एक नेहमींचे प्रचारात म्हण आहे कीं, 'विशी विद्या तिशी धन, असे न झाले तर आयुष्यभर वणवण ' या म्हणी फारच उपयुक्त आहेत याप्रमाणेच शेठजीचे आयुष्यात घटना घडून आली आहे वरील सर्व गुण अनुकरणीय आहेत या-प्रमाणे कोणीहि वागण्याचा प्रयत्न केल्यास आयुष्यात यशस्वी होऊ शकेल

**१. सत्य बोलणें**—पुष्कळाचे म्हणणे असते की, सत्याने व्यवहार होत नाहींत हे म्हणणे श्री प्रतापशेठजीना मुळीच पटत नाही त्याचे म्हणणे आहे की, नुसते शाब्दिक सत्य नको सत्याने केलेले व्यवहारच कायम टिकतात व यशस्वी होतात त्याना असत्य मुळीच आवडत नाही त्याचे सर्व व्यवहार सत्याने झाले आहेत, हे विचारी माणसास दिसून येईल

**२. प्रामाणिकपणा**—हा त्याचा व्यवहारातला मोठा सद्गुण आहे मोठाले धदे व व्यवहार चालविण्यास व त्यात यश येण्यास प्रामाणिकपणा ही एक गुरुकिल्ली आहे प्रामाणिकपणाच्या अभावी नेहमी अपयशच येणार असे शेठजीचे म्हणणे आहे

**३. सतत उद्योग**—हा शेठजीचा मूळ स्वभावच होऊन बसला आहे त्याचेच फळ आज दोन्ही मिल्स व इतर सस्था हे दृश्य दिसत आहे उद्योग करावयाचा तो लोकोपयोगी, अर्थोत्पादक व पारमार्थिक असा असावा उगीच निष्फळ उद्योग करणे ठीक नाही, असे शेठजीचे ध्येय आहे

**४. वेळचेवेळीं कामें होणें**—यावर शेठजीचा मोठा भर असतो जी काय कामे करावयाचीं त्याची आदल्या दिवशीच यादी करून ठेवीत असतात, व नेमलेल्या वेळेवर ज्या त्या अधिकाऱ्यास बोलावून, विचारविनिमय करून, खुलासा करून ज्याचे जे काम ते त्या अधिकाऱ्यावर सोपवून देतात

**५. वेळ व्यर्थ न दवडणें**—शेठजीचा रोजचा कार्यक्रम आजपर्यंत अगदी यत्रासारखा चालू आहे सकाळी पाच वाजता उठणे, शौचाहून आल्यावर तोड, हात धुऊन फिरावयास जाणे, आठ वाजेपर्यंत फिरून आल्यावर दोन अडीच तास फिलॉसॉफीतील निवडक फेलोशी व त्याचेबरोबर तत्त्वज्ञानाची आवड असणाऱ्या त्याच्या मित्रमडळीशी ईश्वरविषयक ऊहापोह करीत बसणे नतर ११॥ ते १२ चे दरम्यान जेवण व नतर थोडी विश्राति घेऊन २ ते ३ पर्यंत व्यावहारिक रोजचे आलेले टपाल पाहून व उत्तराची व्यवस्था लावून पुन दोन तास ईश्वरविषयक तत्त्वज्ञान या विषयावर चर्चा, नतर पुन फिरावयास जाणे फुकट वेळ दवडणे त्याना आवडत नाही.

**६. समयसूचकता** —समयसूचकतेची मोठाल्या व्यवहारात फारच जरुरी असते साध्या गोष्टीदेखील एखादे वेळी लक्षात येत नाहीत. श्री शेठजी घरी असोत, अगर बाहेर गावी असोत, पुष्कळ वेळा निरोपाने अगर पोस्टाने ज्या त्या नोकरास सुचविले आहे की, अभ्र आले आहे, कपाशी उघड्या जागेवर पडली आहे ताडपत्री वगैरे झाकण्याची व्यवस्था करावी एखादे वेळी बाहेरगावचे पाहुणे येणार असल्यास व शेठजी बाहेरगावी असल्यास पाहुण्याची त्यान्च्या आवडी-प्रमाणे कशी व्यवस्था ठेवावयाची हीदेखील बारीकसारीक माहिती आपल्या कारकुनास वेळोवेळी पोस्टाने कळविलेली आहे

**७ वाचनाची व लेखनाची आवड** — सदर आवडीचा अकुर शेठजीना लहानपणापासून आहे गुरुवर्य सावळाराम मास्तरान्च्या सहवासाने, उपदेशाने व कृपेने तत्त्वज्ञानासारख्या कठीण विषयावरहि शेठजी व्याख्यान देऊ शकतात व लेख लिहू शकतात त्यान्च्या व्याख्यानाची व लेखाची काही पुस्तकेहि प्रसिद्ध झाली आहेत हें सदर विषयाचे आवडीचेच फळ आहे

**८. साधी राहणी** —मिल चालू झाल्यापासून स्वत न्या अगावर धोतर, शर्ट, कोट, उपरणे ही सर्व प्रताप मिल अमळनेरमध्ये तयार झालेलीच वापरतात श्रीमत असून अगावर सोन्याचा एकहि दागिना नसतो राहणी महाराष्ट्रीयन आहे, त्यामुळे हुबेहूब लो टिळकासारखेच भासतात

**९. निरभिमानपणा** —कोणीहि भेटले अगर सहज पाहिले तरी स्वत.हून, कोण, काय आहे, असे प्रेमाने बोलतात म्हणणे ऐकून घेतात त्याचे बोलणे ऐकणाऱ्यास आनद होतो, व आज आपणास काही तरी नवीन समजले असे वाटते

**१०. गरिबापासून श्रीमंतांपर्यंत सर्वांशी मोकळेपणानें बोलणें व त्यांच्या पत्रांची उत्तरें वेळचेवेळी बिनचूक देणे** —फिरावयास गेले असता रस्त्यात विद्यार्थी अगर कोणीहि गरीब मनुष्य भेटल्यास व बोलण्याची इच्छा दर्शविल्यास त्याच्याशी अगदी मोकळेपणे बोलतात व त्याना समाधानकारक योग्य असे उत्तर मिळते घरी कोणास भेटावयाचे असल्यास शिपायाबरोबर निरोप दिला म्हणजे लगेच बोलावतात वेळ नसल्यास केव्हा भेटावयाचे ती वेळ कळवितात पत्राची उत्तरे सहसा चुकूनहि दिले जात नाही असे मुळीच होत नाही हा बहुतेकाना अनुभव आहे

**११ पैशांचे बाबतीत चोख व्यवहार** —पैशाचे व्यवहारात निर्भीडपणे चोख राहणे शेठजींना आवडते व्यवहारात चोख राहणे हाच अब्रू व पत वाढविण्याचा मार्ग आहे वाजवी असेल ते देणे-घेणे यात दिरगाई त्याना पसत नाही

**१२ नित्य ईश्वराविषयी तात्त्विक विचार करणें** —शेठजी ईश्वराचे आस्तित्व पूर्ण-पणे मानतात त्याचे म्हणणे आहे की, जग मिथ्या म्हणजे जग नाहीच दृश्य द्रष्टा हे सर्व ईश्वराचेच रूप आहे अहकारविषयक बुद्धीमुळे जग भासते, दिसते, हे शेठजींनी स्वत लिहिले त्या "जग मिथ्या की पुरुषोत्तमरूप ?" या पुस्तकात ओवीरूपाने फारच सुदर समजावून सागितले आहे सदर पुस्तक मननपूर्वक वाचले असता वाटते की, शेठजी श्रीमत, कुशल व्यापारी तर

आहेतच, पण सन्ताहि आहेत ही विचारसरणी खऱ्या साधुसताची, महात्म्याचीच असते असे विचार नित्य मननपूर्वक ईश्वराविषयीं विचार केल्यावाचून बनणे शक्य नाही

**१३. विद्वानांचा व गुणी जनाचा आदर**—या गुणामुळे त्याचा पुष्कळच चागल्या चागल्या विद्वानाशीं परिचय होऊन मित्रताहि झाली आहे प्रथम डॉ कुर्तकोटी, प्रोफेसर भानु, ब्रह्मनाळकर शास्त्री याचा परिचय होऊन हल्लीं तर महाराष्ट्रातील कोणीहि विद्वान् शेठजीना ओळखत नाही असे आढळणेच कठीण हल्ली जी आर मलकानी, चद्रोदय भट्टाचारी, माधवराव ओक, प जेरे शास्त्री ही विद्वान् मडळी फिलॉसफी इन्स्टिटयूटमध्ये कायमची शेठजींचे सहवासालाच आहेत

**१४. स्वाभिमान व देशाभिमान**—मनुष्यास स्वाभिमान पाहिजेच परतु तो योग्य व रास्त पाहिजे फाजील स्वाभिमान नको स्वाभिमानाने वागणे हे माणुसकीचे लक्षण आहे स्वाभिमानावाचून मोठे कार्य होऊ शकत नाही त्याबरोबर देशाभिमानहि पाहिजे, नाही तर स्वाभिमानाचा उपयोग नाही हे दोन्हीहि गुण पूर्णपणे शेठजीचे अगी आहेत

**१५. जें होणें शक्य असेल त्याचाच उच्चार करणें, नाहींतर स्पष्ट नाही सांगणें**—बहुतेकाना कोणी काहींहि कार्य पुढे माडले, तर विचार न करताच हो हो म्हणतात व ऐन वेळेवर टाळाटाळी करून शेवटी नाहीं सागतात. असे करणे शेठजीना मुळीच पसत नाही पहिल्यादाच विचार करून हो किंवा नाहीं हे स्पष्ट सागतील त्याचे विचारात न उतरल्यास भिडेने हो म्हणणार नाहीत, त्यामुळे समोरचा मनुष्य फशी पडत नाही

**१६. ज्या कामास आरभ केला असेल तें पूर्ण होईपर्यंत सारखी दक्षता ठेवणें**—दोन्ही मिल्स व इतर सस्था पूर्णावस्थेत येणे व सुरळीत चालणे हे शेठजींच्या दक्षतेचेच फल आहे ही सर्व कामे होत असता वेळोवेळी प्रत्येक कामाचे ठिकाणी जाणे, तेथील सुपरवायझर लोकाना काम लवकर व कमी खर्चात कसे होईल ह्या सूचना देणें, रोजचे, आठवड्याचे, महिन्याचे खर्चाचे आकडे नेहमी पाहणे, काम घेणाऱ्यानी आपआपल्या कामाची काळजी बाळगणे, वगैरे बाबीकडे विशेष लक्ष ठेवीत त्या वेळी ते स्वत चे आरामाकडे व खाण्यापिण्याकरिता होणाऱ्या गैरसोयी सोसून काम पुरे होईपर्यंत सारखे झटत राहिले सुरू केलेले काम पुरे झाल्याखेरीज त्याना चैनच पडत नाहीं, हा त्याचा स्वभावच आहे

**१७ व्यवहार करतांना सरळपणा व सावधपणा**—शेठजीना कोणताहि व्यवहार सरळ व सरळ माणसाशी करणे पसत आहे शक्य तोपर्यंत सरळ व्यवहार न करणाऱ्या व्यक्तींशी ते व्यवहार करीतच नाहीत व्यवहार करताना पूर्ण विचार करून, कायदेकानूची चौकशी करून व्यवहार करण्याची त्याना सवय आहे कितीहि फायदा असो, वेडेवाकडे व्यवहार करणे त्याना पसत नाही

**१८. मनुष्याची परीक्षा तो ज्या कामास लायक असेल त्याच कामावर त्याची योजना करणे**—नोकरीस ठेवताना मनुष्य कोणता व्यवसायी व व्यासगी आहे हे बरोबर ओळ

खून त्याच जागेवर त्याची योजना करणे, ज्या कामावर मनुष्य ठेवावयाचा असेल त्या जागेस जो योग्य असेल अशाच माणसाची निवड करणे, व त्यास उत्साह देऊन त्याजकडून काम करून घेणे. हेहि एक कारण सर्व सस्था व्यवस्थित चालण्यास आहे

**१९ ओळख न विसरणें**—बऱ्याच वर्षापूर्वी एखाद्याचा थोडा जरी परिचय झाला असेल, व तो प्रसगानुरूप कुठेहि भेटल्यास ते लगेच ओळखतात. आनदाने विचारतात, की आपली भेट अमुक ठिकाणी झाली होती, व याप्रमाणें बोलणे झाले होते

**२०. तक मोठी बात छे**—ही गुजराथीत एक म्हण आहे तक म्हणजे "सधि" व्यापारात सधीची वाट पाहून ती ओळखणे व साधणे फार महत्त्वाचे आहे सधि पाहून उद्योग व व्यापार करणाराच यशस्वी होतो शेठजींचे लक्ष अशा सधीकडे असते व ती सधि त्याच विचाराती आली तर ते कधीच गमावीत नाहीत कपाशी खरेदी करणे, कापड विकणे व स्टोअरचा माल अधिक प्रमाणात खरेदी करणे, वगैरे बाबतीत शेठजीचे तेजी-मदीची सधि साधण्याकडे विशेष लक्ष असते

**२१. होतकरू विद्यार्थ्यास व होतकरू व्यावसाइकास मदत करणें**—बऱ्याच विद्यार्थ्यांना फीची, पुस्तकाची, राहण्याची व जेवणाची मदत करीत असतात काहीना अमेरिका, जर्मनी वगैरे ठिकाणी उच्च शिक्षण घेण्याकरिता जाण्यासहि द्रव्यरूपाने मदत केली आहे काही नवीन होतकरू यानाहि द्रव्याची मदत करून व्यापारधद्यास लाविलें आहे काही निराश झालेल्याना सुसल्ला देऊन उपदेश करून उद्योगास लाविले आहे काही निराश्रिताना स्वत च आश्रय देऊन आपले पदरी ठेविले आहे

**२२. गरिबानें देखील श्रीसत्यनारायणाचे प्रसादास अगर लग्नकार्यप्रसंगीं आमंत्रण दिल्यास न विसरतां जाणें**—श्रीसत्यनारायणाचे प्रसादास मिल-मजुराकडे गेलेली उदाहरणें तर पुष्कळच आहेत, परतु लग्नाचे पानसुपारीस गरिबाचे बोलावणे असल्यास कधीच टाळीत नाहीत एकदा तर गावात एके ठिकाणी लग्नाचे पानसुपारीस जात असता, रस्त्यावरच एका गरिबाने (त्या-वेळेसच असल्यामुळे) पानसुपारीस बोलाविले आनंदाने पहिल्यादा त्याचेकडे जाऊन पानसुपारी घेऊन नतर आमात्रित ठिकाणीं गेले

**२३. व्यवहारांत अव्यवहार्य बाधा उत्पन्न झाल्यास, कोर्टाचा निकाल पसंत करतात**—अव्यवहार्य बाधा उत्पन्न झाल्यास विनाकारण ऊहापोह न करता नुकसान झाले तरी कोर्टात झालेला निकाल त्याना पसत पडतो स्वत चे व्यवहार सरळ व चोख असल्यामुळे कोर्टातदेखील बहुतेक निकाल शेठजीचे बाजूनेच लागतात

**२४. बोलल्याप्रमाणें वागणें**—व्यवहार करताना चुकून जरी एखादी बाब कबूल केली गेली, त्यात नुकसान जरी होत असले, तरी शब्द कधीच मागे घेत नाहीत बोलल्या प्रमाणेच वागतात

**२५. त्यागवृत्ति**—श्रीमान् प्रतापशेठजींचा ज्याना सहवास आहे विचारपूर्वक त्यानी शेठजीचे वागण्याकडे पाहिल्यास असेच दिसून येईल की त्याची खरी त्यागवृत्ति आहे सर्व व्यवहारात आहेत

आणि नाहीत. जगाकडे शेठजी पुरुषोत्तमरूपाने पाहतात जग हे त्याना पुरुषोत्तमरूप दिसते हे त्याचे " जग मिथ्या कीं पुरुषोत्तमरूप ? " या पुस्तकातील स्वत केलेल्या १४० ओव्या विचारपूर्वक वाचल्यास, " मेरी अमरता " हे छोटेसें पुस्तक व त्यानी आजपर्यंत लिहिलेली बुके " खासगी टिपणवही १ व २ " " है क्या और हम समजते क्या । " तत्त्वज्ञानावरील ५१ व्याख्याने, ही सर्व बुके वाचून मनन केल्यास कोणीहि विचारी माणसास कळेल की, शेठजींची वृत्ति काय आहे. विवेकहीन व अज्ञानी माणसाचे उद्गारात काय कळणार ? तुकाराममहाराजाचे म्हणणे आहे की, " येथे पाहिजे जातीचे " तेच ओळखतील शेठजीनी परोपकारी लोकोपयोगी जो धनाचा व्यय केला आहे त्यावरून त्यागवृत्ति तर दिसेलच, परतु विवेकदृष्टीने ( ज्ञानदृष्टीने ) पाहिल्यास त्यागाचीच मूर्ति दिसेल

**२६ समता** —प्रसंगावाचून कोणतीहि गोष्ट कळून येत नाही बाहेरगावी प्रवासात, यात्रेत अशा प्रसगी सहज कळून येते की, शेठजीचा स्वभाव समतेने वागण्याचा आहे हा अनुभव प्रवासात बहुतेक मडळीना आहेच

**२७. विवेकी**.—श्रीमान् शेठजी फारच सद्विवेकी आहेत विचार केल्यावाचून ते कोणतेहि कार्य करीत नाहीत आजची त्याची योग्यता हा सर्व त्याचे सद्विवेकपूर्वक केलेल्या कर्माचाच परिणाम आहे

**२८. निर्व्यसनी** —बहुतेक श्रीमताना काही ना काही तरी व्यसन असतेच, निदान सट्टा अगर रेसीस हे तरी असावयाचेच. सट्टा करणे अगर रेसीसमध्ये पैसे लावणे ह्यास बरेच व्यापारी भूषण समजतात शेवटीं काय परिणाम होतो हे सर्व जाणतातच परतु शेठजीना एखादे क्षुल्लक देखील व्यसन नाही ते निर्व्यसनी आहेत त्याना ३७ वर्षे विडी ओढण्याची सवय होती, पण त्यानी ती आता पूर्ण बद करून टाकली आहे

## जाहीर व्याख्यानें :

१ आर्यकन्या महाविद्यालय, बडोदा, येथे वार्षिक उत्सवप्रसगी अध्यक्षीय भाषणाचा साराश.

स्त्रियानाहि शिक्षण हवें, पण विशेषत ते नैतिक स्वरूपाचे पाहिजे कारण पुढच्या पिढीच्या त्या माता आहेत व पुढच्या पिढीचें शिक्षण त्यान्च्या घरगुती शिकवणीवर बहुशी अवलबून असते

२ नागपूर येथे अखिल भारतीय आगरवाल महासभा येथें झालेले भाषण त्याचा साराश

श्री प्रतापशेठजीनी ' जी ' पुस्तके स्वत लिहिली आहेत व भाषणे केली आहेत ती अमोल आहेत ती जर विवेकी माणसाने वाचून त्याचा विचार केला, तर शेठजी निमित्तमात्र श्रीमंत आहेत. त्यांची विचारसरणी सत, योगी, ऋषीसारखी आहे

### ओवी

जगाते मिथ्या म्हणणें । किंवा तयासी पुरुषोत्तम वर्णणे ।
याचा एकची अर्थ समजणे । ज्ञानियाने ।। १८३ ।। ( श्री प्रतापशेठकृत )

अर्थात् जगाला पुरुषोत्तमरूप समजून त्या विश्वरूपाची सेवा होईल असे सर्व व्यवहार शरीर आहे तोपर्यंत करणे त्यातच स्व-सेवा व विश्वरूप सेवा घडून येऊन शेवटी अनायासेच विदेही वृत्ति होते, व निर्वासना वृत्तीने देहत्याग म्हणजेच मुक्ति हे त्यानी एका ओवीत सहज समजावून सागितले असे उद्गार वृत्ति, सथ, सतमय ज्याची झाली असेल तेच सागतील, इतराना सागता येणे शक्य नाही

"मेरी अमरता" लेखक॰ श्री प्रतापशेठ हा लहानसा निबध फक्त तीन पानाचा आहे तो अत्यत वाचनीय आहे यात मी कोण आहे, माझे स्वरूप काय आहे हे सहज समजण्यासारखे आहे जी वस्तु पुष्कळ शास्त्रपठनाने, तपश्चर्येने कळण्यास कठीण, ती एका छोट्याशा निबधात सहज कळण्यासारखी सोप्या भाषेत समजावून सागणे ही गोष्ट सामान्य नाही असे "विचार" विवेक व मननरूपी बरेच दिवस तपश्चर्या केल्यावाचून बनणे सभवनीय नाही हे विचार कळून आचारात बाणणे म्हणजेच साधुत्व

मी आता आहे अगर नाही या बाबतीत बुद्धीला कोणत्याहि प्रकारची शका नाही व याचे उलट मी हल्ली आहेच आहे असा बुद्धीस पूर्ण विश्वास आहे, व तो कोणतेहि प्रमाण लावल्या-वाचून आहे

प्रथम मी आहे, नतर मी प्रमाण प्रमेयाचा व्यवहार करतो, प्रमाण म्हणतात, इद्रियाना, इद्रिये जशी विषयरूप वस्तूस विषय बनवतात तसा "मी" ला विषय बनवू शकत नाही, हेच माझे निर्मर्याद स्वरूप यास पुरुषोत्तम अगर परमात्मा म्हणतात हा बुद्धीचा विषय नाही मला बुद्धि विषय करू शकत नाही, सबब मी मर्यादित नाही मी म्हणजे माझे स्वरूप अमर्याद आहे सूर्याजवळ जशी दिवस, रात्र नाही, तसाच मला भूतकाळ, भविष्यकाळ नाही, मी कायमचा वर्तमानकालीच आहे

तसाच मी चित्स्वरूप पण आहे कसा ? तर मी आहे हे मी जाणतोहि आहे, की मी आहे यावरून मी ज्ञातस्वरूप, चित्स्वरूप पण आहे

हे विचार आत्मसात् करून मुक्त झाले पाहिजे हाच परम पुरुषार्थ आहे

याप्रमाणे शेठजीची विचारसरणी आहे ही विवेकी विद्यार्थ्याना, विचारी माणसाना व मुमुक्षु लोकाना फारच उपयोगी व महत्त्वाची आहे

यावरून "मेरी अमरता" या निबध–लेखकाचे विचार किती उच्च व सूक्ष्म आहेत हे वाचकान्या सहज लक्षात येईल

या गौरव-ग्रथात बरेचसे लेख निरनिराळ्या लेखकाचे आहेत त्यात बरीचशी माहितीहि आली आहे विनती आहे की, माझा लेखकाचा व्यवसाय नसल्यामुळे या सक्षिप्त चरित्रात बरीच विसगतता झाली असेल असे मला वाटते याबद्दल श्रीमान् शेठजी व वाचक क्षमा करतील

या लेखाचा लेखक, मी किसन मोतीराम पोतदार, श्रीमान प्रतापशेठजीचे सेवेस संवत् १९६० चे कार्तिक शु १ पासून आज पन्नास वर्षे आहे माझे मित्र पाडुरग नारायण वैद्य हे माझे

आधी दोन वर्षांपासून आहेत आमचे दोघाचेहि वडील आमचे वयाचे चौदावे वर्षी निवर्तले होते दोघानाहि घरात आई, कुटुब व भाऊ-बहिणी मिळून समसमान माणसे होतीं दोघाचीहि स्थिति गरिबीची असल्यामुळे आम्ही समदु खी होतो चोपड्यास दोन वर्षे नोकरी केल्यानतर प्रगति व्हावी म्हणून मनात आले की शेठजीचे आश्रयाने बडोद्यास कलाभवनमध्ये शिकण्यास जावे शेठजीना आम्हीं दोघानी आमचे विचार सागितले शेठजीनी मोठ्या प्रेमाने व आनदाने आम्हास विचारले कीं, तुमचे घरी तुमचेवर अवलबून कोण कोण व किती किती माणसे आहेत ? आम्ही सागितले कीं प्रत्येकास आई, बायको व दोन आमचेपेक्षा लहान भाऊ बहिणी लगेच थोडा वेळ विचार करून सागितले की, तीन चार वर्षे बडोद्यास राहिल्यावर तुमचे घरच्या मडळीची परिस्थिति काय होईल ? शिक्षण मध्येच सोडावे लागेल, अपुऱ्या शिक्षणामुळे शिक्षणाचा काही उपयोग होणार नाही व आहे यापेक्षा अधिकच अडचण प्राप्त होईल यापेक्षा इमानाने व प्रामाणिकपणाने येथेच नोकरीवर राहिलात तर काहीं दिवसानी तुमचे बरे होईल लगेच बडोद्यास जाण्याचे विचार मनातून काढून टाकून कामास लागलो आज त्याचे कृपेने मी प्रताप मिलमध्ये मिल हेडक्लार्क आहे व माझे मित्र पाडुरगतात्या मोटार डिपार्टमेटमध्ये मुख्य सुपरवायझर आहेत

पाडुरंगतात्यास शेठजींनी मोटार घेतल्यावर मुबईस मोटारीचे काम शिकण्यास ठेविले होते व मला मिलमध्ये कारकून म्हणून आरभापासून ठेविले मला वेळोवेळी सुचवावे की, बघ, कामाची चागली माहिती करून घे काम पद्धतशीर वेळचेवेळी बिनचूक सरकारी कामासारखे झाले पाहिजे शेठजीचे उपदेशाने मला कामाची उत्तम माहिती होऊन आज मी हेडक्लार्कचे काम करीत आहे आमचे दोघाचेहि शेठजीचे उपदेशाने कल्याण होऊन आम्ही सुस्थितीत व आनदात आहो त्या वेळचे त्याचे बोलणे ततोतत खरे झाले त्याचा आशीर्वाद फलद्रूप झाला त्याचे आशीर्वादाने, कृपेने आम्हा दोघाची दारिद्र्यावस्थेतून मुक्तता झाली व त्याचीच ज्ञाननौका, अज्ञानसागरातून तारून आम्हास पारमार्थिक मुक्तताहि करून देईल अशी आमची पूर्ण श्रद्धा आहे शेठजीचे पदरी खाजगी व इतर सस्थेत जी जी माणसे आहेत त्या सर्वांना शेठजीचा सहवास व सेवा सोडून जावेसे वाटत नाहीं आयुष्यभर त्याचेच सहवासात रहावेसे वाटते त्याप्रमाणे आम्हा दोघानाहि सेवा घडावी अशी ईश्वरा जवळ प्रार्थना करून हा लेख पुरा करतो



# ९

लेखक **श्री. दत्तात्रय सावळाराम नाईक**, स्टोअर-कीपर, प्रताप मिल्स, अमळनेर.

श्रीमान् पूज्य प्रतापशेठजी याचे अमृत-महोत्सवांत त्याना अर्पण करण्यांत यावयाच्या गौरव ग्रंथासाठी मींदेखील दोन शब्द लिहावे अशी सूचना महोत्सव समितीकडून मला आली याबद्दल मी समितीचा फार आभारी आहे कारण, या महोत्सवात हस्तेपरहस्ते का होईना, परंतु मला भाग मिळावा व पूज्य शेठसाहेबाच्या सन्मानाचे कामी अशत मीं सहभागी व्हावे अशी माझी मनापासून इच्छा होती ती सधि मला समितीने दिल्याबद्दल मी कृतज्ञ आहे

आमच्या घराण्याचा श्रीमत शेठसाहेबाशी पिढीजात सबंध आहे माझ्या वडिलानी श्रीमंत शेठसाहेबाना लहानपणीं शिकविले परतु मी माझ्या वडिलाचा सर्वात लहान मुलगा असल्यामुळे श्रीमान् शेठसाहेबाच्या पूर्वायुष्याशी माझा परिचय झाला नाहीं माझ्या वडिलानी श्रीमान् शेठ-साहेबाना तत्त्वज्ञान जरी शिकविले असले, तरी त्या वेळी मी अतिशय लहान असल्यामुळे माझे वडील त्याना काय शिकवीत असत हे मला समजत नव्हते शेठजी एक मोठी व्यक्ति आहे एवढेच लहानपणीं मी जाणून होतो व त्याच्याबद्दल केवळ भीतियुक्त आदरच मी शाळेत व कॉलेजमध्यें असताना माझ्या मनात वसत होता त्याचा माझा निकट सबध १९३६ सालापासून आला कारण, त्या वेळीं त्याच्या पर्सनल पत्रव्यवहाराचे काम माझ्याकडे सोपविण्यात आले होते ह्या काळच्या पुढे त्याच्या व्यक्तिमत्त्वामधील एकेक पैलू माझ्या निदर्शनास येत गेला

त्यांचे स्वभावातील महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांनी एखादा संकल्प केला म्हणजे तो वज्र-लेपच समजावयाचा कितीहि काळ लोटला, कितीहि अडचणी आल्या व काहीहि विघ्ने आली, त्या सकल्पाविरुद्ध कोणीं कितीहि मन वळविण्याचा प्रयत्न केला तरी त्याचा झालेला सकल्प मोडावयाचा नाहीं त्याच्या जीवनातील यशाचे हा स्वभावविशेष मुख्य कारण आहे. धरसोड ही वृत्ति त्याना माहीतच नाहीं ह्या स्वभावविशेषाचे प्रत्यतर मला आले ते खालीलप्रमाणे

श्रीमान् शेठसाहेबाना तत्त्वज्ञानाची पाहिल्यापासून अभिरुचि चोपड्यास असताना निर-निराळ्या शहरातून व कॉलेजातून विद्वान् मडळी, प्रोफेसर्स याना बोलावून आणून त्याच्याकरवी ते तात्त्विक विषयावर चर्चा करवीत असत हीं विद्वत्ताप्रचुर भाषणे सगळ्यानीं ऐकावीत व सगळ्याना ज्ञानाचा लाभ व्हावा हा त्यात मूलभूत हेतु असे म्हणून या उपक्रमाला त्यानी ज्ञानसत्र असें यथार्थ नाव दिलें ही शेठसाहेबाची तात्त्विक अभिरुचि दिवसेंदिवस वाढत गेली आणि एके दिवशीं ते त्याचे गुरुजींबरोबर उनपदेवास गेले असताना तेथे फराळ वगैरे झाल्यावर तेथील नाल्यापासून वरील बाजूस सुमारें शें-दोनशे फुटावर एका निंबाचें झाड आहे. त्या झाडाचे छायेखाली विश्रातीसाठीं सतरजी टाकून ते बसले असताना त्याच्या गुरुजीनीं अद्वैतवादाचे महत्त्व त्याना पटवून दिले व

| सन | दुकाने | एजन्सीज् |
|---|---|---|
| १९३१-३२ | धुळे, नगर, जळगाव, कलकत्ता | के एल् खेतान, बनारस, व मागील सालाप्रमाणे |
| १९३२-३३ | ,, ,, ,, ,, | ,, ,, , |
| १९३३-३४ | ,, ,, ,, ,, कानपूर | ,, ,, ,, |
| १९३४-३५ | ,, ,, ,, ,, ,, | नाशिक, बनारस, शहादा |
| १९३५-३६ | ,, ,, ,, ,, ,, | ,, ,, ,, |
| १९३६-३७ | ,, ,, ,, ,, दिल्ली | ,, ,, ,, |
| १९३७-३८ | धुळे, नगर, जळगाव, दिल्ली | नाशिक, बनारस |
| १९३८-३९ | ,, ,, ,, ,, | ,, ,, |
| १९३९-४० | नगर, धुळे, जळगाव | ,, ,, |
| १९४०-४१ | नगर, धुळे | ,, ,, |
| १९४१-४२ | धुळे, नगर, नदुरबार | ,, ,, |
| १९४२-४३<br>१९४३-४४ | सर्व दुकाने बद करून फक्त धुळे, नदुरबार, बऱ्हाणपूर, नाशिक, नगर, बनारस, कानपूर व अमृतसर येथे एजन्सीज् ठेवण्यात आल्या | |
| १९४४-४५ | | कानपूर, बनारस, अमृतसर. |

सन १९४५-४६ पासून आजतागायत सर्व दुकाने व एजन्सीज् बद करून गॅरटीड ब्रोकर पद्धत चालू केली ती हल्ली बनारस व धुळे येथे अमलात आहे

एकदा ता ४-२-१९३३ रोजी रात्री कपनीने खरेदी केलेल्या कापसाचे ६००० दोकड्यास एकाएकी आग लागली त्यानतर आजपर्यंत कोणत्याहि मोठ्या प्रमाणावर आगीने नुकसान झाले नाही परतु कपनीने विकत घेतलेल्या २१ लाखाचे कर्जरोखे काही विशिष्ट कारणास्तव विकावे लागल्यामुळ कपनीस रु ४,०९,६५७-१०-० तोटा झाला तसेच १९४९-५० साली सरकारने कामगारान्या वेतनाबद्दल स्टॅडर्डायझेशन (किमान वेतनश्रेणी) चा ॲवॉर्ड दिला व त्यामुळे कामगाराचे पगारात १९४८ चे जानेवारीपासून वाढ द्यावी लागली त्याकरिता कपनीस रु २,०३,३६०-१४-९ नुकसान झाले व त्याच सुमारास बोनससाठी मजूर केलेल्या रकमेपेक्षा जास्त रक्कम द्यावी लागल्यामुळे कपनीस त्या साली नफा होऊ शकला नाही

सन १९३९ ला दुसरे महायुद्ध झाल्यानतर अन्नधान्याचे कापडाचे व वस्तूचे भाव झपाट्याने वाढू लागल्यामुळे प्रथम युद्धमहागाई म्हणून व नतर अन्नधान्य महागाई म्हणून सर्व कामगाराना विशिष्ट हिशोबाने (इडेक्सप्रमाणे) रक्कम द्यावी असे ठरविले यासाठी १९३९ सालचे राहणीचे मान १०० धरून त्यावर दरमहाचे दरमहा होणाऱ्या वाढीचा हिशोब करण्यात येतो त्या हिशोबानुसार विशिष्ट आकडा (Index) सरकार जाहीर करीत असते त्याप्रमाणे सप्टेंबर १९३९ चे राहणीमानचे १०० पॉइट वजा करून बाकीचे प्रत्येक पॉइटला १,२८ पै

प्रमाणे महागाई दिली जाते मिल-कामगाराना पगार-मजुरी ही सरकारने लागू केलेल्या स्टॅंडर्डा-यझेशन ऑफ वेजेसचे ॲवॉर्डप्रमाणे ता १-१-१९४८ पासून दिली जात आहे

कपनींतील कारकुनासाठी दि न्यू प्रताप मिल्स क्लेरिकल स्टाफ प्रॉव्हिडट फड स्कीम १-७-१९३९ पासून अमलात आणण्यात आली व कपनीने रुपयास एक आणाप्रमाणे कारकुनाचे वर्गणीबरोबर दिलेला आहे दरम्यान सन १९५२ चे नोव्हेंबरात सरकारने दि न्यू प्रताप मिल्स एम्प्लॉइज प्रॉव्हिडट फड स्कीम अमलात आणली आहे तिचा फायदा कपनीचे रु ३०० पगाराचे आतील सर्व कामगाराना मिळत आहे त्याचप्रमाणे सरकारने सन १९५२ चे २४ फेब्रुवारीपासून स्टेट इन्शुरअन्स स्कीम लागू केलेली आहे व त्याप्रीत्यर्थ कपनीस सरकारात मजुरीच्या ¾०/० प्रमाणे भरावे लागत आहे परतु सदरहू स्कीम्सप्रमाणे कपनीस कोणत्याहि प्रकारचा फायदा नाही

भाडवली खर्चाची आजची परिस्थिति खालीलप्रमाणे दिसून येते —

१ मशिनरी—लिहिलेली किंमत— रु ३,८३,९११-१०-२
२ इमारती — ” ” रु १०,३४,२३१-१३-०

कपनीचे सुरवातीपासून कपनीस झालेल्या नफ्याबरहुकूम कपनीस टॅक्सेस सरकारकडे भरावे लागले त्याचा तक्ता खालीलप्रमाणे दाखविला आहे —

| सन | इन्कम टॅक्स व सुपर टॅक्स | एक्सेस प्रॉफिट टॅक्स | बिझिनेस प्रॉफिट टॅक्स |
|---|---|---|---|
| १९२६ | १९५३-६-० | | |
| १९२८ | २२१६-१२-० | | |
| १९२९ | ७५९३-२-० | | |
| १९३१ | २३,५२८-१-० | | |
| १९३२ | ३२,१०२-१४-० | | |
| १९३३ | २९,४८८-२-० | | |
| १९३४ | १०,७५४-१२-० | | |
| १९३५ | २१,३०१-१५-० | | |
| १९३६ | १७,९५८-६-० | | |
| १९३७ | १६,४३३-१४-० | | |
| १९३८ | २०,४१३-१५-० | | |
| १९३९ | २२,९२९-१-० | | |
| १९४१ | ७९,६६६-५-० | ७५,५३६-०-० | |
| १९४२ | १,५५,४०३-१०-० | ६,८५,९०२-०-० | |
| १९४३ | ५,८१,८८७-०-० | २२,०५४८० | |
| १९४४ | ५,२४,५३०-०-० | १९,०८,९०२ | |
| १९४५ | ३,१२,७८९-८-९ | १३,४१,९८५ | |

| सन | इन्कम टॅक्स व सुपर टॅक्स | एक्सेस प्रॉफिट टॅक्स | बिझिनेस प्रॉफिट टॅक्स |
|---|---|---|---|
| १९४६ | १,५३,३४९-१०-६ | ५,४९० | |
| १९४७ | २,५७,१२३-७-० | | १०,१३२-५-० |
| १९४८ | २,७६,७५३-०-० | | १९,९५४-४-० |
| १९४९ | ५,४७,९७४-४-० | | ४५,२८२-९-० |
| १९५१ | १५,७५०-०-० | | |
| १९५२ | १७,७९७-८-० | | |

तुलनात्मक अहवाल —कपनीच्या कार्याची थोडीशी कल्पना येण्यासाठीं खालील तक्ते सादर करीत आहोत

(१) कापूस, (२) कोळसा, (३) स्टोअर्स, (४) कापड विक्री, (५) पगार मजुरी, महागाई, बोनस

| सन | कापूस वापरला पौंड | कोळसा वापरला टन |
|---|---|---|
| १९३८ | ३९,८९,६९२ | ७,६८१-१७ |
| १९३९ | ४०,२१,१२७½ | ७,०४९-१४ |
| १९४० | ४४,५५,३९३ | ८,८८५-६ |
| १९४१ | ४४,०८,७६८ | ९,१८९-१८ |
| १९४२ | ५१,२९,७९३ | ९,३१४-४ |
| १९४३ | ५१,४१,९११ | ७,८२१-९ |
| १९४४ | ४६,३४,२९९ | ९,६०६-७ |
| १९४५ | ५३,२२,२६१ | १०,२९६-१२ |
| १९४६ | ४८,३५,३६० | ११,४४०-१९ |
| १९४७ | ३७,६२,२४३ | ९२२१-७ |
| १९४८ | ३६,५३,१४४ | ८४७१-१४ |
| १९४९ | ५०,९९,६१६ | १२,७७९-४ |
| १९५० | ५९,५२,४५९ | १६,११३-० |
| १९५१ | ३८,८३,६४८ | १०,६२४-१० |
| १९५२ | ४८,२८,१९९ | १०,७३१-१२ |
| १९५३ | ४८,४४,०२५½ | ११,०८३-० |

| सन | कापूस वापरला रु | कोळसा वापरला रु | स्टोअर वापरला रु | कापड-विक्री | पगार मजुरी, महागाई, बोनस |
|---|---|---|---|---|---|
| १९३८ | ९,८३,४२० | ९५,२६८ | ३,९६,९४५ | २७,५६,४७६ | ६,०३,२१८ |
| १९३९ | ५,८७,१६३ | १०२,७११ | ४,७३,१३५ | २२,९३,७६० | ६,३६,७५१ |
| १९४० | १२,५५,४९१ | १,११,९५६ | ५,८०,१८९ | २९,७८,५०६ | ६,९९,६७१ |
| १९४१ | ६,७०,२०४ | १,१५,९८९ | ८,५९,७७४ | ३६,२०,७५८ | ७,४०,१०३ |
| १९४२ | १५,१३,७८२ | १,२८,७३० | १०,३६,६३१ | ४७,०६,२८५ | ९६४,९७० |
| १९४३ | १५,५५,३२९ | २,५४,००५ | २२,९०,९१४ | ६८,२९,४७९ | १४,३५,०७७ |
| १९४४ | २८,५६,५१७ | २,२५,७९५ | १०,२१,४९५ | २६,३३,५५६ | ४,०९,७३१ |
| १९४५ | २३,०७,३८० | २,५४,२९७ | १५,०३,९८७ | १,०२,२६,७२६ | १५,७६,०१० |
| १९४६ | २८,६१,१२३ | ३,०४,७०४ | १६,२०,३६९ | ६२,३७,०९१ | १५,९०,३७५ |
| १९४७ | १७,८९,१४५ | २,६१,९८६ | १०,९९,४८२ | ६१,००,८२७ | १७,६१,४८८ |
| १९४८ | १९,९९,३०३ | २,४९,३०५ | ९,९५,०२३ | ६०,२९,१८० | २१,६७,८४८ |
| १९४९ | ३३,९४,७८७ | ३,८५,८९० | १४,८७,४७५ | ८३,८५,१८१ | ३३,५०,५०० |
| १९५० | ६०,५६,४८६ | ४,४३,४१९ | १५,५४,४३३ | १,२३,२१,०९७ | ३७,६७,३१८ |
| १९५१ | ४३,०९,६१६ | २,७९,७७० | १०,८९,५१५ | ८८,६८,२९७ | २९,३४,३४७ |
| १९५२ | ५३,०८,४५३ | २,८२,२७५ | १३,४४,२३९ | १,१६,३४,३७५ | ३३,१०,१५६ |
| १९५३ | ४४,९९,१५८ | ३,७२,३९७ | १२,५३,६८२ | १,०२,२६,८९४ | ३१,९४,८८७ |

मिलच्या निरनिराळ्या खात्यातून आलेल्या अहवालावरून सदर्भानुसार माहितीचे तक्ते सोबत जोडले आहेत

आजची कपनीची सापत्तिक परिस्थिति थोडक्यात खालीलप्रमाणे दाखविता येईल —

मिळकत व ऐवज ( Assets ) रु ५५,८३,९४२

देणी ( Liabilities ) रु ३४,१९,९४७

कार्यान्वित भाडवल ( Working Capital ) रु ४९,२७,०८७

याशिवाय या ठिकाणी खालील गोष्टीचा निर्देश करण्यास हरकत नाही

अ – सन १९४४-४५ पूर्वी मिलचे कामाचे तास १० होते ते ९ करण्यात आले आणि नवावरून आठ तास ता १-८-४६ पासून करण्यात आले

ब — मिलचे कारभारात शक्य त्या ठिकाणी काटकसर कशी करण्यात येईल याबाबत तपासणी करून रिपोर्ट करण्यासाठी श्री बेजामिन याना नियुक्त केले होते त्यानी या सर्व कामाची एक महिना पहाणी करून त्याचा रिपोर्ट मे बोर्ड ऑफ डायरेक्टर्स याचे ता २३-२-३० चे सभेमध्ये ठराव न ११ ने मानण्यात येऊन मिलमध्ये जरूर ती काटकसर करण्याबद्दल विचार झाला

क—सन १९५२ पूर्वी कंपनीचा कोळसा व इतर माल रेल्वेचे आवारात कंपनीने तयार केलेल्या धक्क्यावर उतरून घ्यावा लागत असे, व त्यायोगे मालाची नासधूस व चोरी होण्याचा संभव दिसून आल्यामुळे कंपनीने मिलचे हद्दीमध्ये स्वतंत्र रेल्वे साइडिंग घेतले आहे व ते जानेवारी १९५३ पासून उपयोगात आणिले जात आहे.

ड—कापडाची दुर्मिळता झाली असताना सन १९४३-४४ मध्ये कंपनीने भागीदारांना व कामगारांना खास सवलतीने कापड विकत देण्याची व्यवस्था केली होती.

## मिलचा पाणीपुरवठा

मिल चालविण्याकरिता जशी कापूस, कोळसा व स्टोअर वगैरे मालाची प्रामुख्याने जरुरी आहे, त्याचप्रमाणे पुरेसा पाणीपुरवठा असणे हेंहि तितकेच महत्त्वाचे आहे.

सुरवातीस मिल लहान प्रमाणात होती तेव्हा मोतीवाल्याचे काठी जमनागिरीजवळ सरकारी जागा विकत घेऊन तेथे एक विहीर खोदून बांधून काढली व तेथे एक स्टीम एंजिन बसवून मिलला पाणीपुरवठा सुरू केला, परंतु दिवसेंदिवस मिल वाढत गेल्यामुळे तेवढ्या विहिरीतून पुरेसे पाणी मिळेनासे झाले, म्हणून तिच्याच शेजारी एक मोठी विहीर खोदली व सुदैवाने तिला पाणीहि चांगले लागले. पण तिचा पसारा फार मोठा झाल्याने व पाणीहि फार प्रमाणात चांगले लागल्याने तिचे केलेले बांधकाम वेळोवेळी ढासळून पडू लागले. म्हणून मिलमध्ये पाण्याच्या जागा शोधून चार विहिरी निरनिराळ्या ठिकाणी खोदल्या, परंतु त्या सर्वांतूनहि पुरेसा पुरवठा होणे शक्य न दिसल्याने जमनागिरी येथील मोठ्या विहिरीचे बांधकाम चांगल्या पक्क्या प्रमाणात करणे जरूर झाले व ते काम हल्ली चालू असून लवकरच विहीर बांधून होईल.

मिलला व चाळीला मिळून दररोज सुमारे ९०,००० गॅलन पाणी लागते. उन्हाळ्याच्या काळात जमनागिरी येथील मोठ्या विहिरीतून दररोज ७२,००० गॅलन व लहान विहिरींतून १५,००० गॅलन पाणीपुरवठा होऊ शकतो. मिलमधील ४ विहिरींपैकी २ विहिरी बंद असून २ विहिरींतून दररोज सरासरी ६,००० गॅलन पाणीपुरवठा होऊ शकतो. त्यामुळे दररोज लागणारे पाणी या विहिरींतून पुरेसे मिळू शकते.

## विशेष सोयी

कंपनीचे नोकरीत असलेले जे लोक मिल कंपौंडमध्ये व आजूबाजूस राहतात त्यांचे मुलांना गावातील शाळा लांब पडत होती, ती गैरसोय दूर करण्याकरिता कंपनीने मिल-कंपौंडात शाळेसाठी इमारत बांधून दिली आहे व तेथे म्युनिसिपालिटीची प्राथमिक शाळा सन १९३२-३३ सालापासून सुरू आहे. त्याचा फायदा बहुतेक मुलांना होत आहे.

# सेंट्रल हिन्दु मिलिटरी एज्युकेशन सोसायटी द्वारा प्रस्थापित भोंसले सैनिक विद्यालय

लेखकः-- ह. कृ. मोकाशी, एम्. ए. बी. टी., प्रिन्सिपॉल.

धर्मवीर स्व. डॉ. बा. शि. मुंजे यांनीं भोंसले सैनिक विद्यालयाची स्थापना १९३७ सालीं केली त्या वेळीं भारत पारतंत्र्यांत होता. भारताच्या सैन्याचीं सर्व सूत्रें इंग्रजांच्या हातांत होती. सैन्यांत भारतीय नवजवान अधिकारी म्हणून फारच थोड्या प्रमाणांत घेतले जात होते. Martial आणि Non-Martial असा भेद भारतांत इंग्रजांनीं प्रचलित केला होता. विशिष्ट जातीच्या लोकांनाच फक्त सैन्यांत प्रवेश मिळत असे. ही परिस्थिति भारतीयांच्या दृष्टीनें मोठी स्पृहणीय नव्हती. उलट ही बंधनें जितक्या लवकर तोडतां येतील तितकें भारताच्या दृष्टीनें हिताचेंच होते. डॉ मुंजे यांनी आपल्या साऱ्या आयुष्यभर भारताच्या सैन्यांत सर्वांना लायकीप्रमाणें प्रवेश मिळावा म्हणून आटोकाट प्रयत्न केले. निरनिराळ्या संरक्षण-समित्यांवर त्यांनीं सदस्य म्हणून काम केलें, व तरुणांना सैन्य-प्रवेश सहज साध्य करविला. परंतु सैन्यांत अधिकाऱ्यांच्या जागेकरितां ज्या लायकीचे तरुण लागतात त्या लायकीचे तरुण त्या वेळीं मिळत नसत. शालेय शिक्षण एकांगी स्वरूपाचें होते. पुस्तकी ज्ञानावर विशेष भर दिला जात असे. हल्लींहि परिस्थिति विशेष सुधारली असे म्हणतां येणार नाहीं. शिक्षणप्रणाली सदोष होती. शिक्षणसंस्थांतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांत साहस, नेतृत्व, चारित्र्य व शिस्त या गुणांचा अभाव दिसत असे. डॉ. मुंजे १९३१ सालीं गोलमेज परिषदेचे सदस्य म्हणून इंग्लंडला गेले होते. इंग्लंडहून परत येत असता त्यांनीं फ्रान्स, इटली, जर्मनी इत्यादि देशांना भेटी दिल्या. तेथील शिक्षणसंस्थाचें बारकाईनें निरीक्षण केलें त्या वेळीं प्रामुख्यानें त्यांच्या नजरेस जी गोष्ट आली ती ही कीं, युरोपीय राष्ट्रांत

शैक्षणिक कार्यक्रमात सैनिकी शिक्षणाला फारच महत्त्वाचे स्थान आहे इंग्लडमधील एका टेक्निकल स्कूलला त्यानी भेट दिली असता तेथील विद्यार्थ्यामध्ये दिसून आलेल्या सैनिकी शिस्तीचा त्याच्या मनावर सखोल परिणाम झाला अशा तऱ्हेची शाळा भारतात जरूर काढली गेली पाहिजे की जिच्यामध्ये मुलाना शालेय शिक्षणाबरोबरच सैनिकी शिक्षण आवश्यक राहील, असे त्याच्या मनाने घेतले असे शिक्षण घेतलेले विद्यार्थी सैन्यात अधिकाऱ्यांच्या जागेकरिता लायक बनतील ही कल्पना डॉ मुजे यानी अनेक ठिकाणीं आपल्या भाषणातून विशद करून सागितली

ही कल्पना मनात घोळत असताच त्याची व श्रीमान प्रतापशेठजी, अमळनेर याची इग्लडहून परत आल्यावर भेट झाली व त्यानी आपली ही सैनिक विद्यालयाची कल्पना शेठजीना सागितली श्रीमान प्रतापशेठजी यानी अशा तऱ्हेच्या सस्थेची आवश्यकता जाणून अत्यत उदार अशी एक लाखाची देणगी जाहीर केली व ताबडतोब सेट्रल हिन्दु मिलिटरी एज्युकेशन सोसायटी स्थापन करण्यात आली स्व डॉ मुजे यानी इतर लोकाकडून विद्यालयाची स्थापना करण्याकरिता मदत मिळविली यामध्ये शिंदे महाराजाच्या मदतीचा उल्लेख करणे जरूर आहे शिंदे महाराजानी १ लाख रुपयाची देणगी सैनिक विद्यालयाच्या उद्‌घाटन–प्रसगी जाहीर करून ताबडतोब पाठवून दिली

अशा तऱ्हेने निधि जमा करून डॉ. साहेबानी १९३७ मध्ये नाशिक येथे भोसले मिलिटरी स्कूलची स्थापना करून आपल्या कल्पनेला मूर्त स्वरूप दिले

ज्या ठिकाणी विद्यालय काढण्यात आलेले आहे त्या जागेस रामभूमि विद्यालयातील विद्यार्थ्यास रामदडी ही नावे त्यानी दिली रामभूमि हे स्थान अत्यत रमणीय असून चारी बाजूनी सुदर सुदर पर्वताच्या रागा आहेत व एका बाजूने गोदावरी नदी वाहत आहे. नाशिक हे थड हवेचे ठिकाण असून वर्षभर येथील हवा आरोग्यवर्धक असते विद्यालयाचा परिसर जवळ जवळ १६० एकर असून अखिल भारतात अशा तऱ्हेचे हे एकमेव विद्यालय आहे या विद्यालयात प्रत्येक विद्यार्थ्याला शालेय शिक्षणाबरोबर प्राथमिक सैनिकी शिक्षण देण्यात येते विद्यार्थी सातव्या वर्गापासून घेतले जातात व शालान्त परीक्षेपावेतो त्याचे अध्ययन होते शारीरिक, सैनिक व शीलसवर्धक शिक्षण मुलाला मिळावे म्हणून विद्यार्थ्यांनी या विद्यालयातच राहिले पाहिजे, येथेच भोजन केले पाहिजे व अध्ययन केले पाहिजे अशी अट आहे आणि या दृष्टीने विद्यालयात सर्व तऱ्हेची व्यवस्था ठेवलेली आहे सैनिकी शिक्षणात घोड्यावर बसणे, बदूक चालविणे, बॉक्सिंग, पोहणे, सैनिकी कवायत इत्यादि गोष्टीचा अतर्भाव आहे

विद्यालयाने आखलेला सैनिक शिक्षणाचा कार्यक्रम पूर्ण झाल्यावर विद्यार्थ्याना प्रमाणपत्रेहि देण्यात येतात

याशिवाय दरवर्षी उन्हाळ्यात एक सैनिकी शिबिर चालविण्यात येते. हा कार्यक्रम ५ आठवड्यांचा असतो साधारणत ज्या विद्यार्थ्याना भोसले सैनिक विद्यालयात वर्षभर शालेय व सैनिक शिक्षण घेणे काहीना काही कारणामुळे कठीण जाते असे विद्यार्थी या शिबिराचा लाभ घेऊ

शकतात. या शिबिरांतहि सैनिकी शिक्षण देण्याची व्यवस्था केलेली आहे. घोड्यावर बसणें, बंदूक चालविणें, पोहणें, सैनिकी कवायत, मुष्टियुद्ध इत्यादि विषय शिकविले जातात.

विद्यालय निघाल्यापासून विद्यालयानें चालविलेल्या ५ आठवड्यांच्या शिबिरांत भारतांतील निरनिराळ्या प्रांतांतून विद्यार्थी येत असतात. प्रारंभापासूनच विद्यालयाला अखिल भारतीय स्वरूप प्राप्त झालें आहे.

मुंबई प्रादेशिक सरकार व मध्यवर्ती सरकार यांनीं शाळेला रायफलसचें लायसन्स देऊन प्रोत्साहन दिले आहे. भोसले सैनिकी विद्यालयाची स्थापना झाली त्या वेळीं देश परतंत्र होता. शासनकर्ते इंग्रज होते. भारतांत सैनिकी शिक्षण देण्याची कोठेहि व्यवस्था नव्हती एवढेच नव्हे तर सैनिकी शिक्षणाचे बाबतीत त्या वेळचें सरकार शंकेखोर दृष्टीनें पाहत असे. अशा परिस्थितींत देखील डॉ. मुंजे यांनीं आपल्या आयुष्यभर तरुणांना सैनिकी शिक्षण आवश्यक केलें गेलें पाहिजे याचा पुरस्कार केला. अनेक ठिकाणीं रायफल क्लब्स स्थापन करण्यांत पुढाकार घेतला. निरनिराळ्या संरक्षण समित्यांवर काम केलें, व भोंसले सैनिक विद्यालय स्थापन करून सैनिकी शिक्षण भारतांतील तरुणास सहजसाध्य केलें.

आतां भारत स्वतंत्र झाला आहे. सैनिकी शिक्षण विद्यार्थ्यांना मिळालें पाहिजे असें सरकारचे प्रातिनिधिक धोरण आहे. सैनिकी शिक्षणास दिवसेंदिवस प्राधान्य मिळत आहे व आजचा विद्यार्थी उद्यांचा उत्तम नागरिक बनावा म्हणून सैनिकी शिक्षणाचे महत्त्व सर्वत्र पटूं लागलें आहे. अशा अनुकूल परिस्थितीत भोंसले सैनिक विद्यालयाने अंगिकारलेले कार्य वाढीला लागेल असा आत्मविश्वास वाटतो

सुदैवानें भोंसले सैनिक विद्यालय चालविणाऱ्या सेंट्रल हिन्दु मिलिटरी एज्युकेशन सोसायटीचे धुरीणत्व श्रीमान प्रतापशेठजी याचेकडेच असल्याने आमचा आत्मविश्वास कितीतरी पटीने वाढत आहे. विद्यालयाच्या सुरुवातीपासून श्रीमान प्रतापशेठजी हेच सोसायटीचे अध्यक्ष आहेत व त्यांच्या अनुभवाचा लाभ संस्थेस होत राहील व संस्थेच्या द्वारां स्थापित झालेलें विद्यालय प्रतिपच्चंद्र कलेप्रमाणे सदैव अभ्युदय पावेल यांत मुळीच शका नाही.

॥ श्रीरामो जयति ॥

# श्री सेठ प्रताप रामेश्वर लाल सहरिया हाईस्कूल, कालाडेरा का संक्षिप्त परिचय ।

लेखक श्री **रामकिशोर**, M A C T हेडमास्तर

## कालाडेरा का परिचय

कालाडेरा तहसील आमेर ( जिला जयपुर ) मे एक छोटा सा रेतीला ग्राम है जो जयपुर से २५ मील और गोविन्दगढ-मालिकपुर से ( जयपुर-लुहारू सेक्शन पश्चिम रेलवे पर ) ३½ मील दूर है। यहा की आबादी लगभग ३००० है। जलवायु स्वास्थ्यकर तथा शुष्क है परन्तु पानी की कोई कमी नही है। जमीन से सात आठ हाथ ही नीचे पानी निकल आता है। यहा पर शुद्ध दूध और घृत सुलभ है। और इस स्कूल के छात्र और अध्यापक स्वास्थ्य मे आश्चर्यजनक उन्नति करते देखे गये हैं। यहा का वातावरण शात और सुखद है।

यही ग्राम उपर्युक्त दोनो धनकुबेर सेठो की बचपन की क्रीड़ाभूमि रही है और इसीलिये इन महानुभावों को इस ग्राम से इतना प्रेम है।

## हाईस्कूल का पूर्व-रूप

कालाडेरे मे सन् १९३० से लगभग दस बारह वर्ष तक दोनो सेठो के सम्मिलित व्यय से एक वी एफ् मिडिल स्कूल तदनन्तर अंग्रेजी मिडिल स्कूल चलता रहा।

## हाईस्कूल बनाने का विचार

फत्तेपुर ( शेखावाटी ) मे जब अखिल भारतवर्षीय अग्रवाल महासभा हुई उस अवसर पर दोनों सेठ उसमे पधारे। आपस से मिले, प्रेम बढा और अपने ग्राम के प्रति भाव भक्ति बढी और

इन दोनो महानुभावो ने जो गोती भाई है इस मिडल स्कूल को हाईस्कूल बनाने का सकल्प ठाना और निज का भवन भी बनाने का विचार किया ।

## स्कूल की नींव

विचार ने मूर्त रूप धारण किया और सन १९४२ मे श्रीमत सेठ प्रतापजी महोदय के करकमलो से इस हाईस्कूल का शिलान्यास हुआ और इनकी दानवीरता और विद्या-प्रेम का परिचय इधर के लोगो को मिला। इस स्कूल बनाने का उद्देश यही रहा कि कालाडेरे की जनता तथा आस पास के लोगो मे विद्याप्रकाश फेले और ज्ञान का प्रचार हो। यह इन महानुभावो का सात्त्विक दान है कोई निज का स्वार्थ नही है। किसीने ठीक कहा है ' विद्यादान महादानम् । '

नींव लगते ही इसका प्लान तयार हुआ और कार्य द्रत गति से चालू हुआ। प्रारभ मे नासिक के महशूर इजिनियर मेहेदळे के देखरेख मे कुछ समय तक स्कूल के निर्माण का काम उन्नाति करता रहा। तदनन्तर श्री महावीरप्रसाद उपाध्याय तथा श्री रामनिवास सहारिया के निरीक्षण मे यह काम बहुत कुछ सम्पन्न हुआ। और सन् १९४७ मे हाईस्कूल कक्षा चालू हो गई और इसे राजपुताना विश्वविद्यालय से अस्थायी मान्यता मिल गई ।

## स्कूल-भवन तथा उसकी स्थिति

इस समय स्कूल का भव्य भवन स्वयं का है जिसकी लागत लगभग ढाई लाख है। यह स्कूल ग्राम की उत्तर दिशा मे स्थित है। ग्राम से लगभग दो फर्लांग दूरी पर यह बना हुआ है। इस स्कूल के निर्माण हेतु जयपुर सरकार की ओर से ३४ बीघा और ७ बिस्वा ( २७ एकड ) के लगभग भूमि नि शुल्क मिली हुई है। इस भूमि के प्राप्त करने मे दोनो सेठो को पूरा प्रयत्न करना पडा। और सर मिर्जा इस्माईल ने जो उस समय जयपुर के मत्री थे पुरी सहायता की और स्कूल के निमित्त भूमि मिल गई ।

इसके आसपास २५ बीघा जमीन है जिसमे दो पक्के कूए हे जहा छात्रो को कृषिकार्य की शिक्षा देने की योजना है और एक बगीचा भी लगाने का प्रयत्न किया जा रहा है। यहा ही विस्तृत खेलने के मैदान है ।

स्कूल का भवन दुमजला है। नीचे ऊपर की मजिल मे बारह बारह कमरे है। इनमे ८ कमरे ३०'×२०' और शेष १६ कमरे २४×'२०' के है। कमरे सब सुन्दर, हवादार, प्रकाशमय है। ऊपर के १२ कमरो में हाईस्कूल की कक्षाए छटी से दशवी तक बैठती है। नीचे के ६ कमरो मे प्राईमरी स्कूल की पहली कक्षा से पाचवी तक चलती हैं। और शेष नीचे के ६ कमरो मे छात्रावास का अस्थाई प्रबंध कर रखा है ।

## हेडमास्तर

इस हाईस्कूल के प्रथम हेडमास्तर श्री रामलाल गुप्त, बी ए , बी टी , हुए। कुछ कारणो से उन्हे शीघ्र ही हटाना पडा। इनके पश्चात् श्री केदार नाथ गुप्त, बी ए., बी टी , प्रधानाध्यापक हुए।

वेभी कुछ ही दिनो मे छोडकर चले गये। तत्पश्चात् श्रीगुरु प्रसाद अवस्थी, एम् ए, बी टी, इस पद पर आसीन हुए। वे लगभग तीन वर्ष रहे और उनके समय मे स्कूल ने कुछ उन्नति की। उनका अनुशासन स्तुत्य था। वेभी त्यागपत्र देकर विदेश अफ्रीका चले गये। इसके पश्चात् वर्तमान हेड-मास्टर लाला रामकिशोर, एम् ए, सी टी ने ता १५ जूलाई सन १९५० से इसका चार्ज लिया। ये गवर्नमेट सर्विस रिटायर्ड हैंड है और पूरे अनुभवी हैं। इनके समय मे इस स्कूल को राजपूताना विश्वविद्यालय की ओर से स्थाइ मान्यता मिली। गवर्नमेट एड ४८०० रु वार्षिक से १०८५० रु बढी। परीक्षा फल भी उत्तरोत्तर उत्तम होने लगा और छात्र सख्या मी पहले से ड्योढी हो गई। स्कूल का काम सुचारु रूप से चल रहा है।

## स्टाफ

इसमे कुल १३ अध्यापक और है जिनमें ५ ग्रेज्युण्ट है। भृत्यसख्या ७ है।

## छात्रसंख्या

छात्रसख्या कक्षा पहली से दसवी तक ३६५ है।

## वार्षिक बजेट

इस स्कूल का वार्षिक बजेट २४००० रु. का है।

## प्रबन्ध

इस स्कूल के इस समय मैनेजिंग प्रोप्रायटर रा ब सेठ श्रीरामेश्वर लाल सहारिया है। उनकी अध्यक्षता मे ही स्कूल का सब काम चल रहा है।

## ट्रस्ट

श्रीमत प्रतापसेठजी तथा रा ब सेठ श्रीरामेश्वर लालजी सहारिया ने इस स्कूल हेतु तीन लाख का ट्रस्ट जयपुर कोर्ट से रजिस्टर करा दिया है। इसके ट्रस्टीज ये ही महानुभाव और इनके उत्तराधिकारी हैं। इसका नाम "पी आर सहारिया हाईस्कूल कालाडेरा ट्रस्ट" है।

## फार्निचर तथा अन्य सामग्री

स्कूल मे भरपूर फर्निचर है। आवश्यक पठन पाठन की सब सामग्री है। पास में ही विस्तृत क्रीडास्थल है जहा छात्र वोली बॉल, फूट बॉल, बास्केट बॉल, कबड्डी आदि खेल खेलते हें। पुस्तकालय मे १६७१ पुस्तके भिन्न भिन्न विषय की है। और वाचनालय अनेक दैनिक, साप्ताहिक, पाक्षिक, मासिक, त्रैमासिक पत्रो से चलाया जा रहा हे।

## छात्रावास

इस स्कूल के छात्रावास मे ३५ छात्र है। और औसत व्यय भोजन आदि १८ रुपयेसे अधिक नहीं पडता है। छात्रो को मकान, रसोइयो और नोकर की सुविधा सेठो की ओर से नि शुल्क मिलती है।

## पाठन–विषय

इस स्कूल में हिन्दी, अंग्रेजी, गणित, सामान्य विज्ञान, सामाजिक ज्ञान, इतिहास, भूगोल, कृषि, वाणिज्य, संस्कृत आदी में शिक्षा दी जाती है।

## उपसंहार

यद्यपि दोनो कोटीश्वर सेठों के मस्तकों पर राजमुकुट नहीं है तथापि वहां की जनता इनमें से एक को 'खानदेश का राजा' और दूसरे को आसाम के 'चाय के बगीचो का बादशाह' कहती हैं। इनके धर्मार्थ कार्य परम प्रशंसनीय है। सर्वशक्तिमान् जगदीश्वर से प्रार्थना है कि ये दानवीर धर्ममूर्ति चिरंजीव हों और इनका वैभव-दिन दूना और रात चौगुना बढता रहे। इत्यलम्।



# प्रताप हॉस्पिटल

लेखक —रा ब डॉ. आर्. व्ही मोने

श्री ग म वाड, कार्यवाह, श्रीमत प्रतापशेठ अमृत-महोत्सव समिति, अमळनेर,
पूर्व खानदेश याना स न वि वि

आपल्या सूचनेप्रमाणे आपणाकड खा मे ॲ स ग सासायटी, अमळनेर, या संस्थे-संबधाने त्रोटक माहिती पाठवीत आहे ती अमृत-महोत्सव ग्रथात प्रकाशित करण्यास विनति आहे

## प्रस्तावना

सदर सस्था कशी उदयास आली हे प्रथम सागणे जरूर आहे श्रीमत प्रतापशेठजीची प्रवृत्ति प्रथमपासून शैक्षणिक, धार्मिक, सामाजिक वगैरे सस्थास मदत करण्याकडे असे त्याचे बालपण अत्यत गरिबीत गेले असल्यामुळे, त्याना गरिबास शिक्षणाचे बाबतीत किती अडचणी सोसाव्या लागतात व अत्यत बुद्धिमान असूनसुद्धा खाण्यापिण्याचे व आर्थिक मदतीचे अभावी स्वत ची प्रगति कशी करता येत नाही याची पूर्ण जाणीव होती, व त्याचा 'देनेकू अन्नदान, लेनेकू हरिनाम' या म्हणीवर विश्वास असल्यामुळे व्यापारात व गिरणीचे धद्यात पैसा मिळायला लागल्याबरोबर, प्रथम त्याना गरिबास अन्नदान करून सुखी करावे असे वाटे आणि म्हणून प्रथम ते गरिबास अन्नदान जास्त प्रमाणावर करीत असत त्यानतर त्याना विद्यादानाचे महत्त्व जास्त वाटू लागले व समाजातील तरुणाना योग्य वेळी उत्तम शिक्षण मिळाले तर त्याच्यातूनच उत्तम नागरिक व राष्ट्राचे महत्त्वाचे घटक निर्माण होतील, इतकेच नव्हे तर त्याना आपला चरितार्थ उत्तम रीतीने चालवावयास मदतहि होईल आणि म्हणून त्यानी १९१४ मध्ये एक स्वतत्र ट्रस्ट करून खानदेश-शिक्षण-मडळ स्थापन करून शिक्षणास मोठी मदत केली, व तत्पूर्वी येथे असलेल्या श्री भावे गुरुजी याच्या शाळेचे रूपातर प्रताप हायस्कूलमध्ये केले याच मडळाचे विद्यमाने येथील प्रताप कॉलेजाहि

चालविले आहे, व ते पुणे विद्यापीठातील कॉलेजापैकी एक आदर्श कॉलेज म्हणून प्रसिद्धीस आले आहे यानतर विद्येपैकी "अध्यात्मविद्या विद्यानाम्" असे वाटल्यावरून त्यानी येथील तत्त्वज्ञानमदिराची स्थापना इ स १९१६ मध्ये केली, व ते इडियन इन्स्टिटयूट ऑफ फिलॉसफी, अमळनेर, आज सर्व जगातील एक आदर्श सस्था म्हणून वाखाणले जात आहे

पुढे बरेच वर्षानी 'जे का रजले गाजले । त्यासी म्हणे जो आपुले ।' या तुकाराम महाराजान्या उक्तीप्रमाणे रोगपीडित, दीनदुबळे, व्याधिग्रस्त लोकाना मदत करणे, अन्नदान व विद्यादानापेक्षा अत्यत महत्त्वाचे आहे असे त्याच्या भूतदयाप्रेरित अत करणास वाटले, व वरील दोन्ही कार्यापेक्षा आरोग्यदान व प्राणदानाच्या महतीबद्दल त्याची खात्री होऊन या कार्याकरिता काहीतरी लवकर करावे असे त्यानी ठरविले

## सोसायटीची स्थापना

नतर त्यानी यासबधाने आपले मित्रमडळीत चर्चा करून खानदेश मेडिकल ॲड सर्जिकल एड सोसायटीची स्थापना ता २१–११–१९४० रोजी करून ती सोसायटीन्या रजिस्ट्रेशनन्या १८६० न्या २१ व्या ॲक्टान्वये नोदविली, व तिचे स्थापनेन्या वेळचे सभासद, उद्दिष्ट कार्य, कार्यकारी मडळ, कार्यपद्धति, निधि व तिच्या मालकीच्या सस्था, इमारती, जमीन व इतर मालमत्तेची व्यवस्था पाहणे वगैरे सर्व बाबीसबधाने नियम तयार करून ते छापवून नोदवून घेतले

रुग्णालये ही देवालयाइतकीच पवित्र समजली जातात, आणि म्हणूनच श्रीमतासारख्यान्या भूतदयेतून व मानवाबद्दल असलेल्या उत्कट सहानुभूतीतूनच धर्मार्थ रुग्णालयासारख्या सस्था अस्तित्वात येतात श्रीमतानी या सस्थेन्या द्वारा आपल्या खानदेशातूनच नव्हे, तर हिंदुस्थानातील कोणत्याहि भागातून या दवाखान्यात औषधोपचाराकरिता अगर शस्त्रक्रियेकरिता कोणत्याहि जातीचा, धर्माचा अगर पथाचा रोगी आल्यास त्यास योग्य औषधोपचार झाला पाहिजे अशी योजना सस्थेन्या नियमात करून ठेवली आहे सर्व रोग्याना अत्यत प्रेमाने व आपुलकीने वागविले पाहिजे, रोग्याची सेवा ही परमेश्वराचीच सेवा असे मानून कार्य केले पाहिजे, या त्यान्या अपेक्षेप्रमाणे हल्ली प्रताप धर्मार्थ दवाखान्यात सर्व रोग्याची शुश्रूषा अत्यत प्रेमाने व आस्थेने केली जाते

अलीकडे गेल्या १०० वर्षात पाश्चात्य वैद्यकशास्त्रात इतकी प्रगति झाली आहे की, काही वर्षापूर्वी ज्या रोगासंबंधाची काहीं माहिती नव्हती व जे रोग बरे होणे अशक्य वाटत होते, ते रोग आता सहज बरे होतात कारण त्याची कारणे, निदान, चिकित्सा या बाबतीत उत्कृष्ट सशोधन होत असून वैद्यकशास्त्रात क्राति घडून आली आहे या सर्व परिस्थितीचा विचार करून व आपल्या काही स्नेहीमंडळीशी विचारविनिमय करून श्रीमतानी खा मे ॲ स ए सोसायटीन्या ॲलोपाथी विभागास प्रथम १२॥ लाख रुपयाची देणगी दिली व दवाखान्याकरिता सुमारे २६ एकर जागा अदमासें ३०,००० रुपयास विकत घेतली, व या विभागास 'प्रताप चॅरिटेबल हॉस्पिटल' असे नाव देण्यात आले

सुमारे १९३५ साली अमळनेर मुक्कामी सिल्व्हर ज्युबिली प्रसूतिगृह काढण्याची कल्पना येथील काही सद्गृहस्थाना सुचली होती, व त्याकरिता त्यानी १८ ते २० हजार रुपये फड जमविला

होता, व त्या फंडासहि श्रीमतानी ७ हजार रुपये दिले होते पण एवढ्याशा रकमेत प्रसूति-गृहाची नुसती इमारतसुद्धा बाधणे अशक्य होते, आणि जरी लहानशी इमारत बाधली असती तरी त्या प्रसूतिगृहाचा सालोसालचा खर्च सुमारे ६-७ हजार मिळविणे अगदीच अशक्य होते अशा परिस्थितीत सिल्व्हर ज्युबिली मॅटर्निटी कमिटीचे अध्यक्ष व जिल्हाधिपति व कमिटीचे सभासद यानी श्रीमताना विनति केल्यावरून त्यानी सदर मॅटर्निटी हॉस्पिटलची इमारत बाधण्याचे कार्य व तिचा दरसालचा खर्च खा मे ॲ स ए सोसायटीचे मार्फत करण्याचे आश्वासन दिले, आणि म्हणून या सस्थेतील स्त्री-विभागास ‘श्रीमती सौ भागीरथी प्रतापशेठ स्त्रीरोग चिकित्सालय व प्रसूतिगृह’ असे नाव देण्यात आले आहे

## इमारती व इतर साहित्य

प्रथम खा मे ॲ स ए सोसायटीने मुबई, पुणे वगैरे ठिकाणच्या नामवंत, निष्णात व अनुभवी डॉक्टर व इजिनिअर याचे सल्ल्याने व श्री करमरकर इजिनिअर याचे मदतीने दवाखान्याच्या इमारतीचे प्लॅन व एस्टिमेट तयार करून घेतले व ते मुबई इलाख्याचे त्या वेळचे सर्जन जनरल Col R H Candy, I M S याचेकडून पास करवून आणले तदनतर लगेच—

(१) स्त्रीरोग चिकित्सालय व प्रसूतिगृह
(२) पुरुषाचे विभागात रोगी राहण्याकरिता लागणाऱ्या इमारती व इतर काही भाग
(३) विहीर
(४) पाण्याची टाकी, तिचेखालील ३ खोल्या
(५) रसोडा
(६) दोन भगी कार्टर्स वगैरे इमारती बाधून झाल्यावर सर्व प्रकारच्या शस्त्रक्रियेस व औषधोपचारास अत्यत जरूर ती उपकरणे व औषधे मागून घेतली

## दवाखान्याचें उद्घाटन

अशा रीतीने अगदी जरूर त्या इमारती व इतर साहित्य तयार झाल्याबरोबर ता. १७-११-४४ रोजी मेडिकल खात्याचे मत्री श्री डॉ एम डी डी, गिल्डर, एम डी, एफ् आर सी एस् याचे हस्ते दवाखान्याचे उद्घाटन करून घेतले व कार्यास सुरुवात झाली

प्रारभी ३ वर्षे दवाखान्याचे प्रमुख सी एम ओ म्हणून डॉ ना वि म्हस्कर एम बी, बी एस्, यानी काम केले व त्याचे नतर फक्त ३ महिन्याकरिता डॉ मलकानी एम बी बी एस् याची नेमणूक त्याचे जागी केली होती व ता १६ फेब्रुवारी १९४८ पासून रा ब डॉ रा व्य मोने M R C S (Eng) L R C P (Lond) D T M (Liv) L M (Dub) F C P S (Bom), निवृत्त सिव्हिल सर्जन हे या सस्थेचे प्रमुख (सी एम ओ) म्हणून काम करीत आहेत

तदनतरहि हळूहळू इतर जरूर त्या इमारती १९४८ पर्यतच्या ३ वर्षात बाधण्यात आल्या

प्रथम (१) औट-डोअर
(२) सी एम ओ चा बंगला
(३) तीन लहान सव्हेंट कार्टर्स
(४) दायाचे वसतिगृह व
(५) चार स्पेशल रूम्स

## १९४८ सालानंतरच्या इमारती

( १ ) स्पेशल रूमच्या वरच्या चार खोल्या
( २ ) धर्मशाळा
( ३ ) सोळा खोल्यांच्या मध्यम व कनिष्ठ नोकरलोकांचे वसतिगृह
( ४ ) दायांचे वसतिगृहाची दुरुस्ती
( ५ ) इतर मेडिकल ऑफिसरांचे वसतिगृह
( ६ ) सी एम ओ चा नवीन बंगला
( ७ ) कंपौंडच्या मोठ्या दरवाजाची कमान व रस्त्याकडील कंपौंड भिंती बांधण्यात आल्या

आतापर्यंत इमारती व इतर बांधकामाकरिता जवळ जवळ १० लाख रुपये खर्च झाले आहेत, व आता धोन्याकरिता ड्रॉइंग शेड व भंग्यांच्या करिता आणखी काही खोल्या बांधावयाच्या आहेत अशा रीतीने हा दवाखाना सर्व तऱ्हेने सुसज्ज व एक आदर्श संस्था म्हणून प्रसिद्धीस आला आहे

## दैनंदिन कार्यक्रम

### प्रताप धर्मार्थ दवाखान्यांतील दैनंदिन कार्यासंबंधी त्रोटक माहिती

दवाखान्याचे कामास उन्हाळ्यात ७। वाजता व हिंवाळ्यात ७॥। वाजता सुरुवात होते प्रथम सर्व विभागातील नोकरवर्ग एके ठिकाणी रांगेत उभे राहून प्रार्थनेचे १० श्लोक म्हणण्यात येतात ते वॉर्डातील डॉक्टर अगर प्रमुख नोकरांनी सांगायचे व इतरांनी म्हणायचे अशी पद्धत आहे श्लोक करुणा व भक्तिप्रधान असून त्यात नीतितत्त्वे व परमेश्वराची स्तुति आहे सर्व इच्छित वस्तूंचे प्राप्तीबद्दल त्याची करुणा भाकली आहे ही प्रथा सुरू केल्यापासून सर्व नोकरलोकांचे त्याचप्रमाणे रोग्यांचे मनावर नीतितत्त्वे, भक्ति, विनय, शिस्त, आज्ञाधारकपणा, परमेश्वरावर विश्वास व प्रेम या गुणांचा चांगलाच पगडा बसून नोकरांची रोग्यांशी वागणूक अत्यंत सभ्य, विनयशील व उपकारक अशी बनलेली दिसते

दवाखान्यातील रोग्यांचे मनोरंजन व करमणुकीकरिता रेडिओ व लाऊड स्पीकरची योजना केली असून, रोज सकाळी मंगलध्वनि, आराधना, प्रभातवंदना व संगीत इत्यादि कार्यक्रम ऐकविले जातात

प्रत्येक वरिष्ठ, मध्यम व कनिष्ठ नोकरांचे कर्तव्याबद्दल सविस्तर नियम केले असून त्यांची कर्तव्ये त्यास नीट समजावून दिली असल्यामुळे त्यात त्यांचेकडून हयगय होत नाही व सर्व कामे सुरळीत चाललेली असतात डॉक्टर्स, नर्सेस, वॉर्ड बॉईज, दाईज, आया, मेहेतर्स वगैरे सर्व लोक कामावर वक्तशीर हजर राहतात व त्यांचेकडून रोग्यांना योग्य मदत मिळून त्यांना पूर्ण समाधान लाभते, आणि जाताना त्यांचा एकंदर नोकरवर्ग व दवाखान्याबद्दल चांगला ग्रह होऊन व त्यास लवकर आरोग्य लाभून ते आनंदात घरी जातात अशा तऱ्हेने हा दवाखाना आजूबाजूचे प्रांतातील लोकादरास पात्र झाला आहे

## औट-पेशंट विभाग

आमच्या औट-पेशट विभागात

( १ ) एक्स - रे ( क्ष-किरण )
( २ ) पॅथॉलजी लॅबोरेटरी ( सप्राप्ति )
( ३ ) इजेक्शन रूम
( ४ ) अल्ट्रा-व्हायोलेट व इन्फ्रारेड ट्रीटमेटची रूम
( ५ ) डोळ्याचे खास रोगी तपासण्याची खोली
( ६ ) पुरुषरोगी तपासण्याची खोली
( ७ ) स्त्रीरोगी तपासण्याची खोली
( ८ ) ड्रेसिंग रूम
( ९ ) औषध तयार करून देण्याची खोली ( डिस्पेन्सरी )
(१०) मेडिकल स्टोअर
(११) ऑफिस, असे निरनिराळे पोटविभाग आहेत

## क्ष-किरण ( एक्स-रे ) विभाग

१ आमचे येथील क्ष-किरणाचे मशीन व लागणारे सर्व सामान, पेपर, डेव्हलपिंग व फिक्सिंग सोल्युशन अत्यत उच्च प्रतीचे असल्यामुळे येथील प्लेट्स, फिल्म्स, क्ष-किरण छायेचे रिपोर्ट स्पष्ट, सविस्तर व अचूक असेच असल्यामुळे पुष्कळदा दुसरीकडे फोटो घेतला तरी आमचेकडून रोगी तो पुन्हा काढून घेतात प्रत्येक जिल्ह्याचे ठिकाणी एक्स-रे मशीन असूनसुद्धा तेथील पुष्कळ लोक येथेच क्ष-किरण प्रतिमा काढून घेण्याकरिता येतात आमचे मशीन ता २७-३-४६ रोजी विकत घेतले आहे, व ते बसवून घेण्याकरिता वगैरे मिळून एकदर ३१००० रुपये खर्च करण्यात आला आहे दरवर्षीचा छाया व प्रतिमाचा नबर वाढतच जात आहे १९५२-५३ साली तो १००७ होता त्यापैकी निम्मे काम अगदी मोफत केले जाते

## संप्राप्ति ( पॅथॉलॉजी ) विभाग

१ पॅथॉलॉजी लॅबोरेटरीमध्ये रक्त, थुकी, निरनिराळ्या ठिकाणचे स्राव, शौच वगैरे तपासण्याची व्यवस्था असून येथे हल्ली दरवर्षी सुमारे ४०० प्रकारचे स्राव, रक्त वगैरेची तपासणी करण्यात येते व त्यातील तीनचतुर्थांश हिस्सा काम मोफत केले जाते

२ क्ष-किरण विभागात व सप्राप्ति (पॅथॉलॉजी) विभागात काम करण्याकरिता यदापासून एक स्पेशल ऑफिसर नेमला आहे, व त्यास क्ष-किरणाच्या डी एम आर ई च्या कोर्सकरिता मुबईस पाठविण्यात आले आहे तो एक वर्षानतर परत आल्यावर या दोन्ही विभागात प्रवीण अथवा स्पेशालिस्ट म्हणून काम करणार आहे या सस्थेत येण्याचे पूर्वी त्यानी इदुरास डॉ मुकर्जी, एम डी, एम आर सी पी याचे वॉर्डात हाऊस सर्जन व पॅथॉलॉजिस्ट म्हणून २ वर्षेपर्यंत स्पेशल काम केले आहे शिकत असताना त्यास दरमहा २०० रुपये स्टायपेड देण्यात आली आहे तूर्त क्ष-किरण विभागात श्री रा के कुलकर्णी हे टेक्निशियन म्हणून काम करतात क्ष-किरण प्रतिमाचे अगर छायेचे वर्णन सी एम ओ रा ब डॉ मोने, M R C S ( Eng ) F C P S (Bom) अगर ए सी एम् ओ डॉ कर्वे, एम एस् ( बॉम्बे ) लिहितात

## पुरुषरोगी

३ पुरुषाचे बाह्यरुग्ण डॉ लुकतुके, R M O हे पाहतात व त्यास जरूर वाटेल त्या रोग्याची तपासणी सी एम् ओ अगर ए सी एम् ओ याचेकडून करून घेतात

## स्त्रीरोग

४ स्त्री बाह्यरुग्ण, लेडी डॉक्टर मिस् वेदान्त या तपासतात व अवघड महत्त्वाचे व समजण्यास कठीण असे रोगी त्या सी एम ओ कडे पाठवितात, व त्याचे सल्लयाने अशा रुग्णास औषधोपचार केला जातो

## नेत्ररोगी

५ डोळ्याचे रोगी सी एम् ओ व आर एम् ओ पाहतात, व त्याना योग्य तो इलाज करतात ऑपरेशनने बरे होणाऱ्या रुग्णास दवाखान्यात ठेवून घेऊन त्यावर शस्त्रक्रिया करतात

रोजचे सुमारे २०० ते ३०० बाहेरून येणारे रोगी तपासावे लागतात व एका वर्षात अदमासे ६०००० रोगी पाहिले जातात ज्याचे मासिक उत्पन्न रु ९० पेक्षा कमी असेल अशा सर्व गरीब लोकाना वैद्यकीय सल्ला व औषधोपचारहि अगदी मोफत केला जातो ऐपतदार लोकाना मात्र इजेक्शने व शस्त्रक्रियेबद्दल त्याचे उत्पन्नाप्रमाणे अगदी माफक चार्ज केला जातो.

## इंजेक्शन विभाग

६ औट-डोअरच्या इजेक्शन विभागात रोज सरासरी १०–१५ निरनिराळ्या प्रकारची इजेक्शने दिलीं जातात व तीं एका वर्षात अदमासे एकूण ४००० पर्यंत होतात त्याचप्रमाणे वॉर्डात इन्-डोअर पेशटकरिता रोज ८–१० पर्यंत इजेक्शने देण्यात येतात, व याप्रमाणे वॉर्डात दरवर्षी २५०० पर्यंत इजेक्शने देण्यात येतात अशी सर्व दवाखान्यात वर्षातून एकदर सुमारे ६५०० इंजेक्शने देण्यात येतात त्यापैकी ४००० अगदी मोफत दिली जातात औट-डोअरच्या इजेक्शन विभागात श्री रा के कुळकर्णी, सार्जिकल असिस्टट, हे मुख्यत काम करतात पण ते ऑपरेशन थिएटरमध्ये कामात असल्यास औट-डोअरमध्ये असलेले कोणीहि डॉक्टर येथे इजेक्शनचे काम करतात

## अल्ट्रा-व्हायोलेट विभाग

७ अल्ट्रा-व्हायोलेट अगर इन्फ्रारेडचे विभागातहि श्री कुळकर्णी याचेच देखरेखीखाली काम केले जाते

## जखम धुण्याची खोली ( ड्रेसिंग रूम )

८ औट-डोअरमध्ये जखम धुण्याकरिता व लहान शस्त्रक्रिया करण्याकरिता एक स्वतत्र ड्रेसिंग रूम आहे तेथील सर्व काम आर. एम् ओ याचे देखरेखीखाली एक वॉर्ड बॉय व नर्स करतात.

## डिस्पेन्सरी

९ डॉक्टर लोकानी रोग्यास लिहून दिलेली औषधे एका स्वतत्र खोलीत दोन कपोडर्स करतात व पुरुष व स्त्री-रोग्यास निरनिराळ्या खिडकीतून औषधे देण्यात येतात

## मेडिकल स्टोअर

१० मेडिकल स्टोअरमध्ये एक स्वतत्र कपौडर औषधी आल्याबरोबर तपासून घेतात व त्याची लगेच औषधान्या रजिस्टर पुस्तकात नोद करतात ज्या ज्या वेळी तेथून काही औषधे दवाखान्याचे निरनिराळे विभागात त्याचे मागणीप्रमाणे, सी एम् ओ चे सहीने समति मिळाल्यावर दिली जातात त्या त्या वेळी त्याची पुस्तकात नोद करून रोजन्या रोज हिशोब ठेवला जातो

## ऑफिस

११ ऑफिसमध्ये एक हेडक्लार्क व एक असिस्टट क्लार्क काम करतात

## जमाखर्च

हॉस्पिटलमधील निरनिराळ्या विभागातील सर्व जमेच्या व खर्चान्या व्यवहाराचा हिशोब तेथे ठेवला जातो दररोजची जमा त्याच दिवशी खा मे अॅ स एद् सोसायटीकडे पाठविली जाते, व खर्चाकरिता आणलेली रकम व चेक्स् ताबडतोब ज्याचे त्यास देऊन त्याची पावती घेतली जाते या सर्व जमेन्या व खर्चान्या व्यवहाराची नोद रोजचे रोज रजिस्टर बुकात केली जाऊन त्यावर सी एम् ओ याची सही होते, व पावत्या, व्हाऊचर्सच्या स्पेशल फाइलमध्ये नबरवारीने त्यावर पेड शिक्क्याखाली सी एम् ओ ची सही झाल्यावर ठेवल्या जातात

## हॉस्पिटलच्या स्टोअरची व्यवस्था

हॉस्पिटलकरिता लागणाऱ्या वस्तु ( कापड, तयार कपडे, स्टेशनरी, औषधी, शस्त्रे, उपकरणे, डेडस्टॉक ) आल्याबरोबर ताबडतोब त्यापासून त्याची निरनिराळ्या रजिस्टर बुकात नोद केली जाते, व त्याचप्रमाणे वस्तु निरनिराळ्या विभागात इडेटप्रमाणे दिल्या जाताना त्याची नोद पण यातच केली जाऊन रोजची शिल्लक दाखविली जाते

## हॉस्पिटलचा पत्रव्यवहार

हॉस्पिटलसबधीचा आलेला पत्रव्यवहार सी एम ओ स्वत रोजचे रोज पाहतात व त्याची उत्तरेहि ताबडतोब दिली जातात व त्याची नोदहि करण्यात येते

## रजिस्टरे व फाइल्स

वरील सर्व होणाऱ्या व्यवहाराकरिता एकूण ६५ रजिस्टरे व ३५ फाइल्स ठेवली असून ती अपटुडेट ठेवली आहेत, व ती ऑडिटर यानी तपासून ती बरोबर, शिस्तवार व अचूक असल्याबद्दलचा त्याचा दरसालचा मिळालेला शेरा पण स्पेशल पुस्तकात नोदला आहे वरील व्यवस्थेमुळे व प्रत्येक जिनसेचा अचूक हिशेब ठेवल्यामुळे कोठेहि अफरातफर होणे शक्य नाही.

## बिछान्यांची विभागणी

दवाखान्यात राहणाऱ्या लोकाकरिता **बिछान्यांची विभागणी** खालीलप्रमाणे केली आहे

### स्त्री–विभाग

या दवाखान्यात **स्त्रियांचे विभागांत** एकंदर ३२ बेड्सची व्यवस्था केली आहे त्याची वर्गवारी खालीलप्रमाणे आहे —

| | |
|---|---|
| ( १ ) प्रसूति करण्याचा बेड | १ |
| ( २ ) प्रसूति झालेल्या स्त्रियाकरिता | १२ |
| ( ३ ) सात वर्षांचे आतील मुलाकरिता | ५ |
| ( ४ ) डोळ्याचे रुग्णाकरिता | ४ |
| ( ५ ) स्त्रियाचे खास रोगाकरिता | ५ |
| ( ६ ) सर्वसाधारण रोगाचे स्त्रियाकरिता | ५ |
| एकूण | ३२ |

याशिवाय पुष्कळ वेळा व्हराड्यात जास्त बिछाने टाकावे लागतात

### पुरुष–विभाग

**पुरुषांचे विभागांतील** बिछान्याचे वर्गीकरण खालीलप्रमाणे आहे —

| | |
|---|---|
| ( १ ) डोळ्याचे रोग्याकरिता | ६ |
| ( २ ) शस्त्रक्रिया लागणारे रोग्याकरिता | २१ |
| ( ३ ) औषधोपचाराने बरे होणाऱ्या रोग्याकरिता | ११ |
| ( ४ ) सात वर्षांचे वरील मुलाकरिता | ४ |
| ( ५ ) स्पेशल खोल्या | ८ |
| एकूण | ५० |

याप्रमाणे दोन्ही विभागात एकंदर ८२ बिछान्याची व्यवस्था आहे

### वसतिगृहें

**सर्व डॉक्टर्स व इतर बहुतेक नोकरवर्गाकरितां वसतिगृहे** या आवारातच बांधलेली असल्यामुळे कोणत्याहि वेळी आकस्मित येणाऱ्या रुग्णास वैद्यकीय इलाज व शस्त्रक्रिया करणे झाल्यास त्याना ताबडतोब हजर होता येते व रोग्याची कुचबणा होत नाही एवढेच नव्हे, तर नोकर-वर्गानाहि सर्व तऱ्हेने सुसज्ज अशा जागात राहण्याची सोय झाली आहे

संस्थेत हल्ली काम करीत असलेल्या **डॉक्टर लोकांची नांवें.**

### डॉक्टर्स

( १ ) चीफ मेडिकल ऑफिसर व प्रमुख सर्जन, रा ब डॉ आर व्ही मोने, एम आर सी एस (इंग्लंड), एल् आर सी पी (लंडन), डी टी एम् (लिव्हरपूल), एल एम् (डब्लिन), एफ् सी पी (मुंबई) रिटायर्ड सिव्हिल सर्जन

(२) आसि सी एम ओ दुय्यम सर्जन, डॉ जी व्ही कर्वे, एम एस् (मुबई)

(३) आर एम ओ डॉ सी एस् लुकतुके, एल् एम पी (सी पी) बी ए (ऑनर्स)

(४) लेडी हाऊस सर्जन, डॉ मिस वेदान्त, एल् सी पी एस् (मुंबई)

(५) हाऊस सर्जन डॉ के आर ओक, एल एम पी (सी पी)

(६) आसिस्टट सर्जन, डॉ एस् एम काटदरे, एम बी बी एस् (आग्रा) याना डी एम आर ई कोर्सकारिता मुबईस पाठविले आहे

## इतर नोकरवर्ग

(१) सर्जिकल आसिस्टट— श्री रा के कुलकर्णी हे मुख्यत शस्त्रदालनातील शस्त्र-क्रियेच्या पूर्वतयारीवर देखरेख करून, शस्त्रक्रियेस लागणारी हत्यारे, उपकरणे, सर्जनना पुरवितात त्याना मदतनीस म्हणून एक कपौडर श्री ऊर्ध्वरेषे काही वेळ शस्त्रदालनात काम करतात

| | |
|---|---|
| (२) मिडवाईफ्ज् | ३ |
| (३) क्लार्क्स् | ३ |
| (४) कपौडर्स | ३ |
| (५) आसिस्टट मिडवाईफ | १ |
| (६) एजिन ड्रायव्हर | १ |
| (७) दाया | ६ |
| (८) थिएटर बॉय | १ |
| (९) वॉर्ड व औटपेशट बॉईज | ८ |
| (१०) ऑफिस प्यून्स | २ |
| (११) धोबी | १ |
| (१२) आया | ४ |
| (१३) आचारी | १ |
| (१४) मेडसव्हट | १ |
| (१५) माळी | १ |
| (१६) कूली | १ |
| (१७) इलेक्ट्रिक वायरमन | १ |
| (१८) पहारेकरी | १ |
| (१९) मेहेतर्स | ६ |
| एकूण | ५२ |

असे एकूण हॉस्पिटल स्टाफमध्ये **५२ लोक आहेत**

येथील मुख्य डॉक्टर्सहि उच्च शिक्षण घेतलेले व अनुभविक असल्यामुळे सर्व प्रकारच्या रोगाची चिकित्सा व शस्त्रकर्मे योग्य रीतीने केली जातात, आणि त्यामुळे लाबलाबचे जिल्ह्यातून

रोगी येथे खास उपचाराकरिता येतात आमचे येथील रा ब डॉ मोने यानीं नेत्ररोगचिकित्सा व शस्त्रक्रिया याचा खास अभ्यास केला असल्यामुळे येथे नेत्ररोगाचे रुग्णासहि योग्य तो इलाज केला जातो, व येथील नेत्र शस्त्रकर्मेंहि यशस्वी रीतीने केली जातात नेत्ररोगाचे रुग्ण रोज तपासले जाऊन त्याना इलाजहि त्वरित केला जातो व शस्त्रक्रिया लागणाऱ्या रुग्णास ताबडतोब दवाखान्यात ठेवून घेऊन दुसरेच दिवशी त्याचे डोळ्यावर शस्त्रक्रिया केली जाते गेल्या वर्षात चोपडा येथे झालेल्या नेत्रदान यज्ञामध्ये त्यानी व याच दवाखान्यात नेत्रशस्त्रक्रियेत तयार झालेले डॉ लुकतुके यानी प्रामुख्याने भाग घेतला होता, व तेथील शस्त्रक्रिया यशस्वी झाल्या हे नमूद करण्यास आम्हास आनद होत आहे

## पुरुषरोग-चिकित्सा

पुरुष-विभागांत ७ वर्षावरील मुले अगर पुरुष रोगी ठेवतात व त्या विभागातील रुग्णाची तपासणी, चिकित्सा अगर शस्त्रकर्मे १९५३ सालापर्यंत सी एम ओ रा ब डॉ मोने हेच पहात असत परंतु तदनतर, डॉ कर्वे, एम एस्, याचेकडे सोपवली आहेत फक्त जे रोगी खास डॉ मोने याचेकडूनच चिकित्सा व शस्त्रक्रिया करून घेण्याऱ्या उद्देशाने आले असतील तेवढ्याचीच चिकित्सा हल्ली ते करतात

## नेत्ररुग्णांची चिकित्सा

त्याचप्रमाणे डोळ्याचे सर्व रुग्णाची चिकित्सा व शस्त्रकर्मे बरीच त स्वत करतात व काही त्याचे देखरेखीखाली केली जातात

## सांधे व अस्थिरोगचिकित्सा

त्याचप्रमाणे डॉ कर्वे याचेकडे दवाखान्यातील साधे अगर अस्थिसबधी सर्व रोग्याची चिकित्सा करण्याचेहि कार्य सोपविले आहे त्याचे विभागात त्याना मदतनीस म्हणून डॉ ओक याची हाऊस सर्जन म्हणून नेमणूक केली असून, त्याशिवाय त्या विभागात २ नर्सेस, ४ वॉर्डबॉईज व ३ मेहेतर्स कामाकरिता नेमले आहेत

## शस्त्रदालन ( ऑपरेशन थिएटर )

याच विभागात शस्त्रकर्मे करण्याकरिता एक शस्त्रदालन ( ऑपरेशन थिएटर ) बाधले असून त्यातच सर्व प्रकारच्या मोठ्या शस्त्रक्रिया केल्या जातात शस्त्रदालन सर्व प्रकारच्या उपकरणानी ( शॅडोलेस लॅंप, स्पॉटलाइट वगैरेनी ) सुसज्ज असून तेथे खास शिक्षण घेतलेले सर्जिकल मदतनीस व एक नोकर शस्त्रक्रियेची पूर्वतयारी करण्याकरिता नेमले आहेत रोज सुमारे ७॥ वाजता शस्त्रक्रियेची पूर्वतयारी करण्यात येते व ८-८॥ वाजता शस्त्रक्रियेस सुरुवात होते दरवर्षी सुमारे १००० चे वर लहानमोठ्या शस्त्रक्रिया या दालनात यशस्वी रीतीने केल्या जातात

## प्रसूति व स्त्रीरोग-चिकित्सा

स्त्रीविभागात प्रसूतिकरिता येणारे स्त्रीरोगी, ७ वर्षाचे खालील मुले, डोळ्याचे स्त्रीरोगी, त्याचप्रमाणे खास स्त्रीरोग असलेले स्त्री रोगी ठेवले जातात त्या विभागातील रोग्यास औषधोपचार,

चिकित्सा व शस्त्रक्रिया येथील सी एम् ओ. रा ब डॉ मोने हेच करतात ते मुख्यत प्रसूति-तत्राचा व स्त्रीरोग-चिकित्सेचा खास अभ्यास विलायतेत करून तेथील पदवी घेऊन आले असल्या-मुळे व या इलाख्यातील ९ जिल्ह्यात सिव्हिल सर्जनचे काम करीत असताना त्याना स्त्रीरोग-चिकित्सेचा बराच अनुभव मिळाला असल्यामुळे स्त्री-रोगाचे रोगी येथे जास्त प्रमाणात व लाबलाबून येऊन त्याचे ज्ञानाचा फायदा घेतात या विभागातील पुष्कळ रुग्णावर शस्त्रकर्में करून काढलेले रोगाचे बरेच नमुने दवाखान्यात जतन करून ठेवले आहत त्यावरून त्याचे कार्याची सहज कल्पना येण्यासारखी आहे त्या विभागात त्याचे हाऊस-सर्जन म्हणून डॉ वेदान्त या काम करतात त्यानी-हि येथे येण्यापूर्वी अहमदाबाद, मुबई वगैरे ठिकाणी स्त्रियाचे प्रसूतीचे दवाखान्यात काम केले असल्याभुळे, त्याच प्रसूतीचे दैनदिन काम पाहतात त्या विभागात त्याचे मदतीस २ मिडवाइफ्ज्, ६ दाया, ४ आया, ३ मेहेतराणी कामाकरिता नेमल्या आहेत या विभागात प्रसूतिकरिता एक खास सुसज्ज अशी खोली ठेवली असून, त्या ठिकाणी सर्व प्रसूति केल्या जातात प्रत्येक प्रसूतीची केस लेडी हाऊस सर्जन पाहतात व काही अडचण असल्यास रा ब डॉ मोने याचा सल्ला घेऊन योग्य ती चिकित्सा करण्यात येते अशा रीतीने दरवर्षी प्रसूतीस येणाऱ्या स्त्रियाचा नबर वाढत आहे गेल्या वर्षी तो २६० होता व त्यापैकी सुमारे ५५ स्त्रियाना थोड्याफार प्रमाणात शस्त्रक्रिया कराव्या लागल्या स्त्रियान्च्या खास शस्त्रक्रिया अगर प्रसूतिसबधाच्या मोठाल्या शस्त्रक्रिया मात्र पुरुष विभागात असलेल्या शस्त्र-दालनातच केल्या जातात अशा रीतीने दरवर्षी स्त्रियावर सुमारे २४० शस्त्रक्रिया केल्या जातात

## प्रवेशित रोग्यांकरितां कपडे, औषधी वगैरे सामुग्री

सर्व विभागात लागणारे कपडे, औषधी साहित्य, सामान्य शस्त्रक्रियेची उपकरणे, इजेक्शने वगैरे सर्व सामुग्री त्या त्या विभागात कपाटात ठेवली असून, ती तेथील हाऊस सर्जन व नर्सेस याचे ताब्यात असते या सर्व सामानाचे योग्य हिशोब ठेवले असून सर्व सामानाची मोज व तपा-सणी दर ३ महिन्यानी आर एम् ओ व हाऊस सर्जन यानी केल्यावर सर्व हिशोबाची तपासणी सी एम् ओ ही करतात त्यामुळे सर्व हिशोब चोख राहून कोणत्याहि तऱ्हेची सामानाची अफरातफर होत नाही

## रुग्णांचे आहार

दवाखान्यातील गरीब व परगावचे रोग्याकरिता जेवण व खाद्य पदार्थ दवाखान्यातील आवारात बाधलेल्या रसोड्यात गुजराथी आचाऱ्याकडून तयार केले जाते, व ते तेथून पुरुषाचे व स्त्रियाचे विभागात खास नेमलेल्या नोकराकडून वाटण्यात येते, व त्यावर त्या त्या विभागातील परिचारिकेकडून देखरेख करण्यात येते अशा रीतीने ५ प्रकारचे आहार —( १ ) पूर्ण आहार, ( २ ) मध्यम आहार, ( ३ ) दूधभात, ( ४ ) दूध, ( ५ ) साबुदाणा, काजी वगैरे – रोग्याचे परिस्थितीप्रमाणे, डॉक्टर्सनी योग्य म्हणून ठरविल्याप्रमाणे दिले जातात याशिवाय आणखी काही खाद्य पदार्थ, उदाहरणार्थ, केकर ओट्स्, कॉफी, चहा, फळाचा रस, ओव्हलटीन व इतर पेटट खाद्य-

वस्तु डॉक्टराचे आज्ञेप्रमाणे वॉर्डातील नर्सेस तेथेच तयार करून रोग्याना देतात दरवर्षी या आहारा-प्रीत्यर्थ सुमारे ६५०० रु पर्यंत खर्च येतो

## पाणीपुरवठा

दवाखान्यातील रोग्यास व दवाखान्यातील साफसफाईकरिता लागणाऱ्या पाण्याचा पुरवठा कपौंडात असलेल्या विहिरीतील पाणी पप करून ४५ फूट उचीवर बाधलेल्या टाकीत साठविले आहे त्यातून केला जातो

## ड्रेनेज

ड्रेनेज अंडरग्राऊंड असून पाण्याचे योगाने मैला व साडपाणी मोठाल्या मोऱ्याच्या नाकातून सेप्टिक टॅकमध्ये नेले जाते व तेथून त्याचा उपयोग दवाखान्यातील शेतीकरिता केला जातो.

सर्व बाबतीत दवाखान्यास लागणारा किमान खर्च खालील तक्त्यात लिहिल्याप्रमाणे होतो त्यावरून दवाखान्याचे एकदर वार्षिक अदाजी खर्चाचा आढावा सहज लक्षात येईल

## वार्षिक अंदाजी खर्च

| | रु आ पै |
|---|---|
| (१) नोकरवर्ग खाते | ७००००–०–० |
| (२) औषधाची किमत | १५०००–०–० |
| (३) सर्जिकल खर्च | ६०००–०–० |
| (४) रुगणाचा अन्नखर्च | ६५००–०–० |
| (५) एक्स-रे खर्च | १४००–०–० |
| (६) क्लोदिंग खर्च | २०००–०–० |
| (७) रिपेअर्स | १०००–०–० |
| (८) प्रिंटिंग | ३५०–०–० |
| (९) पोस्टेज | १००–०–० |
| (१०) स्टेशनरी व सादील खर्च | १२००–०–० |
| (११) फर्निचर रिपेअर | ५००–०–० |
| (१२) दिव्याचा खर्च | ३१५०–०–० |
| (१३) वॉटरपप व सेप्टिक टॅक | २८५०–०–० |
| (१४) बगीचा खर्च | १०००–०–० |
| (१५) डेडस्टॉक | १२००–०–० |
| (१६) धुणावळ | ५०–०–० |
| (१७) जनरल प्रॉपर्टी टॅक्स | ७००–०–० |
| | १,१३०००–०–० |

## दवाखान्याचा वाढता खर्च

नोकरलोकाचे पगार श्रेणीप्रमाणे वाढत असल्यामुळे, त्याचप्रमाणे रुग्णाच्या वाढत्या सख्येचे प्रमाणात इतर खर्चहि वाढता असल्यामुळे, दरवर्षी खर्च वाढत जाणार व त्याची तरतूद आतापासून करणे जरूर आहे.

दवाखान्यात निरनिराळ्या विभागात होणाऱ्या कार्याचा, चिकित्सेचा व शस्त्रक्रियेचा १९५३ सालच्या आकड्याचा तक्ता —

## सर्व कार्याचा वार्षिक तक्ता

| | | |
|---|---|---|
| १ | वर्षातील एकूण बाह्यरुग्ण उपस्थिति | ५६२५० |
| २ | वर्षातील नवीन बाह्य रुग्ण | १२४०० |
| ३ | बाह्य रुग्णाची दैनिक उपस्थिति | १९५ |
| ४ | वर्षातील एकूण प्रवेशित रुग्ण उपस्थिति | १६९७२ |
| ५ | वर्षातील नवीन प्रवेशित रुग्ण | १४८५ |
| ६ | प्रवेशित रुग्णाची दैनिक सरासरी | ४७ |
| ७ | वर्षातील एकूण शस्त्रकर्मे (लहान व मोठी) | १०२३ |
| ८ | वर्षातील एकूण प्रसव | २६० |
| ९ | एकूण एक्स-रे फोटो (क्ष-किरण) प्रतिमा | ३३२ |
| १० | एकूण क्ष-किरण छाया ( स्क्रीनिंग ) | ६७५ |
| ११ | एकूण इजक्शने | ६३१० |
| १२ | एकूण सप्राभि विभागातील नमुने | ४२७ |

( लॅबोरॅटरी एक्झॅमिनेशन्स् )

## उपसंहार

या दवाखान्याचे निमित्ताने शेठसाहेबाचे स्वभावातील काही वैशिष्ट्ये व त्यान्च्या अगच्या ज्या पुष्कळ गुणाचा आमचे सस्थेवर थोड्याफार प्रमाणात परिणाम झाला आहे व होत आहे, त्याबद्दल स्थलसकोचास्तव सविस्तर वर्णन न करिता दोन शब्द लिहिणे अप्रस्तुत होणार नाही असे वाटते लेखक तर नेहमी अत्यत बारकाईने त्याच्या दिनचर्येचा व एकदर गुणाचा अनुकरणाचे दृष्टीने अभ्यास करीत असतो, व सस्थेचे वाढीविशी आम्हास त्याचेपासून काय शिकता येईल याबद्दल आमचे सस्थेतील नोकरवर्गास थोडी माहिती देत असतो

शेठसाहेबाची निरलस वृत्ति, उद्यमप्रियता, वक्तशीरपणा, उच्च महत्त्वाकाक्षा, साधी राहणी, थोर विचारसरणी, करारी व धाडसी स्वभाव, व्यवहारचातुर्य, माणसाची त्वरित व अचूक पारख करण्याची हातोटी, भयकर सयम, अभ्यासू वृत्ति, समत्वदृष्टि, ज्ञानलालसा, चिकाटी, न्यायप्रियता.

अलौकिक औदार्य, दानशूरत्व, निगर्वी व विनोदी स्वभाव, गुणग्राहकता, कलांचे बद्दल आदर, धर्म, देव व साधुसंत यांचेबद्दल आदर व श्रद्धा, देशपर्यटनाबद्दल लालसा वगैरे कितीतरी गोष्टी सांगतां येतील. या व आणखी इतर सद्गुणसमुच्चयाचा ठसा अमळनेरच्या अनेक संस्थांवर व सार्वजनिक जीवनावर उमटलेला दिसल्यास नवल नाहीं.

शेवटीं, आपल्या औदार्याचा ओघ सार्वजनिक उपयुक्ततेच्या, लोकशिक्षणाचे व लोकरक्षणाचे कार्याकडे वळवणाऱ्या या भाग्यविधात्याला जास्तींत जास्त दीर्घायु लाभो, अशी त्या जगन्नियंत्याची प्रार्थना करून हा खा. मे. अँ. स. ए. सोसायटी व प्रताप चॅरिटेबल हॉस्पिटलचा त्रोटक इतिहास पूर्ण करता.

आपला

**रा. व्यं. मोने**

---

# प्रताप विद्यामंदिर, चोपडें, पू. खा.

## संस्थेचा त्रोटक इतिहास

श्री य गो हरताळकर, B Sc ,B T

समाजहित वा विकास करणाऱ्याचा इतिहास उद्‌बोधक अशा अनेक घटनानीं बनलेला असतो नदी समाजास पोसते, निसर्गाचे वैभव वाढविते तिचे मूळ वा उगम पाहिला तर तिच्या भव्यतेची ‘ मूळ ’ बैठक किती ओबडधोबड, किती सामान्य असते बरे ! त्याचप्रमाणे कोणत्याहि संस्थेचा जन्म असाच बिकट परिस्थितीत झालेला सामान्यत दिसून येतो प्रताप विद्यामादिर या नियमास अपवाद कसे असू शकेल ?

ता ९-१-१९१८ रोजी एका मदिराच्या जीर्ण अशा खोलीत ही सस्था जन्मास आली ही सस्था आज स्वत न्या मालकीच्या प्रशस्त इमारतीत भरत आहे सस्थेस लाभलेले हे वैभव अनेक महाभागाच्या कष्टातून व श्रीमतान्या दातृत्वातून निर्माण झाले आहे कै निमडू शामलालशेठ यानीं कै मोहरीर याची मदत घेऊन सस्थेची जोपासना मातेच्या ममतेने केली नुसत्या ममतेवर कोणतेहि कार्य उभारले जात नाही ममतेच्या जोडीला पैशाचे पाठबळ, कर्तृत्वाचा आधार व कष्टाची पराकाष्ठा या गोष्टी असल्या तरच सस्थेचा इतिहास उज्ज्वल घटनानी भरलेला दिसून येतो सस्थेस सुरवातीस अत्यत बिकट परिस्थितीतून जावे लागले अशा बिकट परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी अनेक श्रीमत माणसाचे सहाय्य सस्थेस मिळू शकले श्रीमत प्रताप शेठजींचे सहाय्य डोळ्यात भरण्यासारखे असे होते श्रीमत प्रतापशेठजींची आर्थिक मदत व मार्गदर्शन सस्थेचे बाळसे वाढविणारे ठरले त्याच वेळी कै द्वारकादास रामदास शेठ, कै किसनदास माणकचद शेठ, कै नगीनदास नथूसा शेठ, कै चुनीलाल तुकाराम शेठ इत्यादि नागरिकानी १९१८ ते १९३० पर्यत सस्थेस चागलेच स्थैर्य प्राप्त करून दिले कै किसनदास माणकचंद शेठ यानीं आपली धर्मशाळा शाळेस दिल्यामुळे इमारतीचा प्रश्न सुटला.

इ स १९३५ मध्ये न्यू इग्लिश स्कूलचे सपूर्ण हायस्कुलात रूपातर झाले इ स १९३५ ते १९४७ पर्यंत न्यू इं स्कूलचे (मूळचे नाव) मॅट्रिकचा रिझल्ट जास्तीत जास्त शेकडा ८० लागला व कमीत कमी ५० लागला १९३५ मध्ये एकूण वर्ग ८ होते इ स १९४७ साली वर्गाची सख्या १३ झाली ह्या बारा वर्षाच्या कालावधीत श्री तेजपाल गिरधरलाल शेठ यानी शाळेस अमोल मदत केली म्हणून शिक्षक ग्रथालयास 'सुरजमल शिक्षक ग्रथालय' असे नाव दिले शिवाय त्यानी आपले बधु कै नदलाल शेठ याचे स्मरणार्थ एक मोठी दुमजली इमारत 'वसतिगृहासाठी' सस्थेस बक्षीस म्हणून दिली आहे त्या वसतिगृहात सुमारे २५ विद्यार्थी सहज राहू शकतील

सस्थेच्या जन्मापासून तो आजपर्यंत श्रीमन्त प्रतापशेठजी सस्थेचे अध्यक्ष आहेत सस्थेचे पहिले चेअरमन कै द्वारकादास रामदास शेठ होत त्यानी इ स १९१८ ते १९३० पर्यंत सस्थेस नावारूपास आणले त्यानतर श्री मगनलाल नगीनदास शेठ, चेअरमन म्हणून निवडले गेलेत श्री मगनलाल शेठ आजहि सस्थेचे चेअरमन आहेत त्यान्च्या प्रभावी व्यक्तित्वामुळे, कार्यकुशलतेमुळे व अचूक मार्गदर्शनामुळे सस्थेच्या कितीतरी अडचणी दूर केल्या गेल्या व आजाहि केल्या जात आहेत कै निमडू शामलाल शेठ, कै चुनिलाल तुकाराम शेठ, श्री चपालाल छोटालाल व श्री माधव गोटू पाटील यानी सस्थेचे सेक्रेटरी म्हणून काम केले इ स १९४७ नतर लाईफ टीचर्सपैकीच सेक्रेटरी असावा असे सस्थेने ठरविले श्री ई जी कुळकर्णी सस्थेचे सेक्रेटरी म्हणून काम करू लागले इ स १९५० पासून श्री य गो हरताळकर, बी एस्सी, बी टी, सस्थेचे सेक्रेटरी म्हणून काम करीत आहेत

न्यू इ स्कूलचा नामकरणसमारभ दिनाक २८-२-५२ ला श्री स का पाटील, मुबई, याच्या अध्यक्षत्वाखाली झाला श्रीमन्त प्रताप शेठजीनी बरीच मोठी देणगी दिली म्हणून न्यू इ स्कूलचे रूपातर प्रताप विद्यामदिरात झाले आज प्रताप विद्यामदिराची नवी इमारत सुमारे एक लाख रुपयाची आहे नवीन इमारतीत ८ वर्ग व कै किसनदास माणकचद शेठ यानी शाळेस दिलेल्या गावातील इमारतीत ७ वर्ग असे एकूण १५ वर्ग आज शाळेत आहेत नवीन इमारतीसाठी अनेक धनिकानी मदत केली चोपडे जिनिंग असोसिएशनने बहुमोल मदत केली ह्या सर्व मदतीमुळेच व श्रीमत प्रतापशेठजीच्या आशीर्वादामुळेच नवीन इमारत होऊ शकली नवीन इमारत बाधली जात असताना श्री गोवर्धनदास भिकारीदासशेठ याचा अनुभव सस्थेस लाभला म्हणून तिची भव्यता आज दिसून येत आहे

आज चोपडे शिक्षणमडळाचे अधिकारी व मॅनेजिंग बोर्डाचे सभासद खालीलप्रमाणे आहेत

(१) श्रीमन्त मोतीलाल माणकचद ऊर्फ प्रतापशेठजी–प्रेसिडेट

(२) श्री किसनदास द्वारकादासशेठ–व्हाईस–प्रेसिडेट

(३) श्री मगनलाल नगीनदास–चेअरमन

(४) श्री य गो हरताळकर–सेक्रेटरी.

मॅनेजिंग बोर्डाचे सभासद

(१) श्री मगनलाल नगीनदास, चेअरमन
(२) श्री गोवर्धनदास भिकारदास शेठ
(३) श्री छगनलाल नानकराम शेठ
(४) श्री तेजपाल गिरधरलाल शेठ
(५) श्री बन्सीलाल रामदयाळ शेठ
(६) काळू गणपत पाटील
(७) श्री भगवतराव अमृतराव देशमुख
(८) श्री नरहर राजाराम पाटील, खर्डी
(९) राजाराम पर्वत पाटील, चोपडे नगरपालिकेचे प्रतिनिधि
(१०) श्री य गो हरताळकर B Sc B T सेक्रेटरी व सुपरिंटेंडेंट
(११) श्री नी य कुलकर्णी, B A B T, मुख्याध्यापक

संस्थेत शालेय अभ्यासाव्यतिरिक्त बालमनाचा सर्वांगीण विकास व्हावा यासाठीं नानाविध सांस्कृतिक व सामाजिक चळवळी सुरू केल्या आहेत समाजशिक्षण, प्रौढशिक्षण, गरीब विद्यार्थि-निधि, गणेशोत्सव, संत व देशभक्त यांच्या जयंत्या व पुण्यतिथ्या साजऱ्या करणे, श्रम-पुजारी संस्था, वर्गनायक सभा, विद्यार्थ्यांची आमसभा, कलापथक, खेळाचे सामने, हस्तव्यवसाय, प्रदर्शन वगैरे अशा विविध उपक्रमामुळे विद्यार्थ्यांमध्ये चैतन्याचे सातत्य व टिकाऊ उत्साह दिसून येतो रेडिओ, १६ मिलिमीटर प्रॉजेक्टर, बालवीर चळवळ आणि ज्यू एन् सी सी यामुळे उत्साहात भर पडली आहे

वरील सर्व चळवळींना सुसघटित व ठाशीव स्वरूप येण्यासाठी व त्यातील महत्त्व मुलांना पटावे व शाळेचा दैनंदिन कारभार अत्यंत कुशलतेने पार पाडला जावा म्हणून संस्थेने श्री य गो हरताळकर, B Sc B T सुपरिंटेंडेंट व श्री नी य कुलकर्णी, B A, B T, या दोन प्रमुखांची निवड केली आहे हे दोन्ही प्रमुख आपापल्या सहकाऱ्यांच्या सहकार्यावर व बालमित्रांच्या स्नेहपूर्ण अशा कळकळीच्या आधारावर "प्रताप विद्यामंदिर" चालवीत आहेत संस्थेत सहभाव, समभाव व सहनशीलता या त्रयींचे वातावरण नेहमी असावे यासाठीच सर्वांची धडपड आहे त्याशिवाय लोकशाही यशस्वी होणे शक्य नाही